


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**



# नवभारत

जानेवारी - फेब्रुवारी - मार्च - एप्रिल २००६

गोष्ट औद्योगिक उत्पादन, शेती, अर्थव्यवहार, व्यापार, वाहतूक व दळणवळण या क्षेत्रांच्या पुनर्मांडणीच्या, त्यांच्याशी संबंधित …

## ‘उत्तर-नव’ भारत
## विकासाची विविध प्रतिमाने

… असतील. … निर्धारसंपन्न … व्यक्तींच्या भू… केच महत्त्व राहीलच. … अनेक कार्यक्रम-उपक्रम … घडून हाती घेतले जाऊ शकणारेच … लोकशक्ती … निष्कारण संघर्षाची भूमिका न घेता सर्वा… रचनेचा केवढा व्यापक कार्यक्रम हाती घेता … विनोबांनी भूदान-ग्रामदानाच्या आंदो… भारतीय समाजाच्या पुनरुत्थानाचा तो … याचे कारण विनोबांनी गांधीप्रणीत सत्याग्रही … असे चुकीचे विश्लेषण केले जाते. दुर्दैवाने ते सर्वोदय चळवळीतही प्रतिष्ठा पावले आहे. विनोबांनी सुचविलेले बहुतेक सर्व कार्यक्रम आजही तेवढेच प्रस्तुत व क्रांतिकारक आहेत. लोकशक्तीच्या सहभागातून अहिंसक … करावयाची असेल तर …

लोकशक्तीच्या आधारे, शासनाशी निष्कारण संघर्षाची भूमिका न घेता सर्वांगीण व मूलगामी पुनर्रचनेचा केवढा व्यापक कार्यक्रम हाती घेता येतो याचे भव्य दर्शन विनोबांनी भूदान-ग्रामदानाच्या आंदोलनाच्या काळात घडविले. भारतीय समाजाच्या पुनरुत्थानाचा तो महान प्रयत्न विरून गेला याचे कारण विनोबांनी गांधीप्रणीत सत्याग्रही संघर्ष टाळला हे आहे, असे चुकीचे विश्लेषण केले जाते. दुर्दैवाने ते सर्वोदय चळवळीतही प्रतिष्ठा पावले आहे. विनोबांनी सुचविलेले बहुतेक सर्व कार्यक्रम आजही तेवढेच प्रस्तुत व क्रांतिकारक आहेत. लोकशक्तीच्या सहभागातून अहिंसक क्रांती सिद्ध करावयाची असेल तर राज्यकर्ते-शासन यांच्या पातळीवरून टाकल्या जाणाऱ्या परिवर्तनकारी पावलांच्या बरोबरीने विनोबांनी अधिक रेखीव व सुस्पष्ट केलेल्या महात्मा गांधींच्या मार्गावरून वाटचाल करण्याइतकी फलदायी दुसरी गोष्ट नाही.

**- वसंत पळशीकर**

(पृष्ठ क्र. ९७)

… कांच्या ओढीने हिंसावादी … हिंसेसाठीच हिंसा मानवाला प्रिय होत नाही. म्हणून अहिंसक

विचारसरणीप्रमाणे वागू इच्छिणारे आणि तदनुसार जगाशी अविरोधी संबंध ठेवू पाहणारे राष्ट्र निर्माण झाले, तर ते आसपासच्या राष्ट्रांतील विवेकवृत्तीला जागवील, चालना देईल, आणि तितक्या मानाने त्यांना अहिंसेच्या मार्गावर आणील.

अहिंसक राष्ट्र आपला माल जबरदस्तीने दुसऱ्यावर लादणार नाही. अहिंसक राष्ट्रातील प्रत्येक गाव परिश्रमनिष्ठ आणि स्वावलंबी राहील. त्यामुळे इतर राष्ट्रांच्या हितसंबंधाचा आपल्या हितसंबंधाशी त्यांनी विरोध मानल्यास त्यातून मार्ग काढण्यासाठी आणि त्याचे संपूर्ण समाधान करण्यासाठी मैत्रीच्या भावनेने मदत करील. इतर राष्ट्रांवर दुष्काळादी संकट आले असता त्यां… निष्काम भावने… प्रश्न … स्वीकार… स्वतःवर आक्र… याचा … सक प्रतिकार करी… वृत्तीचे एकाकी राष्ट्र … वज्रकवच ते निर्माण क… अहिंसक राष्ट्र अकुतोभय …

## गांधीजी - विनोबा विचारधारा

## ल य की न वो द य

… वरे, बाहेरची राष्ट्रे … (अ) … कमी आणि लोक… आणि आमच्यापाशी … लोकसंख्या अल… असेल तर त्यात जे … राहू इच्छित … व्यवस्थेत अंतर्भूत … त्यांचे आम… नाही? अहिंसक … मानीत … च आहे. प्राचीन … तरी शास्त्री … हिंसेची म्हणून न … त सापड… ने जागा दिलीच … हिंदुस्थान… आ) अथवा इतर … डचणीमु… ? अहिंसक राष्ट्र … नही अ… … गतील? (इ) … पडून … साठी आमच्यावर … काय? … ने कधीच वाजत … सेल, अ… … ऱ्याच्या लोभाला … असेल … नसू. (ई) अथवा … तील … यांच्या भानगडीमुळे … ने गेले … असेल तर त्यांचे … सं घडवू… अहिंसेच्या नव्हे, पण … शक्य हो… … ढाईवरच पाळी आली असे गृहीत धरले, तर … संरक्षण दिले, त्याहून कमी संरक्षण अहिंसेने … सामणारे वीर ज्या राष्ट्रांत सिद्ध असतील, त्या राष्ट्राला का लाभावे?

**विनोबा**










## ‘आणि ती मात्र आहेच आहे...’

हे जग
आपण निर्माण
केलेले नाही;
यामुळे
याची जबाबदारी
आपल्यावर नाही.

हे जग
अधिक सुंदर
अधिक मंगल
कसे होईल
यासाठी विचाराने
कृतीने
प्रयत्नशील राहणे
इतकेच
आपण करू शकतो.

तसा सतत
प्रयत्न करणे
इतकेच आपण करू शकतो -
तितकीच
आपली जबाबदारी आहे
आणि
ती मात्र
आहेच आहे.

- आचार्य स. ज. भागवत

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५९ । अंक ४-५-६-७ । जानेवारी-फेब्रुवारी-मार्च-एप्रिल २००६
पौष-माघ-फाल्गुन-चैत्र शके १९२७-२८
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची विशेष किंमत रु. ८०/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक सहमत असतीलच, असे नाही.

## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील के० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.







**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).



अनुक्रमणिका








# अनुक्रमणिका


| | |
|---|---|
| **प्रास्ताविक** | ५ |
| **प्रचलित विकासव्यूह : दुटप्पी अर्थव्यवस्था व जनसामान्यांची नाडणूक**<br>- ब्रह्मदेव शर्मा (अनुवाद : वसंत पळशीकर) | १५ |
| **विकास आणि राष्ट्रीय एकात्मता**<br>- लक्ष्मी जैन (अनुवाद : वसंत पळशीकर) | ३० |
| **उद्योगीकरण, पर्यावरण आणि अस्तित्व**<br>- कमला चौधरी (अनुवाद : वीणा मुळे) | ४० |
| **आधुनिक विकासप्रक्रियेचे विनाशकारी वळण व पुनर्विचाराची दिशा**<br>- वसंत पळशीकर | ४६ |
| **पर्यावरणाचा ऱ्हास घडविणारा जनहितविरोधी विकासाचा नमुना**<br>- माधव गाडगीळ (अनुवाद : रत्नाकर हातेकर) | ५७ |
| **गोरगरीब व स्त्रिया यांच्या मुळावर येणारी आधुनिक (कु) विकासाची प्रक्रिया (ग्रंथपरिचय)**<br>- वंदना शिव (अनुवाद : वसंत पळशीकर) | ६६ |
| **उथळ पर्यावरणवादाच्या मूलभूत मर्यादा**<br>- अविनाश जोशी | ८० |
| **विकासाची भावी दिशा**<br>- वसंत पळशीकर | ९२ |
| **साम्यवाद की साम्ययोग?**<br>- विनोबा | ९८ |
| **हिन्द स्वराज्य**<br>- महात्मा गांधी | १३८ |
| **परिशिष्ट : आदि प्रतिमान : होमरूल**<br>- लोकमान्य टिळक | १४९ |


(पृष्ठ ५ ते ९७ हा मजकूर श्री. वसंत पळशीकरांनी पूर्वी संपादित केला आहे. त्यानंतरचे संपादन प्रा. देवदत्त दाभोलकरांचे आहे.)

# अतिथी संपादकीय
# 'उत्तर-नव' भारत आणि 'नवभारत'

'उत्तर-नव' भारत

Post Modern India

'उत्तर-नव' भारत कोणत्या दिशेने जाणार?

'नवभारता'ची दिशा ठरलेली आहे.

ती भूमिका प्रत्येक अंकात पुनरावृत्तही करण्यात आली आहे.

'विविध विचारप्रवाहासाठी मुक्त व्यासपीठ' असा या भूमिकेचा मुख्य आशय आहे.

'नवभारत'ने आजवर कटाक्षाने ही भूमिका सांभाळली आहे - आणि यानंतरही सांभाळत राहील. कारण तेच त्याच्या अस्तित्वाचे आदिकारण आहे. (raison ditre).

'उत्तर-नव' भारताकडे 'नवभारत' याच दृष्टीने पाहत आहे. त्याचा प्रारंभ म्हणून हा अंक संकलित संपादित करण्यात आलेला आहे.

गांधीजी, विनोबा ही आता केवळ 'वंदावी दुरून' अशीच दैवते राहिली आहेत का? कालप्रवाह झपाट्याने त्यांना वळण घालून पुढे वाहत आहे. 'ऊर्ध्वबाहुः विरौम्येषः' असे कदाचित गांधीजी आक्रंदत असतील. विनोबा 'त्वदीयमेव एतत् सर्वं तुभ्यमेव समर्प्यते' (तुझेच सारे तुलाच अर्पण) असे शांत समवृत्तीने विश्वशक्तीला म्हणत असतील.

**या कालप्रवाहात आपल्याला कोठे पाय रोवून उभे राहता येणार आहे काय? आसऱ्याची काही बेटे शोधता येणार आहेत का? नोहाच्या होडीत (Noah's Ark) काही मूलभूत मूल्यांचे जतन करता येण्यासारखे आहे काय?**

**जगात सर्वत्र सर्व चिंतनशील यात मग्न आहेत. कदाचित भारतात आहेत त्यापेक्षा इतरत्र असे व्यथित चिंतनशील अधिक आहेत.**

**यांचा आधार एकमेकांना मिळाला पाहिजे.**

**- देवदत्त दाभोलकर**

**चर्चासत्र :**

या अंकातील विषयावर चर्चासत्र प्राज्ञपाठशाळा, वाई येथे २९ व ३० सप्टेंबर रोजी आयोजित करण्यात आले आहे. सहभागी होण्यात रस असणाऱ्यांनी, प्रा० यशवंत कळमकर, सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याशी संपर्क साधावा.

दूरध्वनी क्र.

कार्यालय : (९५२१६७) २२२००६

निवास : (९५२१६७) २२२७०४











अनुक्रमणिका

## लेखक परिचय

| | | |
|---|---|---|
| ब्रह्मदेव शर्मा | : | भारतीय प्रशासकीय सेवेतील भूतपूर्व सभासद. सध्या भारत सरकारचे अनुसूचित जाती व जमाती यांसाठीचे आयुक्त. नवसमाजनिर्मितीसाठी कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांची 'सहयोग' नावाची संघटना उभी करण्यात पुढाकार. |
| लक्ष्मी जैन | : | १९४७ साली पाकिस्तानामधून आलेल्या निर्वासितांच्या पुनर्वसनाच्या कामात कमलादेवी चटोपाध्याय यांचे सहकारी. इंडियन को-ऑपरेटिव्ह युनियन संस्थेत काम. अखिल भारतीय हस्तकला आयोगाचे भूतपूर्व अध्यक्ष. सध्या योजना आयोगाचे सदस्य. |
| कमला चौधरी | : | फोर्ड फाऊंडेशनमधील भतपर्व उच्चपदस्थ अधिकारी, नॅशनल वेस्टलॅंड डेव्हलपमेंट कॉर्पोरेशनच्या अध्यक्षा. |
| माधव गाडगीळ | : | इंडियन इन्स्टीट्यूट ऑफ सायन्स, बंगलोर येथे सेंटर फॉर थिओरेटिकल स्टडीज व सेंटर फॉर इकॉलॉजिकल स्टडीजमध्ये प्राध्यापक व पर्यावरणीय संरक्षण व संवर्धन या विषयातले पंतप्रधानांचे भूतपूर्व सल्लागार. 'पश्चिम घाट बचाव' योजनेशी संबंध. |
| वंदना शिव | : | भौतिकीशास्त्र व विज्ञानाचे तात्त्विक अधिष्ठान या विषयांचा अभ्यास. रिसर्च फाऊंडेशन फॉर सायन्स, टेक्नॉलॉजी अँड नॅचरल रिसोर्स पॉलिसी, देहरादून (उ.प्र) या संस्थेच्या संचालिका. |
| अविनाश जोशी | : | बृहन्महाराष्ट्र कॉलेज ऑफ कॉमर्स, पुणे येथे अर्थशास्त्राचे प्राध्यापक. |
| वसंत पळशीकर | : | समाजप्रबोधन पत्रिकेचे काही काळ संपादक. विविध सामाजिक-राजकीय विषयांचे आणि समस्यांचे व्यासंगी अभ्यासक. |

**भारतीय विकास प्रतिमानांच्या प्राणतत्त्वाचे आदर्श**
**बाळ गंगाधर टिळक**
**मोहनदास करमचंद गांधी**
**विनायक नरहर भावे**



**चर्चासत्रांविषयी -**

चर्चासत्रे फलदायी होण्याच्या दृष्टीने खालील गोष्टी उपयुक्त ठरतात.

१. सहभागी होणाऱ्यांनी पूर्ण पूर्वतयारीनिशी येणे. आधी टीपणे येणे व ती सहभागींच्याकडे पोहोचणे. तात्कालिक उत्स्फूर्त सहभागाचा उपयोग फारच मर्यादित असतो.

२ आपण चर्चासत्रात घेतलेल्या सहभागाचे, मांडलेल्या विचारांचे टिपण चर्चासत्र संपताच संयोजकांच्या हाती देणे. अहवाल तयार करताना त्यांचा वापर करता येतो.

३. चर्चासत्राच्या यशापयशाविषयींचे आपले मूल्यमापन, काही सूचना संचालकांकडे लेखी देणे. भावी आयोजनासाठी त्या उपयुक्त होऊ शकतात.

४. 'नवभारत' आयोजित चर्चासत्रात ही दक्षता घेण्याचा प्रयत्न केला जातो.

५. चर्चासत्र जिज्ञासू अन्य श्रोत्यांसाठी खुले असते, परंतु ते सूत्रसंचालकाच्या अनुमतीनेच प्रत्यक्ष सहभाग घेऊ शकतात.

# प्रास्ताविक

### वसंत पळशीकर

विकास म्हणजे आर्थिक विकास असे विकासविषयक चर्चेमध्ये गृहीतच धरले जाते. आर्थिक विकास म्हणजे विविध वस्तू व सेवा यांच्या उत्पादनात वाढ, सतत अखंडित राहणारी वाढ, वस्तू व सेवा यांची रेलचेल. मनःपूत उपभोग घेता येत असेल तर ते उच्च जीवनमान होय अशी धारणाही या सर्व समीकरणांच्या बुडाशी आहे. उपभोग म्हणत असताना ऐंद्रिय उपभोगच गृहीत असतो, आणि त्यांचा संबंध शरीरसुखाशी व मनोरंजनाशी जोडलेला असतो.

दुसऱ्या महायुद्धानंतर आशिया व आफ्रिका खंडातील अनेक देश स्वतंत्र झाले. आर्थिक विकास हे त्यांच्या स्वतंत्र सरकारांचे एक मुख्य उद्दिष्ट बनले. जगाची विकसित व प्रगत आणि मागास व अप्रगत अशी विभागणी अर्थशास्त्रज्ञांनी केली. विकास कसा घडून येतो, तो घडवून आणण्याची सगळ्यात परिणामकारक रीत कोणती, जलद गतीने विकास घडवून आणावयाचा मार्ग कोणता यांसारख्या विषयांवर एक मोठे ग्रंथालय भरेल एवढे लेखन १९५० नंतरच्या काळात केले गेले आहे.

रेलचेल, श्रीमंती या दृष्टीने आजही अमेरिका हा गरीब, अविकसित समाजातील शिक्षित धुरीणवर्गाच्या मनातला वांछनीय नमुना आहे. जपान, जर्मनी, दक्षिण कोरिया, तैवान अशा काही अन्य देशांच्या श्रीमंतीच्या व प्रगतीच्या दिशेने चाललेल्या यशस्वी घोडदौडीचे कौतुक होत असले तरी अमेरिकन समृद्धीचीच भुरळ आजही आहे असे म्हणणे वावगे होणार नाही. मागास ते विकसित हा प्रवास अत्यंत थोड्या अवधीत जलद गतीने आणि शासकीय नेतृत्वाखाली कसा साधावा या मुद्द्याच्या बाबतीत सोविएत रशियापासून सगळ्यात जास्त शिकता येईल अशी आशियाई-आफ्रिकी नवस्वतंत्र राष्ट्रांची समजूत होती. पण समृद्ध अर्थव्यवस्था अमेरिकेचीच हे त्यांचेही ठाम उत्तर होते.

सधन, प्रगत वरचढ दशांमध्ये वापरात असलेले तंत्रविज्ञान ही समृद्धीची गुरुकिल्ली आहे याविषयी बहुतेक सर्वांचे एकमत आजही आहे. या तंत्रविज्ञानातही महायुद्धोत्तर काळात वाढत्या वेगाने सुधारणा व क्रांती होत गेली आहे. अलीकडे 'उच्च-तंत्र' (हाय-टेक) हा शब्द या घडामोडींचा निदर्शक म्हणून प्रचारात आला आहे. हीपण प्रगतीची एक खूण या सर्व काळात मानली गेली.

प्रत्येक नवे तंत्रज्ञान हे दरडोई उत्पादनक्षमतेत भर घालणारे असल्याने त्याच्या सार्वत्रिक वापरामुळे वस्तूंचे उत्पादन वाढते आणि त्याचवेळी वस्तू स्वस्तही होतात हा एका पातळीवर जगाचा गेल्या दोन-अडीचशे वर्षांचा अनुभव राहिला. या कारणाने तंत्रवैज्ञानिक शोधांना व सुधारांना जर अंत नसेल तर समृद्धी वाढण्यालाही अंत नसेल अशी सहजच धारणा बनली. सर्व जगाची एकच अर्थव्यवस्था बनण्याकडे तंत्रविज्ञान सर्व देशांना रेटत नेणार आणि तेवढ्याच अटळपणे वाढत्या प्रमाणावर वैपुल्य व सुखाची रेलचेल उत्पन्न करणार असे मानले गेले.

नवस्वतंत्र देशांच्या आर्थिक विकासाचे प्रयत्न अडथळ्यांच्या व अपयशाच्या फेऱ्यात सापडत राहिले तरीही अनेक वर्षे अर्थशास्त्री ज्योतिषी असेच सांगत राहिले, की जागतिक पातळीवर उत्पादनाच्या वैपुल्याचा प्रश्न खरे तर सुटलेला आहे, न्याय्य व समान वितरणाचा प्रश्नच खरा प्रश्न आहे; तो अर्थशास्त्रीय प्रश्न नसून तो सामाजिक, राजकीय व नैतिक प्रश्न आहे. अशी मांडणी लोकप्रिय व शिष्टमान्य बनली.

गरीब व मागास राष्ट्रांचा आर्थिक विकास झपाट्याने का होत नाही, याची जी विभिन्न विश्लेषणे या काळात सादर केली गेली त्यांचे दोन प्रकार स्थूलमानाने करता येतील, एका प्रकारच्या विश्लेषणांचे निष्कर्ष असे होते की, १. गरीब व मागास देशांतली पारंपरिक समाजरचना, संस्थात्मक जीवन व मानस हाच मोठा अडथळा आहे. २. या देशांचा स्वाश्रयी व स्वयंपूर्ण बनण्याचा आग्रह हाच यांच्या वेगवान वाढीच्या आड येत आहे. एकात्म जागतिक अर्थव्यवस्थेत त्यांनी त्यांच्याकडे येणारे स्थान, भूमिका व कार्य यांचा स्वीकार केला व तौलनिक अनुकूलता (कंपॅरेटिव्ह ॲडव्हान्टेज) ध्यानात

अनुक्रमणिका

घेऊन विशेषीकृत उत्पादन करण्यावर भर दिला तर त्यांची अधिक वेगाने वाढ होईल. ३. यांपैकी अनेक देशांचे दारिद्र्य व मागासलेपण हे लोकसंख्येत होत राहणाऱ्या वाढीत रुतलेले आहे. सधन पाश्चात्त्य देशांमध्ये लोकसंख्यावाढ रोखली गेली असल्याने जी काही वाढ होते तिने जीवनमान उंचावत जाते. लोकसंख्येत होणारी बेसुमार वाढ नवस्वतंत्र राष्ट्रांमध्ये होणारी आर्थिक वाढ सतत गिळंकृत करत राहत आहे. लोकसंख्येवर मर्यादा घातली नाही तर दारिद्र्य, बेकारी यांचे उच्चाटन कधीच होणार नाही. तात्पर्य, या प्रकारच्या विश्लेषणांमधून गरिबी, मागासलेपण, विषमता, बेकारी या सगळ्यांचे खापर त्या त्या समाजांवरच फोडले जात राहील.

या विरुद्ध विश्लेषणांचा एक प्रकार असा राहिला की ज्यामध्ये जागतिक व देशांतर्गत दोन्ही पातळ्यांवरील अर्थ व समाजव्यवस्थांच्या अंगभूत विषम वर्गीय रचनेमुळे गरिबी, मागासलेपण, विषमता व बेकारी या गोष्टी टिकून राहतात; इतकेच नाही तर त्या बुद्ध्या टिकवून धरल्या जातात, असे प्रतिपादन आग्रहपूर्वक केले जाते. या निष्कर्षात पुष्कळ अधिक तथ्य आहे यात शंका नाही.

या दोन्ही प्रकारच्या विश्लेषणांची विकास कशाला म्हणावयाचे, त्याचे मोजमाप कसे करावयाचे, त्याची पायाभूत प्रक्रिया कोणती, यांसारख्या प्रश्नांची गृहीत उत्तरे सारखीच होती. मुख्य म्हणजे पृथ्वीवरील साधनस्रोत निरंतर पुरवठ्याला पडणारे आहेत, रेलचेल समृद्धीवरील खरी मर्यादा साधनस्रोत नसून विज्ञानतंत्रविज्ञानातील अत्यंत तोकडी प्रगती हीच आधुनिकपूर्व प्रदीर्घ काळातील गरिबीला कारणीभूत मर्यादा होती. हे दोन्ही प्रकारच्या विश्लेषणांना समाईक असे पायाभूत गृहीत होते.

पूर्व युरोप व सोविएत रशिया यांमध्ये गेल्या काही वर्षांमध्ये, व विशेषतः गेल्या काही महिन्यांमध्ये ज्या घडामोडी घडल्या त्यांमुळे न्याय व समता प्रस्थापित करण्याचा मुद्दा असो की वेगाने विकास साधण्याचा मुद्दा असो, 'सोविएत नमुन्यां'चे प्रामाण्य पार डळमळीत झाले आहे. जागतिक अर्थव्यवस्थेची रचना विषम व अन्याय्य आहे, सधन व वरचढ राष्ट्रांचे व्यवहार स्वार्थी व शोषणाधिष्ठित आहेत, आणि दारिद्र्य व मागासलेपण टिकून राहण्याचे हे एक मुख्य कारण आहे एवढ्यापुरते डावे मार्क्सवादी विश्लेषण मान्य असणारी आज पुष्कळ मंडळी भेटतील. पण या वास्तवाचे कारण सांगून देशात सोविएत रशियाच्या धर्तीची राजकीय व्यवस्था व नियोजनाचे तंत्र स्वीकारले जावे असा पुरस्कार करणाऱ्यांची संख्या आज फार थोडी आढळेल. सधन राष्ट्रे आपणास पूर्ण न्याय कधीच देणार नाहीत याविषयी ज्यांची खात्री पटली आहे त्यांचीही आधुनिकतम उच्च-तंत्रांचा वापर करून देशांतर्गत सर्व साधनस्रोतांचे कमाल दोहन करून समृद्ध बनण्यावरच सगळी भिस्त आहे.

भारतातील सर्व राजकीय पक्ष आणि पक्षांबाहेर असलेला मोठा सुशिक्षित वर्ग यांची विकासविषयक रणनीती साधनस्रोतांचा कमाल वापर व अत्याधुनिक उच्च-तंत्राचा स्वीकार या दोन डगरींवर आधारलेली आहे. ही रणनीती यशस्वीपणे राबवून आपण वस्तू व सेवा यांच्या उपभोगाची रेलचेल निर्माण करू शकतो; इतके विपुल उत्पादन प्रथम केल्यानंतरच दारिद्र्यनिवारण, समानत्वाने वाटप या गोष्टी साध्य होऊ शकतील याविषयी व्यापक एकमत आढळते.

## २

विकास व वाढ यांच्याविषयी काही वेगळा विचार गंभीरपणे करावयास हवा असे आरंभी दोन कारणांनी मुख्यतः म्हटले जाऊ लागले. पृथ्वीवरील काही प्रकारचे साधनस्रोत हे मर्यादित साठ्यांच्या स्वरूपाचेच आहेत आणि ते संपुष्टात येण्यामधून आर्थिक विकासावर मर्यादा येणे अटळ दिसते हा युक्तिवाद केला गेला. हा युक्तिवाद पूर्णपणे अमान्य करणे शक्यच नव्हते. उदाहरणार्थ, खनिज तेलासारख्या साधनांचे नवे साठे जरी सापडत गेले तरी, शोध लागतो तो आधीपासून असलेल्या साठ्यांचाच, तेलाचे उत्पादन मोठ्या प्रमाणावर आपण आता करू शकत नाही. या गोष्टी स्पष्ट होत्या. खनिज तेलाचा उपसा जर वाढत्या प्रमाणावर असाच होत राहिला तर, नव्या साठ्यांच्या शोधामुळे उद्याचे मरण फार तर परवावर ढकलले जाणार. खनिज तेल जपून वापरले, ते अधिक कार्यक्षमतेने वापरले, तंत्रवैज्ञानिक सुधारणांद्वारा ते आजच्यापेक्षा अधिक 'उत्पादक' बनविले तरी साठे अंतिमतः संपुष्टात येणार ही दगडावरची रेघ राहतेच. तेव्हा साठ्यांच्या स्वरूपात असणाऱ्या साधनस्रोतांवर जर आर्थिक वाढ-विकास अवलंबून असेल तर अशा वाढविस्ताराला अंतिमतः मर्यादा पडणारच, हा युक्तिवाद तर्कशुद्ध होता.

'वाढविकासाला मर्यादा' (लिमिट्स् टु ग्रोथ) च्या

युक्तिवादास आज शिष्टमान्यता मिळाली आहे. या युक्तिवादाने वाढविकासाला मर्यादा घालणारी जी कारणे पुढे केली त्या कारणांचा निरास कसा करता येईल यावर आज तंत्रविशारदांचे लक्ष केंद्रित झालेले आहे. ही खरी कारणे मानवी प्रतिभेला व कर्तृत्वाला निसर्गाने दिलेले आव्हान होय अशा दृष्टिकोणातून पाहिले जाते. म्हणजेच हा युक्तिवाद शिष्टमान्यता पावल्यावरही विकासनीतीविषयीची धारणा व भूमिका बदलली तर नाहीच; पण वाढविकास करण्याचे प्रयत्न कमी करावेत व एका पातळीवर आर्थिक व्यवहार निदानपक्षी सधन समाजांमध्ये तरी रोखून धरावेत असाही बदल सधन राष्ट्रांच्या धोरणात झालेला नाही.

साधारण याच सुमाराला विकासाच्या आधुनिक प्रक्रियेच्या पर्यावरणीय स्वास्थ्य व समतोलावर होणाऱ्या घातक परिणामांविषयी आवाज उठविला जाऊ लागला. साधनस्रोतांचे वारेमाप दोहन करण्याच्या नादात पृथ्वीवरील निसर्गरम्य व निवांत निर्जन प्रदेश उजाड बनत चालले आहेत, वा त्यांच्यावर अतिक्रमण होऊन ते नष्ट होत आहेत याविषयी आधीपासूनच लिहिले जात होते. निसर्गरम्य स्थळे जतन करावीत या विचाराने काम करणाऱ्या संघटनाही होत्या. निसर्गरम्य स्थळांबरोबरच वन्य जीवनाच्या संरक्षणासाठी विशेष प्रयत्न सुरू झाले. मानवी वसतीचा विस्तार व साधनस्रोतांसाठी कोठेही जाऊन ते ओरबाडून घेण्याचे धोरण यामुळे अनेक वन्य प्राणीजातींचा विनाश ओढवत आहे याची माहिती निसर्गप्रेमी मंडळी नाट्यपूर्ण व प्रभावीरित्या ठेवू लागली होतीच. पण बिघडणाऱ्या पर्यावरणीय समतोलाचा, हवा-पाणी-अन्नपदार्थ यांच्या प्रदूषणाचा मानवी जीवनावरही घातक आघात होत असल्याचे स्पष्ट झाले तसा या मुद्द्याचा अधिक गंभीरपणे विचार करण्याकडे कल निर्माण झाला. सजीव सृष्टी धारण करण्याची क्षमता असलेली नाजूक, गुंतागुंतीची, चिरंतन पुनर्निर्मितीक्षम पर्यावरणीय व्यवस्था म्हणजेच पृथ्वी हे नवे आकलन तीव्रपणे झाले आणि या अंगाने पृथ्वी या व्यवस्थेचा गंभीरपणे अभ्यास करण्यास चालना मिळाली. या अभ्यासामधून असे लक्षात आले की आर्थिक विकासाची आधुनिक प्रक्रिया, निरंतर आर्थिक वाढ करण्याचे उद्दिष्ट आणि पर्यावरणीय स्वास्थ्य व समतोल यांचे सख्य विळ्या-भोपळ्याचे आहे.

आर्थिक वाढ-विकासाविषयी अगदी वेगळ्या दिशेने विचार करण्याची आवश्यकता निर्माण झाली. यात एक पेच प्रथमतःच उपस्थित झाला. अगदी वेचक असे सधन देश सोडले तर इतर देशांतील बहुसंख्य लोकांना आर्थिक विकासाची नितांत गरज आहे याविषयी जवळपास एकमत होते. दारिद्र्य-निवारणासाठी आणि आधुनिक काळाला साजेसे असे समृद्ध जीवन जगता येण्यासाठी. म्हणजे आज सधन असलेल्या देशांचा आणखी जास्त विकास करावयाचे थांबवले (झीरो ग्रोथ) तरी जगातील उर्वरित देशांचा तुल्यबळ विकास साधण्याच्या ओघात पर्यावरणाचा समतोल पार ढासळणार हे स्पष्ट होते. अगदी अमेरिकेतल्या मध्यमवर्गीय सुखवस्तू (ॲफ्लुअंट मिडल क्लास) कुटुंबांचे जीवनमान ही कमाल पातळी सर्वांसाठी पुरेशी मानली तरी लागणारे साधनस्रोत प्रचंड होते. पण सधन समाजात 'शून्यवाढी'ची कल्पना मान्य होणार नाही ही गोष्टही सूर्यप्रकाशाहून अधिक स्पष्ट होती.

'तिसऱ्या जगा'तील समाजांनी विकासाची आकांक्षा बाळगू नये असे सांगण्याचे धाडस अर्थातच कोणी करू धजत नव्हता. या पेचाला बगल देण्याचेच वेगवेगळे प्रयत्न आजवर केले गेले आहेत. एका साधनाचा साठा संपत येईतो त्याला बदली म्हणून अन्य साधनस्रोत वैज्ञानिक संशोधनाद्वारे हाताशी येत राहील अशी आशावादी भूमिका मांडली जाऊ लागली. कचरा, प्रदूषण, पृथ्वीवरील उष्णतेत/तपमानात वाढ यासारख्या आपत्तींवर तंत्रवैज्ञानिक उतारा आहे व आज नसलाच तर उद्या सापडेल असे आत्मविश्वासपूर्वक सांगितले जाऊ लागले. आणि सर्वात मोठे शुभवर्तमान म्हणून सांगितले जाऊ लागले की, ऊर्जास्रोत जर अमर्याद असतील तर अंतिमतः सारे प्रश्न कायमचे सोडविले जाऊ शकतात; आणि, अणूच्या पोटात दडलेली ऊर्जा वेठीला धरण्याचे तंत्र हस्तगत झाल्यासारखेच असल्याने, नजीकच्या भविष्यकाळात मानवावर बंधने आणणारी सारी कारणे कायमची निकालात निघणार आहेत. या भूमिकेनुसार आणखी आणखी वाढ करीत राहण्यास सधन समाजांना पूर्ण मोकळीक मिळत असल्याने तेही खुश आहेत आणि आज नाही तरी उद्या आपणास अमेरिकेइतकेच समृद्ध जीवन उपभोगावयास मिळणार म्हणून 'तिसऱ्या जगा'तील शिक्षित धुरीणवर्गही खुश आहे. आधुनिक विकासवादी मंडळींमध्ये जगभर ही भूमिका अर्थातच अतिशय लोकप्रिय आहे.

ही भूमिका पेचाला बगल देणारी आहे असे का म्हणावयाचे? याचे मुख्य कारण असे की, कधी काळच्या दूरवरच्या भविष्यात जरी या भूमिकेतली ऊर्जेची अमर्याद उपलब्धता, साधनस्रोतांचा न संपणारा पुरवठा, तंत्रविज्ञानाच्या

सहाय्याने प्रदूषण दूर करणे व कचऱ्याची विल्हेवाट लावणे इत्यादी मुद्द्यांसंबंधीची गृहीते खरी ठरणार असे मानले तरी, येत्या पाचपन्नास वर्षांमध्ये तरी ती खरी ठरणारी नाहीत. आजच काही समस्यांनी उग्ररूप धारण केले आहे; आणि आजच्या दिशेने व वेगाने जर आणखी विकास साधावयाचा म्हटले तर कडेलोट जवळच दिसत आहे. विशेषतः 'तिसऱ्या जगा'तील दारिद्र्यरेषेच्या खाली वा जेमतेम वर असणाऱ्या कोट्यवधी लोकांचे जीवन अशक्य होईल ही गोष्ट अनुभवास येत आहे.

३

विकासाच्या आधुनिक प्रक्रियेविषयी, विकासवादी भूमिकेत गृहीत असलेल्या उद्दिष्टांविषयी ज्या आणखी एका अंगाने शंका उपस्थित झाली आणि फेरविचाराला चालना मिळाली तिचा येथे विचार करावयास हवा. दारिद्र्य, बेकारी, विषमता, शोषण यांचे उच्चाटन करण्यासाठी आर्थिक विकास नवस्वतंत्र राष्ट्रांमध्ये हाती घेण्यात आला. आर्थिक विकास साधला जाईल तसे भौतिकदृष्ट्या जीवनमान उंचावले तर जाईलच पण अन्य कसोट्यांवरही ऐहिक जीवनाची गुणवत्ता वाढेल अशी अपेक्षा होती. आर्थिक विकास-वाढीची जी प्रचलित शिष्टसंमत गमके आहेत त्यांनुसार गेल्या चाळीस वर्षांमध्ये भारताने केलेली वाटचाल लक्षणीय आहे. आणि तरीही वरील उद्दिष्टांची पूर्तता दृष्टीच्या टप्प्यात आलेली नाही. उत्पादन-वाढीतून निर्माण होणारी समृद्धी झिरपून समाजातल्या तळा-गाळातल्या लोकांपर्यंत पोचत राहून सर्वांना एक किमान जीवनमान तरी उपलब्ध होईल, सर्वांना रोजगार मिळेल याची आशा बाळगता येणार नाही एवढे आज स्पष्ट झाले आहे. खेडी पूर्णपणे मोडली नाहीत आणि शहरे जी वाढली त्यातील जीवन बकाल, कुरुप, व हिंस्त्र बनले आहे.

सर्वांना रोजगार देणे, सर्वांना दारिद्र्यातून मुक्त करणे, जीवन सुंदर व सुसंस्कृत बनवणे ही खरोखरच आधुनिक विकासप्रक्रियेची, विकासाच्या नावे निवडलेल्या साधनमार्गांची मुळात पश्चिमी देशांमध्ये तरी उद्दिष्टे होती का? औद्योगिक क्रांती, विज्ञान-तंत्रविज्ञानातील शोध व त्यांचा वापर, निरंतर उत्पादनवाढ यांच्यामागील वास्तविक प्रेरक शक्ती कोणत्या होत्या, व आजही आहेत? कार्ल मार्क्स व महात्मा गांधी यांनी त्यांच्या त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण पद्धतीने व परिभाषेत पाश्चात्त्य जगातील या घडामोडींचे अत्यंत भेदक वास्तववादी परीक्षण केले. ते जर यथार्थपणे जाणून घेतले तर सत्ता व मत्ता यांचे अमर्याद व अखंड केंद्रीकरण, सत्ता व मत्ता यांच्या उपभोगाची अमर्याद लालसा याच आधुनिक काळातील व्यापार व उद्योग यांच्यामागील वास्तविक प्रेरक शक्ती राहिल्या आहेत व तीच त्यांची अंतिम उद्दिष्टे पण आहेत हे दर्शन या दोन महापुरुषांना, द्रष्ट्यांना झाले. हे एक दुष्टचक्र आहे आणि ते छेदले नाही तर मानवजातीचा व माणुसकीचा विनाश अटळ आहे, या निष्कर्षाला ते आले.

हे दुष्टचक्र गतिमान करणाऱ्या भांडवलदार ('बूर्ज्वा') वर्गाचीही अवस्था अगतिक बनते, व हे चक्र त्याच्या स्वतःच्या गती व विकासशास्त्रानुसार फिरू लागते, आणि या चाकाच्या हँडलवरचा हात भांडवलदार वर्गालाही काढता येत नाही, ही गोष्ट मार्क्सच्या मार्मिक दृष्टीने हेरली. या चक्राच्या वेगवान फेऱ्यांमध्ये भरडला जाणारा वर्ग संघर्षाच्या मार्गाने भांडवल-दारांच्या हातून प्रभुत्व व नियंत्रण काढून घेईल असे भाकीत त्याने केले. भांडवलदार वर्गाचे प्रभुत्व व नियंत्रण नष्ट करावयाचे म्हणजे केवळ सत्तांतर करावयाचे नाही तर हे दुष्ट चक्रही तोडावयाचे हे जरी गृहीत असले तरी, प्रत्यक्ष व्यवहारात सर्व लक्ष चक्र फिरते ठेवण्याची सत्ता हस्तगत करण्यावर केंद्रित झाले. असे मानले गेले की, हँडल जर कामगारवर्गाचे नेतृत्व व प्रतिनिधित्व करणाऱ्या पक्षाच्या हाती आहे तर चक्राच्या फेऱ्यांमधून दुष्ट परिणाम घडून येणे थांबेल, आणि नफेखोरीचे रूपांतर सहजच व अटळपणे सर्वांच्या हितासाठी वापरल्या जाणाऱ्या 'वाढाव्या'त होईल. खुद्द मार्क्सची समज इतकी उथळ नव्हती असे मानण्यास जागा आहे. पण इतके तर खरेच की, मार्क्सने 'उत्पादक शक्तीं'चा (म्हणजे आजच्या परिभाषेत 'विज्ञान-तंत्रविज्ञाना'चा) मानवाला मुक्त करणाऱ्या शक्ती म्हणून केलेल्या गौरवाचा, या घटकाला दिलेल्या मध्यवर्ती महत्त्वाचा परिणाम असा झाला की, आत्ताआत्तापर्यंत आधुनिक कालखंडातील 'विज्ञान-तंत्रविज्ञाना'ची, उत्पादक शक्तींची मार्क्सपद्धतीला अनुसरून इतिहासविशिष्ट (हिस्टरीस्पेसिफिक) चिकित्सा मार्क्सवादी मंडळींनी केली नाही.

सत्ता व मत्ता यांच्या लालसेमधून, अमर्याद उप-भोगाच्या लालसेमधून आकारास आलेल्या या विशिष्ट ऐतिहासिक रूपातल्या उत्पादक शक्तींना जो कोणी राबवील त्याची बोली काहीही असली तरी त्या राबवणुकीतून तेच परिणाम निष्पन्न होत राहणार; या विषवृक्षाला अमृताची फळे

लगडणार नाहीत, हे महात्मा गांधींचे विश्लेषण मार्क्सच्या मांडणीला अधिक नेमके व प्रगल्भ बनविणारे आहे.

मोठी लोकसंख्या असलेल्या 'तिसऱ्या' जगातील देशांमधल्या गोरगरीब लोकांना नियमित उत्पादक रोजगार देऊन त्यांचे जीवनमान उंचावायचे असेल तर अत्याधुनिक उच्च तंत्रावर आधारित मोठे कारखानदारी उद्योग उभारण्याने हे उद्दिष्ट कधीच साध्य होणार नाही; कारण मूलतः श्रमिकांची संख्या कमी करून उत्पादन वाढविणे हे उच्च-तंत्रामागील सूत्र आहे. म्हणून उत्पादक रोजगार पर्याप्त प्रमाणात निर्माण करण्याच्या दृष्टीने उचित असे तंत्रविज्ञान वापरावे हा विचार अलीकडच्या काळात शूमाखर यांनी प्रभावीपणे मांडला. 'इंटरमीजीएट टेक्नॉलॉजी', 'ॲप्रोप्रिएट टेक्नॉलॉजी', 'स्मॉल इज ब्युटिफुल' हे शब्दप्रयोग त्यांच्यामुळे रूढ झाले. उच्च-तंत्रावर आधारित अत्याधुनिक स्वयंचलित उद्योग उभारण्यासाठी लागणाऱ्या भांडवलाच्या तुटवड्याच्या समस्येवरही यात प्रभावी तोडगा सापडू शकत होता. विषम, अन्याय व शोषक जागतिक अर्थव्यवस्थेच्या अजगरी विळख्यात सापडण्यातून गरीब देश वाचू शकणार होते. स्थानिक पातळीवर लोकांच्या पायाभूत, प्राथमिक गरजांची 'स्वदेशी'च्या व 'शेजारधर्मा'च्या तत्त्वांवर पूर्तता करण्यावर या भूमिकेचा भर होता. स्थानिक साधनस्रोत, स्थानिक श्रमशक्ती व स्थानिक गरजा यांचा मेळ घालण्याचे महत्त्व या भूमिकेत प्रतिपादलेले होते.

अलीकडच्या काळात सधन व प्रगत देशांमध्येही गरिबी बेकारी व शोषण यांचे प्रश्न सुटलेले नाहीत ही गोष्ट लक्षात आलेली आहे. देशांतर करून, 'तिसऱ्या जगा'तून देशांतर करून सधन व प्रगत देशांमध्ये जाणारा, तेथे कष्टाची कामे करून पोट भरणारा एक वर्ग अनेक देशांमध्ये अस्तित्वात आलेला आहे. यांचे विशेष शोषण होत असते, अशीही माहिती समोर येत आहे. म्हणजे, सर्वांना काम व मुक्त जीवनमान मिळवून देण्याच्या दृष्टीने विकासाच्या आधुनिक प्रक्रियेच्या अंगभूत मर्यादा खुद्द या अर्थव्यवस्थांच्या संदर्भातही उघड्या झाल्या.

४

औद्योगिक क्रांतीनंतरच्या काळातल्या तंत्रवैज्ञानिक घडामोडींनी माणसाला निसर्गसृष्टीपासून मनाने हळूहळू दूर नेले आहे. विशेषतः सजीव सृष्टीपासून. शहरी माणसाचा सजीव सृष्टीशी जिवंत व घनिष्ठ संपर्क कमीकमी होत चालला आहे. आपल्या वापरातल्या जास्त जास्त वस्तू कारखान्यांमध्ये तयार होऊन, कागदी, प्लॅस्टिक वा काचेच्या खोक्या/बाटल्यांमधून बाजारात विकत मिळतात. दूध, अंडी, अन्नधान्य यांसारखे पदार्थही अशा पद्धतीने मिळतात की, जणू सर्वस्वी कारखान्यां-मध्येच त्यांचे उत्पादन अथपासून इतिपर्यंत केले असावे असे वाटावे. कृत्रिम रासायनिक स्वरूपात अन्नपदार्थ निर्माण करण्याच्या गोष्टी गंभीरपणे केल्या जाताना आपण पाहतो. आणि अशा प्रकारे तयार केलेल्या काही गोष्टी आपल्या प्रचारात आजही आलेल्या आहेत. जीवनसत्त्वांच्या गोळ्या, अनेक औषधे, टाटाचे मीठ अशी उदाहरणे देता येतील. या सगळ्यांचा परिणाम म्हणून कळत-नकळत अशी समज दृढ होत चाललीय की दैनंदिन भरणपोषण आणि समृद्धी यांच्यासाठी लागणाऱ्या प्राथमिक उत्पादनांसाठी नजीकच्या भविष्यकाळात आपल्याला निसर्गातील सजीव उत्पादनव्यवस्थेचा आधार अनावश्यक ठरेल. वेगवेगळी मूलद्रव्ये खनिजांच्या रूपांत अस्तित्वात आहेत, त्यांचे रूपांतर आपण हव्या त्या पदार्थांमध्ये तंत्रविज्ञानाचा वापर करून करू शकतो.

अर्थात आजच्या घडीला अत्यंत सधन व उच्च-तंत्रात प्रगत अशा राष्ट्रांनीही सजीव निसर्गसृष्टीचा आधार सोडलेला नाही. कापड, कागद, इमारती सामान, फर्निचर आदी गरजांच्या पूर्ततेसाठी जंगलांवरचे अवलंबन शून्यवत झाले आहे असे या राष्ट्रांच्या बाबतीतही दिसत नाही. त्यांना लागणारे अन्नही ते शेती व पशुपालनाद्वारेच निर्माण करीत आहेत. पण या धारेचा व्यवहारात परिणाम असा झाला आहे की सजीव सृष्टीतूनही, खाणींमधून खनिजे काढावीत तसा 'कच्चा माल' काढून घेणे चालले आहे. सजीव सृष्टीची उत्पादकता अन्योन्याश्रयी चक्रांच्या फिरत राहण्यावर, साखळ्यां-मधील दुवे टिकून राहण्यावर, घटकांच्या परस्परसंतुलनावर अवलंबून आहे ही गोष्ट विज्ञानाच्या पातळीवर माहीत असूनही चक्रे खंडित करण्याबद्दल, दुवे तोडण्याबद्दल, असमतोल निर्माण करण्याबद्दल आर्थिक वाढीची आधुनिक प्रक्रिया बेपर्वा व बेदरकार आहे.

पण जगातल्या वरचढ, श्रीमंत व उच्चतंत्रात प्रगत देशांचा व्यवहार स्वदेश व इतर जग यांच्याबाबतीत असमान आहे. हे सर्व देश साम्राज्यसत्ता आहेत आणि वासाहतिक शोषणाला ते सरावलेले, चटावलेले देश आहेत. सोवियत

रशिया आणि चीन हेही याच पद्धतीने व्यवहार करतात हे ध्यानात घेतले पाहिजे. परिणाम असा झालाय, की 'तिसऱ्या जगा'तील अनेक अर्थव्यवस्था व समाज यांचे अस्तित्वच संकटात सापडले आहे. कारण हे समाज आजही प्रामुख्याने स्वतःच्या भूमीतील सजीव सृष्टीच्या उत्पादकतेवरच अवलंबून आहेत; जगभरचे साधनस्रोत ते ओरबाडून आणू शकत नाहीत. आर्थिक विकासाच्या आधुनिक भूमिकेचा अंगीकार करून विकास व प्रगती वेगाने साधण्याचे लक्ष्य समोर ठेवून त्यांनी सधन देशांतील स्वकीय व तज्ज्ञांच्या सल्ल्यानुसार आपल्या साधनस्रोतांचे सौदे करून स्वतःच्या हाताने स्वतःच्या पायावर धोंडा पाडून घेतला आहे. याची खरी झळ या 'विकसनशील'देशांमधील तळागाळाच्या वर्गाला व त्यातही गोरगरीब स्त्रियांना सर्वात अधिक सोसावी लागत आहे. या सर्व देशांमध्ये दुटप्पी अर्थव्यवस्था अस्तित्वात आल्या आहेत. एका बाजूला शहरे आणि दुसऱ्या बाजूला ग्रामीण भाग अशी विभागणी दिसून येते.

जगभर ग्रामीण भागातल्या तळागाळातल्या जनतेचे अस्तित्वच धोक्यात येण्याची प्रक्रिया अशी उग्र बनत गेलीय, की तीमुळे विकासाच्या आधुनिक भूमिकेवर व प्रक्रियेवर प्रश्नचिन्ह लागले आहे.

५

कळीचा एक प्रश्न विज्ञान-तंत्रज्ञानाचे वळण आणि वापर यांचा आहे. आपण वर पाहिले त्याप्रमाणे आधुनिक काळातील आर्थिक वाढविस्ताराचे मुख्य हत्यार 'उत्पादक शक्ती' राहिल्या आहेत.

मूठभर हिकमती, कर्तृत्ववान उद्योजक-व्यापारी यांच्या हाती सत्ता व मत्ता केंद्रित करण्याच्या दृष्टीने विकसित केल्या गेलेल्या 'उत्पादक शक्ती'चा अव्हेर करायचा म्हणजे त्या विशिष्ट तंत्रवैज्ञानिक शोधांमध्ये ग्रंथित विज्ञान नाकारावयाचे असा होत नाही हे खरे. पण 'वैज्ञानिक ज्ञाना'ची वैज्ञानिकता आणि त्या ज्ञानाचे स्वरूप व मर्यादा यापण तपासून घ्यायला हव्यात.

हा मुद्दा समजणे, पटणे फार अवघड जाते. याचे मुख्य कारण असे आहे, की आजच्या विज्ञान-तंत्रविज्ञानाने जी 'समृद्धी' निर्माण केली आहे तिची आपल्या मनावर विलक्षण पकड आहे. पुष्कळदा असे म्हटले जाते की, पूर्वीच्या काळी सम्राटांना, राजेरजवाड्यांनादेखील जी सुखे उपलब्ध नव्हती त्यांचा आज अनेकविध वस्तू व सेवा यांच्या उपभोगाद्वारा मध्यमवर्गीय माणसे आस्वाद घेऊ शकतात याचे सर्व श्रेय विज्ञान-तंत्रज्ञानाला आहे; तंत्रविज्ञानाच्या रूपाने सामान्य माणसाच्या दिमतीला, सेवेला अनेक गुलाम सदैव हजर असतात. या म्हणण्यात तथ्य नाही असे कोण म्हणू शकेल?

सुख, समृद्धी यांचा विचार करताना, या शब्दांच्या व्याख्या करताना आपल्या डोळ्यांसमोर राजेरजवाडे, धनिक हे आदर्श म्हणून असावेत येथेच ग्यानबाची मेख आहे. कोणाचेही शोषण न करता, कोणावरही अन्याय वा जुलुम न करता, कोणालाही कमी वाटा न देता प्रत्येकाला सुखी व समृद्ध जीवनमान उपलब्ध करून देण्याची गुरुकिल्ली म्हणजे आधुनिक उच्च-तंत्र अशी मांडणी केली गेली. पण आधुनिक विज्ञान-तंत्रज्ञान मूलतः, ऐतिहासिकदृष्ट्या व स्वभावप्रकृती दृष्ट्या, निसर्गसृष्टीचे आणि माणसांचे शोषण करण्यावरच उभारलेले आहे याचा प्रत्यय आज प्रकर्षाने येत आहे.

निसर्गसृष्टीची, विशेषतः सजीव सृष्टीची उत्पादकता प्रथम अभंग राखून आणि मग तीमध्ये निसर्गाच्याच रीतीनुसार भर घालून त्या मर्यादेत, आपला वाजवी तेवढाच वाटा घेण्याचे पथ्य सांभाळून काम करणाऱ्या विज्ञान तंत्रज्ञानाचा शोध भविष्यात आपणास घ्यावयाचा आहे. माणसाच्या रूपांत वा यंत्रांच्या रूपात पण 'गुलामां'करवी सेवा करून घेण्यात सुख-समृद्धी आहे ही मान्यताच यासाठी आपणास सोडून द्यायला हवी. वेगळ्या भाषेत हा मुद्दा मांडावयाचा तर, कोणत्याही पातळीवर, 'वाढावा हस्तगत' (सरप्लस एक्सट्रॅक्शन) करण्याच्या पद्धतीने आपली सुखसमृद्धी संपादित न करण्याचे पथ्य सांभाळले जाईल असे विज्ञान तंत्रज्ञान आणि अशी राजकीय आर्थिक व्यवस्था आपणास विकसित करावयास हवी.

उदाहरणार्थ, ऊर्जेच्या वापराचा मुद्दा घेऊ या. अंतिमतः पृथ्वीवरील सर्व जीवनाचा आधार सूर्यापासून मिळणारी ऊर्जा हा आहे असे विज्ञान सांगते. सूर्यापासून पृथ्वीला मिळणाऱ्या ऊर्जेपैकी अत्यंत अंश तेवढाच आज वापरला जातो. सौरऊर्जेचे रूपांतर वनस्पतींच्या साहाय्याने वा अन्य प्रकारे करून ऊर्जेची उपलब्धता वाढविण्याला पुष्कळ वाव आहे असे दिसते. यावर मर्यादा अशी की ऊर्जेची निर्मिती करताना तिच्या वापरातून पृथ्वीच्या जीवनधारणक्षमतेवर विपरित आघात होणार नाही हे पहावयास लागेल. अणूच्या पोटातील ऊर्जा मुक्त करून वापरण्याच्या संदर्भातही हेच पथ्य सांभाळायला हवे. तेच




पथ्य जलविद्युत व औष्णिक विद्युतनिर्मितीसही लागू आहे. हे पथ्य सांभाळून अधिक ऊर्जा उपलब्ध करून द्यावयाची असेल तर वैज्ञानिक संशोधन व तंत्र-वैज्ञानिक शोध या दोहोंचे वळण व रोख बदलतो. अभ्यासाच्या सोयीसाठी आपण तुकडे पाडून प्रयोगशाळेत कार्यकारणसंबंध प्रस्थापित करीत असलो तरी समग्र व्यवस्थेच्या दृष्टीने अन्योन्याश्रयामधून राखला जाणारा गतिमान समतोल आणि समग्र निसर्ग व्यवस्थेचे (पृथ्वीचे) स्वास्थ्य यांच्या चौकटीत ते आंशिक ज्ञान कोठे व कसे 'बसते' याचे भान सतत राखले जाईल. आंशिक ज्ञानाची आंशिकता, व म्हणून त्या ज्ञानाचा सरळसरळ वापर करण्याविषयीची मर्यादा यांची जाण हाही वैज्ञानिक ज्ञानाचा एक महत्त्वाचा व अंगभूत घटक मानला जाईल. याचा व्यावहारिक पैलू असा की, आंशिक ज्ञानावर तंत्रविज्ञान विकसित केले जाणार नाही. साकल्याने विचार करता त्याची गरज आहे की नाही, व ते उपकारक आहे की नाही या महत्त्वाच्या कसोट्या ठरतील.

शक्यता अशी आहे की भविष्यात सर्वसामान्य माणसे आजच्यापेक्षा जास्त ऊर्जा वापरतील; कारण त्यांच्या त्यांच्या ठिकाणी व परिसरामध्ये ऊर्जेची निर्मिती व साठवणूक करण्याच्या नैसर्गिक रीती त्यांनी हस्तगत केलेल्या असतील. त्याचबरोबर ही गोष्टही शक्य आहे, की बरीच वीज खर्च करून साध्य केल्या जाणाऱ्या अनेक गोष्टी वेगळ्याच प्रकारे साध्य करण्याची रीत उमगल्याने विजेच्या स्वरूपातील ऊर्जेची गरज आजच्यापेक्षा कमीपण होईल.

येथे आजच्या विकासाच्या नमुन्याचा आणखी एक घातक विशेष ध्यानात येतो. विजेच्या स्वरूपात ऊर्जेची निर्मिती वाढत जाणे व तिचा वापरही वाढत जाणे याच प्रगती, वाढ व विकास यांच्या कसोट्या बनतात व विजेचा वाढता वापर व सुखसमृद्धी यांचे समीकरण घातले जाते. वीज हा ऊर्जेचा एकमेव प्रकार नाही, ऊर्जा हेही एक साधन आहे आणि सुख व समृद्धी यांचा ऊर्जा या साधनाचा संबंध नेहमी साधनाला गौणत्व देणारा असला पाहिजे. (म्हणजे साध्यानुरूप साधन असायला हवे, साधनानुरूप साध्य निश्चित होता कामा नये) हे भान आजची विकासविषयक भूमिका विसरायला लावणारी आहे. तंत्र माणसाला गुलाम बनवते ते असे.

तात्पर्य असे की, भारतासारख्या गरीब व विषम समाजातदेखील मध्यम व उच्चभ्रू वर्गांच्या अंगवळणी पडलेल्या 'सुख-समृद्धी'ची, यंत्रतंत्राची हमी देणाऱ्या विकासाच्या नमुन्याला बांधिलकी व्यक्त करणे शक्य नाही याचा अर्थ आधुनिकपूर्व काळातील जनसामान्यांच्या काबाडकष्टी व अस्थिर जीवनसरणीचे पुनरुज्जीवन असा घेण्याचे काही कारण नाही. विज्ञान-तंत्रविज्ञान यांना भविष्यात काम आहेच. उत्पादक शक्तींचा तोंडावळा व रोख अगदी वेगळा असेल ही गोष्ट मात्र खरी.

६

दुसरा मुद्दा आहे तो वासाहतिक शोषणाच्या शिवाय विकास साधण्याचा. वासाहतिक शोषण एक देश दुसऱ्या देशाचे करतो असेच केवळ नाही. देशांतर्गतही आज याच पद्धतीने विकास चालू आहे. कारण आधुनिक विकासाची प्रक्रिया शोषणाद्वारा 'वाढावा' निर्माण करीत राहण्यावरच उभारलेली आहे.

या संदर्भातला आजचा कळीचा प्रश्न आहे विकासाच्या ओघात विस्थापित वा उद्ध्वस्त होणाऱ्या लोकांच्या मानवी प्रतिष्ठेचा व अधिकारांचा. मोठी धरणे, खाणी, आण्विक ऊर्जा प्रकल्प व अशाच अनेकानेक विकास प्रकल्पांमुळे विस्थापित केल्या जाणाऱ्यांचाच यात केवळ समावेश नाही. आपापल्या पिढीजांत खेड्यांमध्ये कामधंदा न उरल्याने, शेती उजाड बनल्याने, कामाच्या शोधात शहरांमध्ये वसतीस येणाऱ्यांचाही यात समावेश आहे. वर्षातून काही महिने स्थलांतर करणाऱ्या ऊसतोडणी कामगार - कुटुंबांचाही यात समावेश आहे. तसा पोटापाण्यासाठी नव्याने कायम भटके जीवन पत्करावे लागलेल्यांचाही.

अनेकांना बेदखल केले जाते तर अनेक स्वतःच घरेदारे, गावे सोडून जातात. जे स्वेच्छेने स्थलांतर करतात त्यांनी ते स्वेच्छेने केलेले असल्याने ती गोष्ट 'स्वतःची परिस्थिती सुधारण्यासाठी, विकासासाठी दाखविलेला अभिक्रम' या सदरात टाकली जाते. आधुनिकतेच्या समाजशास्त्रात 'सामाजिक चलनवलन' असे नाव या घडामोडीला दिले जाते. ही आधुनिकतेची, प्रगतीची, विकासाची खूण मानली जाते.

विस्थापितांबद्दल तर समाजात सहानुभवाचा अभावच आढळतो. विशेषतः विस्थापित हे तळागाळातले खेडूत वा आदिवासी असतील तर. राष्ट्राच्या विकासासाठी काही लोकांना किंमत द्यावी लागणारच व त्यांना ती द्यायला भाग पाडण्यात काही गैर नाही अशी भूमिका घेतली जाते.

राष्ट्रासाठी, सर्वांच्या व्यापक हितासाठी व्यक्तींनी,






काही समूहांनी त्याग करण्याची तयारी ठेवावयास हवी अशी भूमिका घ्यावयास हरकत नाही. पण समजून उमजून स्वयं-निर्णयाने केला तरच तो त्याग ठरतो. त्याग करावयाचा देखील कर्तव्य व अधिकार माझा असतो. ज्यांनी त्याग करावा अशी अपेक्षा असते त्यांना मग, राष्ट्राचे म्हणजे कोणाचे हित व ते कसे, आणि राष्ट्रातील इतरेजन त्यांच्याप्रमाणेच कोणता त्याग करीत आहेत, असे प्रश्न उपस्थित करण्याचा अधिकार पोचतो. आज हा अधिकार दिलेला नाही.

समाजाचा कारभार चालवावयाचा तर प्रसंगी सक्तीने काही गोष्टी राज्याची धुरा वाहणाऱ्यांना कराव्या लागतात. त्या करणे त्यांचे कर्तव्य असते व तो अधिकार लोकांनीच राज्यकर्ते म्हणून निवड करताना त्यांना दिलेला असतो, असा युक्तिवाद करता येईल. हा युक्तिवाद मान्यही करण्यात अडचण नाही. पण समतेचे तत्त्व आपण स्वीकारलेले असेल तर अशी सक्ती केली जाण्यात भेदाभेद केला जात नाही हे काटेकोरपणे पाहिले जावे अशी अपेक्षा असेल. दुसरी गोष्ट अशी की, सक्ती करण्याची गरज आहे ही गोष्ट ज्यांच्यावर सक्ती केली जाते त्यांनाही मनोमन पटली पाहिजे.

उदाहरणार्थ, आपण नर्मदेवर बांधल्या जाणाऱ्या सरदार सरोवर धरणाने विस्थापित होणाऱ्यांचा विचार करू. सक्तीने गावेच्यागावे उठविणे समर्थनीय कधी ठरेल, असा प्रश्न उपस्थित होईल. आपली गावे, घरेदारे, जमिनी राजीखुशीने सोडण्यास तयार न होण्यात स्वार्थीपणा आहे, स्वार्थीपणातून उत्पन्न होणारा अडमुठा कोतेपणा आहे, ही गोष्ट डूबक्षेत्रातील हजारो माणसांना पटवून देता आली पाहिजे. याचा अर्थ असा की जी ध्येये याही लोकांनी स्वीकारलेली आहेत, जी मूल्ये व तत्त्वे यांच्यावर त्यांची निष्ठा आहे त्याच तत्त्वांच्या, मूल्यांच्या व ध्येयांच्या कसोटीवर धरणास विरोध करणे असमंजसपणाचे व तत्त्वशून्य आहे हे दाखवून देता आले पाहिजे. आपल्या अंगचा सद्सद्विवेक धरणाच्या समर्थक शासनाचा युक्तिवाद खोडून काढू शकत नाही. आणि तरीही आपण विरोध करीत आहोत याचे भान विचारी व प्रामाणिक लोकांमध्ये उत्पन्न झाल्याचे प्रत्ययाला आले पाहिजे. सक्ती करण्याचा नैतिक अधिकार असलेल्या व्यक्तींनी - राज्यकर्त्यांनी - आपणावर सक्ती करणे योग्यच आहे असे मनोमन पटले पाहिजे.

'राष्ट्रीय स्वयंनिर्णाया'चे तत्त्व ब्रिटिशांच्या उदारमत-वादी विचारप्रणालीचे एक अंगभूत तत्त्व होते आणि हे तत्त्व ब्रिटिश साम्राज्य सत्ता भारतीयांना नाकारू शकत नाही, असे स्वातंत्र्यलढ्याचे नेतृत्व करणाऱ्यांचे म्हणणे होते. सत्ता गाजविणाऱ्या अनेक ब्रिटिश राज्यकर्त्यांनाही हा युक्तिवाद खोडून काढता येत नव्हता. भारतीयांचा स्वातंत्र्यलढा योग्य व समर्थनीय आहे याची कबुली त्यांच्याकडून मिळतही होती. त्याचवेळी दुसरीकडे या संपूर्ण कालखंडात इतर अनेक ब्रिटिश अधिकाऱ्यांची व राजकारण्यांची भूमिका अशी होती की, तत्त्व, सद्सद्विवेक हे मुद्दे गैरलागू आहेत; आपण हिंदुस्थानचे राज्य तलवारीच्या जोरावर संपादित केले आहे व म्हणून स्वतःच्या स्वार्थासाठी भारतीय लोक व भारतातील साधनसंपत्ती यांचा वापर करून घेणे हा आपला अधिकारच आहे. मात्र न्यायाने, घरेदारे, जमीनजुमला, गावे - प्रदेश सोडून दूरवर जाणे, बरेच काही गमावणे याला विरोध करणे, स्वार्थाच्या विरोधी असले तरी त्याची तयारी दाखवणे उच्चतर नैतिक कर्तव्य आहे असे विस्थापितांपैकी विचारी व तत्त्वनिष्ठ मंडळींना पटवून देता आले पाहिजे.

शासनाने प्रकल्पाला मंजुरी दिली आहे याचा अर्थ तो प्रकल्प राष्ट्रहिताचा आहे असे जणू काही सिद्ध झाले आहे असे मानले जाते. आणि शासनाने प्रकल्पग्रस्तांना नुकसानभरपाई दिली की विस्थापितांच्या संदर्भातले शासनाचे कर्तव्य संपले असेही मानले जाते.

राष्ट्रहिताच्या नावे घेतल्या जाणाऱ्या प्रकल्पाने सामान्यतः समाजातील काही व्यक्ती, गट व समूह यांना फायदा होणार असतो. प्रकल्पउभारणीच्या टप्प्यापासून काहींच्या पदरात लाभ पडण्यास सुरुवात होते. ही गोष्ट ध्यानात घेऊन 'राष्ट्राचे हित' या मोघम मांडणीचे खोलात जाऊन पृथक्करण करू लाभ पदरात पडणाऱ्यांची ओळख पटवून घेतली पाहिजे. एकाचा लाभ हा दुसऱ्याची हानी अशी स्थिती जर होणार असेल तर तो अन्याय तर आहेच, पण असे होऊ देण्याचे समर्थनही होऊ शकत नाही.

नर्मदेवरील सरदार सरोवर धरणाचे लाभ कोणाला मिळणार आहेत हे चांगलेच स्पष्ट आहे. राष्ट्रहितासाठी त्याग करायला, सक्तीने बेदखली मान्य करण्याला मान्यता द्यायला ज्यांना भाग पाडले जात आहे त्यांनी जर प्रश्न केला की, राष्ट्रहितासाठी सर्वांनाच समानत्वाने त्याग करावयास भाग का पाडले जात नाही, तर ते योग्यच ठरते. म्हणजेच, विकासप्रकल्पांच्या बाबतीत तरी, विकासप्रकल्पांमुळे सर्वांचा






लाभच झाला पाहिजे, झालेला दिसला पाहिजे ही गोष्ट एक तत्त्व म्हणून मान्य व्हायला हवी. जर राष्ट्रहितासाठी विकास प्रकल्प असेल तर त्या राष्ट्रहितामध्ये आमचाही रास्त वाटा असला पाहिजे, आणि तो आमच्या पदरात पडेल अशी आमची खात्री पटली पाहिजे, अशी विस्थापित होणाऱ्यांना हक्काने मागणी करता आलीच पाहिजे.

दुर्दैवाने, विस्थापितांचे उदार शर्तींवर पुनर्वसन करण्यास कबुली दिल्याने लोकांना विस्थापित करण्याचा आपणास हक्क पोहोचतो अशी नवी भूमिका शासन घेत आहे. व्यवहारात या उदार शर्तींची अंमलबजावणी नीट होत नाही व अनेकांचे हाल वर्षानुवर्षे चालतच राहतात. यात वास्तविक आश्चर्य वाटण्याचे काही कारण नाही. कारण अनेकांना लुबाडून, वंचित करून, दडपून, उद्ध्वस्त करूनच विकास व समृद्धी या गोष्टी साध्य केल्या जात असतात. इंग्लंडमधील औद्योगिक क्रांती भारताच्या लुटीमुळे शक्य झाली हा इतिहास ताजाच आहे. सरदार सरोवर धरणाच्या बाबतीतही धरणग्रस्तांच्या संघटनांनी सतत तीनचार वर्षे योग्य पुनर्वसन होईल याची खात्री करून घेण्याचा अथक प्रयत्न केला. अखेरीस आज ही गोष्ट उघड झालीच की, मान्य केलेल्या अटींवर पुनर्वसन अशक्य आहे. म्हणून, कोणत्याही समाजाचा कारभार सुरळीत चालावयाचा असला तर प्रसंगी सक्ती करण्याची सत्ता राज्यकर्त्यांच्या हाती द्यावी लागते हे मान्य केल्यावरही, कोणाला ना कोणाला तरी उद्ध्वस्त व वंचित करून, लुबाडून विकास साधण्याच्या प्रक्रियेविरुद्धच ठाम भूमिका घ्यावयास हवी. विस्थापित होण्याची ज्यांच्यावर पाळी येणार आहे त्यांची खातरजमा होऊन त्यांनी संमती दिल्याखेरीज विस्थापित करण्याचा शासनालाही अधिकार नाही, अशी भूमिका घेतली पाहिजे. नागरिकांच्या मूलभूत हक्कांमध्येच या हक्काचा समावेश झाला पाहिजे.

७

विकास व समृद्धी साध्य करण्याची पर्यायी रीत व साधने खरोखरच उपलब्ध आहेत का?

विकास व वाढ या शब्दांचे अर्थ तपासून, सुधारून घेण्यापासून सुरुवात करावी लागते. निसर्गात प्राणी, झाडे, अगदी माणूस जरी घेतला तरी आपणास काय आढळते? मूल लहानाचे मोठे होताना त्याच्या शरीराची वाढ होते, पण एका वयात ही वाढ पूर्ण होते. उंची आयुष्यभर वाढत जात नाही. वजनही जर सतत वाढत गेले तर ती विकृतीच मानली जाईल. शारीरिक वाढ पूर्ण झाल्यावर शरीराचे स्वास्थ्य राखणे हाच शरीराच्या संदर्भात विकास, वाढ, समृद्धी यांचा अर्थ आपण करतो. कार्यशक्ती, उत्साह, जोम, प्रसन्नता, निरोगीपण अशा वेगळ्या कसोट्यांवर आपण निवाडा करतो. व्यक्तित्वाचा विकास ज्ञान, कर्तृत्व, लौकिक जीवनात व्यावसायिक यश, सिद्धी या अंगाने व्हावा अशी अपेक्षा बाळगतो. पण जर एखादा माणूस केवळ पैसाच कमाविण्याच्या मागे लागला, सत्ता केंद्रित करत सुटला व त्यात यशस्वीही होत राहिला तर त्याचे कर्तृत्व मान्य करीत असताही आपण असंतुलित, संकुचित व विकृतीकडे झुकणारे व्यक्तित्व म्हणून त्याच्याकडे पाहतो. सात्त्विकतेची व्याख्या, शहाणपणाची संकल्पना, सुसंस्कृततेची कसोटी आपली प्रत्येकाची वेगळी असेल. पण आपल्या कसोटीनुसार, व्याख्येनुसार, संकल्पनेनुसार माणसाने उत्तरोत्तर सात्त्विक, शहाणे व सुसंस्कृत बनावे अशी आपली अपेक्षा असते. समाजाच्या संदर्भातही हीच गोष्ट खरी आहे.

भौतिक वस्तूंच्या उत्पादनात व सेवनात सतत वाढ होत जाणे म्हणजे विकास व समृद्धी, आणि अशी वाढ अमर्यादपणे कायमची होत राहणे म्हणजे आदर्श व्यवस्था, या मान्यतेतील असमंजसपणा व विकृती आज सनातनी, पारंपरिक अर्थशास्त्र्यांनाही उघड होत आहे. अन्य दिशांनी समाजाचा विकास होण्यासाठी आवश्यक तेवढी ऐहिक जीवनाविषयीची निश्चिंतता आणि भरणपोषणाची पातळी यांना खरे महत्त्व आहे. तसेच, अन्य दिशांनी विकास होण्यासाठी निवांत सवड मिळायची व त्या प्रकारच्या विकासावर लक्ष व शक्ती एकाग्र व्हायची असेल तर भौतिक वस्तू व सेवा यांच्या उत्पादनात व सेवनात वाढ होण्याचे एका टप्प्यावर जवळपास पूर्णपणे थांबायला हवे. उंची व वजन यांच्या वाढीशी तुल्यबल अशी ही गोष्ट आहे.

विकास व समृद्धी यांच्याविषयीची दृष्टी, या शब्दांचे अर्थ तर बदलायला हवेतच. विकास व समृद्धीची एक श्रेणीही मान्य व्हायला हवी, क्रमशः टप्पे/अवस्था गाठण्याचीही कल्पना करायला हवी. समाजातील सभासदव्यक्तींची वाटचाल, शारीरिक वाढ पूर्ण झाल्यावर, बुद्धी, मन, व आत्मतत्त्व यांच्या विकासाच्या दिशेने व्हायला हवी, तशी ती होण्यासाठी अनुकूल भौतिक व अधिभौतिक स्थिती समाजाची निरंतर टिकवून धरणे हे








अनुक्रमणिका

समाजाच्या पातळीवर लक्ष्य राहावयास हवे.

समाजातील यच्चयावत सर्वांच्या, निरपवादपणे, शरीराच्या पूर्ण वाढीच्या व स्वास्थ्याच्या दृष्टीने आवश्यक त्या गरजांची पूर्तता होत राहील इतके उत्पादन निरंतर होत राहील अशी अर्थव्यवस्था उभारण्यास प्राथमिक व पायाभूत महत्त्व आहे. कोणते उत्पादन गरजेचे आहे, कोणते अत्यावश्यक पायाभूत गरजेचे नसले तरी स्वागतार्ह ठरेल आणि कोणते निश्चित अपायकारक व आक्षेपार्ह आहे हा विवेक करावाच लागेल. अत्यावश्यक, स्वागतार्ह, आक्षेपार्ह या सीमारेषा कदाचित बदलत्याही राहतील. पण, मानवी शरीराची रचना स्थिर आहे ही गोष्ट लक्षात घेता, हेही जाणले व स्वीकारले पाहिजे की, त्यांच्यात एक स्थायीपणा आहे. ही स्थायी रेषा ध्यानात ठेवून अर्थव्यवस्थेची उभारणी करणे व ती कार्यरत ठेवणे ही 'चिरस्थायी विकासा'ची भूमिका आहे. 'चिरस्थायी विकासा'च्या प्रचलित मांडणीत निसर्गसृष्टीच्या मर्यादेचा विचार केला जातोच असे नाही. नियतकालिक पुनर्निर्मितिक्षम साधनस्रोतांच्या मर्यादेत विकासाचा वेग राखणे, पर्यावरणाचा समतोल ढासळणार नाही याची सावधानता बाळगणे, या अंगाने अधिक विचार होतो. सावध दक्षता, व्यावहारिक शहाणपण यांचा भाग यात जास्त आहे. भौतिक जीवनमानात, उपभोग व सेवन यांत सतत वाढ करण्याचे मध्यवर्ती लक्ष्य टिकूनच राहते. निसर्गसृष्टीशी संवादी राहण्याचे व निसर्गसृष्टीच्या धारणक्षमतेच्या मर्यादेत राहण्याचे तत्त्व जर पूर्णपणे मान्य केले तर ह्या अर्थव्यवस्थेला एक चिरंजिवित्व प्राप्त होते. निसर्गसृष्टीत जी गतिमान उत्क्रांतीची प्रक्रिया क्रियाशील आहे तिच्याशी एकरूपत्व साध्य करण्याचे लक्ष्य राहील. गतिमान उत्क्रांतीची प्रक्रिया अखंडित राहणे हाच विकास अशीही नवी व्याख्या असेल. याचा विचार केला तर 'काव्यशास्त्रविनोदा'च्या निर्मितीची त्याची क्षमता हा जसा विशेष लक्षात येतो, तसे मन व बुद्धी यांच्या पलीकडे जाणारे एक तत्त्व त्याच्या ठायी आहे आणि या तत्त्वात माणसाच्या नैतिकतेचा, सद्सद्विवेकाचा उगम आहे.

मानवी जीव, शरीर, मन व बुद्धी यांच्या पातळीवर राहते तोवर ते 'अपघाती योगायोग व यांत्रिक अनिवार्यता' यांच्या चौकटीतच राहते. इतर सर्व सजीव सृष्टीही याच चौकटीत निर्माण झाली व उत्क्रांत होत आली आहे. या चौकटीला भेदून जाणारे जे तत्त्व माणसात आहे त्यामुळेच त्याच्या ठायी जे कर्तेपण आढळते ते इतर कोणत्या सजीवाच्या ठायी आढळत नाही. जगण्याच्या 'संघर्षा'च्या ओघात प्रकट होते ते कर्तेपण हे वरील चौकटीतलेच आहे. तेथे डार्विनप्रणीत 'नॅचरल सिलेक्शन'ची प्रक्रियाच घडत असते. अक्षरवाङ्मय, कलाकृती, संगीत, तत्त्वचिंतन व विज्ञान यांची निर्मिती ही या तत्त्वाशी- आत्मतत्त्वाशी निगडित आहे. रिचर्ड हॉफस्टेटर या संगणक शास्त्रज्ञाने या गूढ आत्मतत्त्वाला उद्देशून 'द माइंडस् आय' (The mind's I) असे म्हटले आहे.

'अहं ब्रह्मास्मि' असे सार्थपणे म्हणू शकणारे आत्मतत्त्व हे अशा रीतीने, माणसाचे वैशिष्ट्य आहे. चिरंजीवी अर्थव्यवस्था ('पर्मनंट इकॉनॉमी') इष्ट व वांछनीय अशासाठी पण आहे की या अर्थव्यवस्थेच्या चौकटीत आत्मतत्त्वाच्या आविष्काराला पूर्ण वाव व प्रोत्साहन राहील.



यद्यपि गांधीजी ने लोकतंत्र के लोक को मुख्यतत्त्व मानकर देश के नेताओं और जनता को उसी पर निष्ठा रखने के लिए कहा था। फिर भी मुल्क के दुर्भाग्य से देश उनकी बातों को समझा नहीं, बल्कि परम्परागत मान्यता के अनुसार लोकनिष्ठा पर ध्यान न देकर तंत्र पर ही निष्ठा रखी। अंग्रेजी राज्य में जनता कहती थी, 'अंग्रेज सरकार माई-बाप।' अब अंग्रेजोंके चले जाने पर अंग्रेज शब्द मिट गया और 'सरकार माई-बाप' हो गया। आज देश के नेता और जनता इस कदर तंत्रनिष्ठ बन गयी है की इनकी निगाह मे लोक का अस्तित्व ही मिट गया है। नेता को किसी तंत्र में अगर कोई पद नहीं मिलता है तो वह अपने में शून्यता अनुभव करता है, चाहे वह कितना ही योग्य मनुष्य हो। दूसरी तरफ कितना भी योग्य तथा प्रतिभाशाली व्यक्ती हो, अगर उसके पास किसी तंत्र का पद न हो तो कोई उसे प्रतिष्ठा देने को तैयार नहीं हैं। लोक के प्रति यहाँ तर उदासीनता हैं की उस व्यक्ती का नाम तक मिटाकर उसे पद पर से संबोधन करने लगता है। अब लोकतंत्र में लोगों का नाम थानेदार साहब, मजिस्ट्रेट साहब, मंत्रीजी, मैनेजर साहब आदि बन गया है। गांधीजी ने जो कांग्रेस के लोगों को सत्ता मे न जाकर लोक में फैल जाने के लिए कहा था, वह इसीलिए की देश की सर्वोत्तम प्रतिष्ठित जमात जब लोक बनकर लोक-समूह में शामिल होगी तो परम्परागत तंत्र प्रतिष्ठा के बदले लोकनिष्ठा का अधिष्ठान होगा। तभी ये प्रतिष्ठाप्राप्त लोक अपनी शक्ती से सैनिक शक्ती को दबाकर रख सकते है। आखिरी समय में उन्होने स्पष्ट रूप से कह दिया था की देश में लोकतंत्र की स्थापना के लिए नागरिक शक्ती और सैनिक शक्ती का संघर्ष अनिवार्य है।

- धीरेन्द्र मजूमदार

अग्रेसर सर्वोदय नेते






# प्रचलित विकासव्यूह : दुटप्पी अर्थव्यवस्था व जनसामान्यांची नाडणूक

ब्रह्मदेव शर्मा (अनुवाद : वसंत पळशीकर)

इतर सर्व प्राणिमात्रांप्रमाणे माणूसही निसर्गातला एक प्राणी म्हणून युगानुयुगे जगत आला. निसर्गाचे त्याचे आकलन वाढले आणि स्वतःच्या फायद्यासाठी निसर्गात कार्यरत 'शक्ती'चा उपयोग करून घेण्यात त्याला यश आले तसे त्याने निसर्गसृष्टीत स्वतःसाठी एक वैशिष्ट्यपूर्ण स्थान प्राप्त करून घेतले. त्याची तंत्रविद्या व नैसर्गिक साधनस्रोतांचा किफायतशीररित्या उपयोग करून घेण्याचे भान यांच्यावरून त्याला उपलब्ध असलेले वस्तुवैपुल्य ठरते. कंदमुळे, फळे इत्यादी अन्नपदार्थ गोळा करून व काही लहानमोठी शिकार करून जगणे या अवस्थेपासून आरंभ करून स्थिरपणे शेती करण्यापर्यंत प्रथम त्याची वाटचाल झाली. त्यानंतर आधुनिक औद्योगिक युगात त्याने प्रवेश केला आणि आता औद्योगिक युगाची अवस्था ओलांडून त्याही पलीकडच्या अवस्थेपर्यंत (पोस्ट-इंडस्ट्रिअल) त्याची मजल पोचली आहे. कसेबसे जिवंत राहण्यासाठी टिकून राहण्यासाठी आरंभी त्याची सर्व शक्ती खर्ची पडत होती. कालांतराने जेव्हा उपजिविकेसाठीच सारी शक्ती खर्च करण्याची गरज उरली नाही तेव्हा माणसाच्या जीवनाला एक नवे सुसंस्कृत परिमाण प्राप्त झाले. कमी वेळात व श्रमांत भरपूर उत्पादन करण्याइतकी क्षमता अर्थव्यवस्थेमध्ये निर्माण होत गेली तशी त्याला सांस्कृतिक निर्मितीसाठी जास्त जास्त अवसर सापडू लागला. फुरसतीच्या वेळाचा विस्तार उत्तरोत्तर वाढत गेला.

सुमारे तीनशे वर्षांपूर्वी पश्चिमी देशांमध्ये 'औद्योगिक क्रांती' या नावाने ओळखले जाणारे मन्वंतर घडून आले. या काळापर्यंत परिवर्तनाची गती अगदी मंद अशी होती. औद्योगिक क्रांतीच्या आरंभी प्राप्त झालेले तंत्रवैज्ञानिक सामर्थ्य वैज्ञानिक संशोधनाच्या साहाय्याने नंतरच्या काळात सातत्याने वाढत गेले आहे. निसर्गावरील प्रभुत्व उत्तरोत्तर अधिकाधिक परिपूर्ण करण्यासाठी या सामर्थ्याचा वापर केला गेला आहे. जीवनाच्या मूलभूत प्राथमिक गरजांची पूर्तता करण्यासाठीच तंत्रविद्येचा वापर करून माणूस थांबलेला नाही. गरजांच्या पलीकडे पोचणाऱ्या कामनांची पूर्तता करण्याकडे, इतकेच नव्हे तर चैनविलास व उधळमाधळ यांच्यासाठीही तंत्रवैज्ञानिक सामर्थ्य राबविले जाऊ लागले. पाश्चात्त्य देशांच्या / समाजांच्या स्थल-कालविशिष्ट अवस्थेतून, समस्यांच्या सोडवणुकीमधून व आकांक्षांच्या पूर्ततेमधून विकासाचा आजचा नमुना (मॉडेल) साकार झालेला आहे. पाश्चात्य जगातही हा नमुना काही विवक्षित क्षेत्रांमध्येच उत्कर्ष पावला, या क्षेत्रांमध्ये 'विकासा'ने शीग गाठलेली आढळते आणि ही शीग गाठण्याच्या ओघात याच नमुन्याचा विकास जगभर प्रसार पावला आहे. जेथे जेथे हे लोण जाऊन पोचलेय तेथे तेथे मूलभूत विकासाने तेच पाश्चात्त्य रूप धारण केले आहे. आधुनिक विकासाच्या परिचित शिष्टमान्य चौकटीला पायाभूत असलेल्या या पार्श्वभूमीची खास वैशिष्ट्ये जाणून घेणे आवश्यक आहे.

औद्योगिक क्रांतीला मध्ययुगीन सरंजामशाहीची पार्श्वभूमी होती. सत्तेचे केंद्रीकरण व राजाची अनियंत्रित स्वरूपातील सत्ता हा ईश्वरदत्त व्यवस्थेचाच एक भाग आहे हे तत्त्व सर्वमान्य होते. व्यक्तिस्वातंत्र्याच्या हक्कास खऱ्या अर्थाने या व्यवस्थेत मान्यता नव्हती, सामान्य जनांचे दैनंदिन जीवन हालाखीचे व कष्टाचे होते. ढोरमेहनत ही नित्याची सार्वत्रिक बाब होती. आणि उपासमारी पुष्कळ प्रमाणात अनुभवायला येत असे. तंत्रवैज्ञानिक शक्तीमधील वाढ झाल्याने या समाजातील सत्तास्थानी असलेल्या मूठभर मंडळींच्या जीवनात सुबत्तेच्या नव्या शक्यता निर्माण झाल्या. आसमंतातील नैसर्गिक साधन-संपत्तीवर या श्रेष्ठींची पकडही वाढलेली होती, व या परिस्थितीचा त्यांना फायदा झाला. नवी सुबत्ता या समाजातील थोड्यांच्याच वाट्याला आली. पण आशा पल्लवित होण्यात याचा परिणाम झाला. अर्थव्यवस्थेची पुनर्रचना घडून येण्यास या घडामोडी कारणीभूत ठरल्या. भांडवलशाही अर्थव्यवस्थेचा उदय झाला. क्रमाक्रमाने जगातील इतर सर्व राष्ट्रांमध्येही याच दिशेने अर्थव्यवस्थेची पुनर्रचना होत गेली. आजही संक्रमणाची ही प्रक्रिया चालू आहे.

परिवर्तनाच्या या प्रक्रियेचे दोन पैलू नीटपणे व नेमकेपणाने ध्यानात घेण्याची आवश्यकता आहे. ही घडामोड

एका विवक्षित क्षेत्रात व परिस्थितीत घडली. या घडामोडीतून जागतिक पातळीवर जे पुनर्घटन घडून आले ते दुटप्पी होते. म्हणजे, औद्योगिक क्रांतीच्या प्रवर्तक पश्चिमी राष्ट्रांमध्ये घडून आलेले स्थित्यंतर आणि पुनर्रचना एका प्रकारची होती तर या राष्ट्रांच्या प्रभुत्वाखाली आलेल्या समाजांचे पुनर्घटन वेगळ्या प्रकारचे होते. या दोन पुनर्रचना एकमेकींशी संबंधित, परस्परावलंबी पण असमान, विषम स्वरूपाच्या होत्या, मुळात ज्या समाजांमध्ये औद्योगिक क्रांती घडून आली तेथे आरंभाला, तिचा परिणाम म्हणून, समाजाची एकसंधता भंग पावली; चिरफाड होण्याइतका विसंवाद उत्पन्न झाला. पण दुटप्पी विकासप्रक्रियेचे लाभ जसे या प्रवर्तक समाजाच्या पदरात पडू लागले तशी ही दरी परत लौकरच सांधली गेली. लोकसंख्येचा विस्फोट या देशांमध्ये घडून आला. या वाढत्या लोकसंख्येचा काही भाग नव्याने शोध लागलेल्या अमेरिका, ऑस्ट्रेलिया, आफ्रिका खंडांमध्ये स्थलांतरित होऊ शकला. पृथ्वीच्या या भूभागांवर वस्ती करून राहिलेल्या लोकसमूहांना, आदिवासी जमातींना हटवून, त्यांना 'सभ्य' करून प्रवर्तक देशांमधील स्थलांतरितांनी हे 'नवे मोकळेच पडलेले' जग स्वतःसाठी पादाक्रांत केले. प्रवर्तक देशांच्या अर्थव्यवस्था साधनसमृद्ध बनविण्यासाठी या नव्या जगातील साधनसंपत्तीचा मक्तेदारीने उपयोग करून घेण्याच्या वाटा मोकळ्या करून घेतल्या गेल्या. मानवेतर ऊर्जेवर चालणाऱ्या नव्या यंत्राधिष्ठित तंत्रांचे उत्पादक सामर्थ्य पूर्णपणाने कामी आणण्यासाठी मोठी लोकसंख्या असलेल्या वसाहतींमधील बाजारपेठा काबीज करण्याची गरज होती. ज्या व्यवस्था वा रचना या अतिक्रमणाचा तत्कालीन परिस्थितीत वा दूरदृष्ट्या प्रतिकार करू शकत होत्या वा अतिक्रमणाशी स्पर्धा करू शकत होत्या त्या निर्दयपणे उद्ध्वस्त केल्या गेल्या. या दुटप्पी अर्थव्यवस्थेचा लाभ ज्यांच्या पदरात पडत होता त्यांना संरक्षण देण्याच्या दृष्टीने राष्ट्र-राज्यांच्या नव्या रचनेद्वारा आवश्यक त्या निर्बंधात्मक उपाययोजना केल्या गेल्या. व्यापारविषयक निर्बंध व जकात-कर यांच्या द्वारा ही गोष्ट साधली गेली. साम्राज्यसत्तांची अर्थव्यवस्था तिला हवे तसे वसाहतींमधील अर्थव्यवस्थांना राबवून घेण्यास पूर्णपणे सक्षम आणि मोकळी ठेवली जात असतानाच स्वतःच्या अर्थव्यवस्थेच्या निम्नस्तरांवर देखील वसाहतींमधील अर्थव्यवस्थेचा प्रभाव पडणार नाही अशी खबरदारी घेतली गेली. तंत्रवैज्ञानिक ज्ञान व कौशल्ये यांचा विश्वविस्तारही आजवर अशा दुटप्पी पद्धतीनेच केला गेला आहे की, ज्यामुळे जागतिक अर्थव्यवस्थेमधील हे दुटप्पी वैशिष्ट्य राखले गेले आहे, ते अधिक मजबूत झाले आहे.

विकासविषयक या प्रचलित शिष्टमान्य चौकटीचा आणखी एक महत्त्वाचा पैलूही ध्यानात घेण्यासारखा आहे. प्रवर्तक देशांचा आर्थिक विकास घडून आल्याने जे वातावरण निर्माण झाले आणि त्यासोबत जीवन व समाजाचे भविष्य यांबद्दलच्या ज्या धारणा या देशांमध्ये रुजल्या त्यांच्याशी या पैलूचा संबंध जोडता येतो. त्यावेळी विकासाचा जो संदर्भ होता त्यातून निष्पन्न होणारा तर्क असाच होता की बदलाची दिशा तीच एक असते व बदल एका रेषेत सतत चढत्या श्रेणीने होत जातो. तंत्रवैज्ञानिक शोधांमुळे माणसाची ढोरमेहनत वाचली आणि काबाडकष्ट टाळणेही त्याला शक्य झाले. हा बदल ठीक असाच होता. पण यंत्रांच्या विकासाची दिशा श्रम अधिकाधिक हलके करण्याची होती आणि अंतिमतः श्रम करावेच लागू नयेत, माणसे सर्व प्रकारच्या काम करण्याच्या कटकटीतून पूर्ण मुक्त व्हावीत हे यंत्रांच्या विकासाचे अंतिम साध्य ठरले. जिवंत राहण्यासाठी अखंड परिश्रम करण्यातच गुरफटून राहणे माणसाला भाग होते त्या अवस्थेतूनच माणूस बाहेर पडला. सुखवस्तू जीवन जगण्यासाठी उपयोगी अशा विविध वस्तू व सुविधा त्याला आता प्राप्त होऊ लागल्या. पण या प्रक्रियेत नवी उत्पादनव्यवस्था इतकी बलिष्ठ झाली की तिने सारी व्यवस्थाच आपल्या कबजात घेतली. चैनीत जगणे तिने शक्यतेच्या कोटीत आणले; इतकेच नाही चैनविलास करणे इष्ट आहे असाही संस्कार रुजविला. निरर्थक असले तरी केवळ गंमत म्हणून वस्तू वापरून फेकून देणे, साधनसंपत्तीचा चुराडा करणे शक्य असेल ती अवस्था श्रेष्ठतम अशी धारणा उत्पन्न झाली. व्यवस्था सर्वंकष सत्ताधीश व सार्वभौम बनली व माणसे माणूसपणाला पारखी झाली; व्यवस्थेच्या सोयीनुसार व सांगण्यानुसार जीवनाचा घाट निश्चित केला जातो व माणसांना तोच आवडावा, हवासा वाटावा असे त्यांचे मानस घडविले जाते. या घडामोडीला समांतर अशी दुसरी एक घडामोड आपण पाहू शकतो. पूर्वी राजाच्या भोवती जसे ईश्वरी वलय लोक पाहत व त्याची अनियंत्रित सत्ता मनःपूर्वकतेने स्वीकारीत तशी आज राज्यसंस्थेची सर्वंकष अभिसत्ता 'ईश्वरदत्त' म्हणून स्वीकारली जात आहे. सांख्यिकी आकडेमोडीतला एक घटनाक्रमांक इतपतच माणसाला अस्तित्व उरले आहे.

व्यक्तित्वसंपन्न कर्ताकरविता हा त्याचा दर्जा लोप पावला आहे. तुरुंगात कैद्यांची ओळख व्यक्तित्वनिरपेक्ष क्रमांपुरतीच ठेवली जाते, तशीच काहीशी ही गोष्ट आहे.

माणसामाणसांमधील संबंध गुंतागुंतीचे झाले आणि समाजजीवनाच्या विविध अंगांवरील राज्यसंस्थेचे प्रभुत्व वाढले तरी माणसाचे जास्त जीवन औपचारिक यमनियमांच्या चौकटीत बद्ध झाले. औपचारिक व्यवस्थेच्या परिघात जेवढे जीवन बंदिस्त झालेले असेल तेच काय ते पूर्ण वास्तव असे समीकरण रूढ होण्याकडे अटळपणे कल उत्पन्न झाला. जीवनाची तरल व सूक्ष्म अंगे या वातावरणात उपेक्षिली जाऊ लागली. नामकरण, वर्गीकरण व विश्लेषणाची एक शक्तिशाली पद्धती हे आधुनिक विज्ञानाचे वैशिष्ट्य आहे. या वैज्ञानिक रीतीचा प्रभाव वाढला त्याबरोबर मानवी जीवनाच्या विविध अंगांनाही अभ्यासाची ही रीत लागू करण्याचा आणि प्रत्येक अंग हे पृथक् व परिपूर्ण असून 'वस्तुनिष्ठ'पणे त्याचे विश्लेषण केले जाऊ शकते, ते हाताळले जाऊ शकते अशी समज उत्पन्न झाली. मानवी संबंधांना औपचारिक चौकटींमध्ये बंदिस्त व आरेखित करण्याच्या भूमिकेशी जीवनाकडे पाहण्याची ही भूमिका सुसंगतच होती. प्रत्येक गोष्टीचे मोजमाप करावयाचे आणि त्यात काटेकोर अचूकपणाही साध्य करावयाचा या उद्देशाने वैज्ञानिक पद्धती पछाडलेली होती. त्याचाही परिणाम होणे अपरिहार्य होते. कोणत्याही गोष्टीच्या ज्या भागांचे / पैलूंचे अचूक मोजमाप होऊ शकते ते भाग / पैलू हा त्या गोष्टीचा गाभा, आणि तो गाभा तेवढा खरा, त्याचेच अस्तित्व तेवढे खरे असे समीकरण घातले जाऊ लागले. प्रत्येक गोष्टीच्या भौतिक अंगांनाच तेवढे प्राथमिक व मध्यवर्ती महत्त्व दिले जाण्यात याचा परिणाम झाला. भौतिक नसल्याने ज्याचे मोजमाप होऊ शकत नाही अशा जीवनाच्या अंगांना, गुणवत्तेला गौणत्वच प्राप्त झाले असे नाही; तर जणू ती अस्तित्वातच नाहीत वा दखल घेण्याच्या योग्यतेची नाहीत असा निष्कर्ष काढला जाऊ लागला.

दुटप्पी जागतिक व्यवस्थेच्या अंतर्गत अर्थव्यवस्थांच्या बाबतीत भौतिकेतर परिणामांच्या उपेक्षेमुळे वा भौतिक वस्तूंनाच महत्त्व दिल्यामुळे गंभीर समस्या उत्पन्न झाल्या नाहीत. नव्या दुटप्पी व्यवस्थेच्या पायाभूत गृहीतकृत्यांनाच आव्हान देणाऱ्या संवेदनशील व्यक्ती त्या समाजामध्ये होऊन गेल्या आणि त्यांनी केलेली टीका महत्त्वाची व अर्थपूर्ण होती. या प्रवर्तक देशांना त्यांच्या त्यांच्या देशातील लोकसंख्या स्थिर राखण्यात यश आले आणि त्याच वेळी नवनवे प्रदेश स्वतःच्या प्रभुत्वाखाली आणण्याची त्यांची चालही कायम राहिली. या दोन्हीमुळे सतत वाढत्या प्रमाणात सधनता वाढविणारी वाटचाल अखंडपणे एका रेषेत होत राहिली असे त्यांच्या बाबतीत वरकरणी तरी दिसते ही गोष्ट खरी. वासाहतिक प्रभुत्व प्रथम उघड व सरळ स्वरूपात होते. अलीकडे ते अप्रत्यक्ष स्वरूपात टिकून आहे. आर्थिक साम्राज्यवाद उघड व प्रच्छन्न दोन्ही स्वरूपांत पाहावयास सापडतो. विज्ञान आणि तंत्रज्ञान यांच्यात प्रगती होत राहिली आणि प्रभुत्वाची क्षितिजेही रुंदावत राहिली. त्यामुळे पाश्चात्त्य व्यवस्थेत राहणाऱ्या सर्व लोकांना कालच्यापेक्षा आज थोडी तरी अधिक सुबत्ता प्राप्त होत राहिली आहे. ज्याच्यापाशी साहस व कर्तृत्व आहे त्याला तर अधिक प्रमाणात स्वतःच्या सुबत्तेमध्ये भर घालत राहता आली. पण हे विश्व जगातल्या काही थोड्या लोकांनाच समावून घेणारे राहिले आहे. या देशांमध्ये उत्कर्ष पावलेल्या नव्या संस्कृतीचे मार्गदर्शक तत्त्व साधनस्रोत, संपत्ती आणि सुविधा व सेवा यांचे अधिकाधिक प्रमाणात संपादन करण्यासाठी स्पर्धा करीत राहावी हे बनले आहे. अधिकाची आकांक्षा बाळगणे व ती साध्य करणे हे वळण स्वभावप्रकृतीला दिले गेले आहे. वैज्ञानिक रीतीचा अंगीकार व शिक्षणाचा प्रसार यांच्या प्रभावामुळे मध्ययुगीन सरंजामशाहीची मुळे कापली गेली आणि समता, व्यक्तिस्वातंत्र्य व न्याय या तत्त्वांवर समाजाची पुनर्रचना करण्याचा पाया पाश्चिमात्त्य देशांमध्ये घातला गेला. ही मूल्ये या देशांमधील समाजातील ज्या मर्यादित विश्वामध्ये लागू केली ते विश्व म्हणजे त्यांचे त्यांचे राष्ट्रीय समाज. त्यांनी जगातील इतर लोकांना बाहेरच ठेवल्याने, त्यांच्या बाबतीत ही मूल्ये लागू होत नाहीत असे मानल्याने मूल्यनिष्ठा व व्यवस्था यांच्यात त्यांच्या नजरेला विसंवाद आढळत नाही.

पाश्चात्त्य देशांच्या पावलावर पाऊल टाकून इतर देशांनी व भारतानेही, विकासाचा हाच नमुना अनुकरणीय म्हणून निवडला. या निवडीचे अपेक्षित तेच परिणाम घडून आले. देशातल्या काही केंद्रांमध्ये राष्ट्रीय अर्थव्यवस्थेच्या पुनर्घटनेस आरंभ झाला. ही केंद्रे सधन झाली. 'विकसितते'चे वलय त्यांच्याभोवती निर्माण झाले. ही केंद्रेही पाश्चात्त्य सधन देशांच्या साच्यात ओतली गेली; त्यांना तोच विकसित घाट प्राप्त झाला. बाह्य आघात व प्रभाव यांच्यामुळे सुरू झालेले हे पुनर्घटन एक दिवस साऱ्या समाजाला व्यापेल आणि जो









काही विसंवाद उत्पन्न होईल तो थोड्या काळापुरताच असेल असे अलिखित गृहीतकृत्य विकासाच्या या नमुन्याच्या स्वीकारामागे होते. जागतिक पातळीवरील ही दुटप्पी चौकट अशा रीतीने भारताच्या राष्ट्रीय व्यवस्थेतही अंगीकृत झाली. पण पाश्चात्त्य देशांची परिस्थिती व पार्श्वभूमी यांच्यात मूलतःच असलेल्या भेदांमुळे तीव्र व न दूर होण्यासारखा विसंवाद त्यातून उत्पन्न झाला आहे. मार्गदर्शक तत्त्वे व धोरणे यांच्या पातळीवर उच्च नैतिक उद्घोष करीत जागतिक व्यवस्थेची प्रतिकृती येथे निर्माण करण्याच्या गोष्टी येथे केल्या जात आहेत. पण विकासाचा हा मार्ग आपणास तर्कशुद्धरित्या कोठे घेऊन जाणार आहे याची स्पष्टता करण्याचे टाळले जाते. वास्तव अडचणीत टाकणारे आहे. यावर पांघरूण घालण्यासाठी आटोकाट प्रयत्न केले जातात आणि जेथे ते असे झाकून टाकता येत नसेल तेथे त्याचे समर्थन देण्याचा प्रयत्न केला जातो. उपजीविका हस्तगत करण्यासाठी जीवघेणी धडपड लोकांना करावी लागत आहे. किंबहुना त्यासाठी करावा लागणारा संघर्ष जास्तच तीव्र व जीवघेणा बनत आहे. उत्पादनव्यवस्थेतील 'असंघटित' क्षेत्रातला तो नियमच ठरत आहे. याच वेळी, दुसरीकडे व्यवस्थेच्या दुटप्पी रचनेमुळे काही मोजक्या केंद्रांमध्ये गोळा होणारे लाभ आपसात कसे वाटून घेता येतील, परिघा बाहेरील लोकांना ते कसे द्यावे लागणार नाहीत यासाठी संघटित व शहरी क्षेत्राची सारी धडपड दिसून येते. वासाहतिक काल-खंडाची आठवण व्हावी अशा पद्धतीने अर्थव्यवस्थेच्या वेगवेगळ्या क्षेत्रांमधून लाभ हस्तगत करण्याची हुशारी संघटित शहरी विभाग करीत असल्याचेही आढळून येत आहे. अनेकानेक साधनस्रोत बेफिकीर साहसी वृत्तीने सत्तेचा वापर करून ओरबाडून घेण्याचा 'आनंद' हा विभाग लुटत आहे. राज्यसंस्था व व्यवस्थेतील सत्तेची इतर केंद्रे यांच्यावरील या विभागाची पकड इतकी सर्वंकष आहे की ज्याची इच्छा करावी तो साधनस्रोत यांना स्वतःच्या कबजात घेता येतो. या मंडळींच्या रीतीभाती व व्यवहार समजण्याच्या पलीकडे असलेले जनसामान्य जे काही सभोवती घडत आहे ते अचंबित हतबुद्ध होऊन बघत आहेत. गरिबीच्या वर्तुळात जगणाऱ्या 'परक्या' मंडळींचे आज या देशातील सधन व्यवस्थेकडून स्वागत होत नाही; तर ही नको असलेली गोरगरीब मंडळी सधन व्यवस्थेच्या परिघाबाहेर राहावीत म्हणून तटबंदी उभारण्याचेही गंभीर प्रयत्न केले जात आहेत. त्यांनी आपापली खेडीपाडी वा वस्त्या सोडून स्थलांतर करू नये या स्वरूपाचे निर्बंध घालण्याचा विचारदेखील करण्यात येत आहे. आर्थिक स्वरूपाच्या तटबंद्याही उभारलेल्या आहेत. प्रामुख्याने भारतीय राज्यघटनेतील तरतुदींमुळे औद्योगिक स्थलांतर थांबविण्याच्या प्रयत्नात अद्यापपावेतो यश आलेले नाही. आर्थिक तटबंद्या दिवसेंदिवस भक्कम व अनुल्लंघनीय बनत आहेत. व्यवस्थेचा त्या एक कायम टिकाऊ असा भाग बनत आहेत. एकाच राष्ट्रात कायमचा दुभंगलेला समाज निर्माण तर केला जात नाही, असे काही वेळा वाटते.

विकासाचा प्रचलित शिष्टमान्य नमुना आपल्या परिस्थितीला व गरजांना साजेसा नाही ही गोष्ट स्पष्ट आहे. दुटप्पी व्यवस्था जशी भक्कम होत जाईल, आणि राष्ट्रीय जीवनातला विसंवाद जसा तीव्रतर होत जाईल तसे हे अधिकच स्पष्ट होईल की हा नमुना आपल्या कामाचा नाही, तो चिरस्थायी नाही. समता प्रस्थापनेचे ध्येय राज्यघटनेत अंतर्भूत करण्यात आले आहे. प्रत्यक्षात विषमता वाढत आहे व तीव्र बनत आहे. या विसंवादातून विकासाचा नमुना व मार्ग या संबंधातला पेच उत्पन्न झाला आहे. वेगवेगळ्या प्रकारची सोईस्कर स्पष्टीकरणे व समर्थने देऊन पेच निर्माण झालेलाच नाही असे भासविले जात आहे. आधुनिक सामाजिक-आर्थिक व राजकीय व्यवस्था अतिशय गुंतागुंतीच्या बनल्या असल्यामुळे सकृद्दर्शनी असे समाधान करणे शक्य होत आहे. साधनस्रोतांवर विषम स्वरूपात मालकी/नियंत्रण प्रस्थापित करून, सत्तेची केंद्रे ताब्यात ठेवून व इतरांना त्यांच्यापासून वंचित करून, इतकेच नाही तर ज्ञानाच्या स्रोतापर्यंत सर्वांना व्यवहारात सारख्याच सुलभतेने येणार नाही अशी व्यवस्था करून बिनधास्तपणे विषमता टिकवून धरता येते. समाजाच्या कारभारासाठी ज्या संस्था औपचारिकरित्या प्रस्थापित केल्या गेल्या आहेत त्यांच्यात उपचार कायम ठेवून हुशारीने त्यांच्यावर प्रभुत्व प्रस्थापित करून, किंवा त्यांचा कारभार बहुमताच्या संमतीने पण हुशारीने स्वतःच्या स्वार्थासाठी चालवून वास्तव झाकता येते. सारी व्यवस्थाच अशी चलाखी प्रकट करीत आहे असे म्हणता येईल. पायाभूत विषमता व अन्याय आणि अनधिकाराने पदरात पाडून घेतलेले लाभ व इतरांची केलेली निर्घृण वंचना यांचा साक्षात संबंध प्रस्थापित करणे अवघड जाते. कारण वरकरणी तरी जे काही घडते आहे ते औपचारिक रीतींना धरून होत आहे असेच दिसते. औपचारिक व्यवस्था प्रत्यक्षात ज्या लबाडीने व कारस्थानी पद्धतीने राबविली जात

आहे ते उघड स्वरूपात चालणे अवघड जाते. आंतरराष्ट्रीय क्षेत्रात कार्यरत असलेल्या प्रक्रिया आणि काही जागतिक व्यवस्थेतील गुंतवणुकीचे अनिवार्य स्वरूप यांचा हवाला देऊन राष्ट्रांतर्गत परिस्थितीबद्दल मनात गोंधळाची स्थिती उत्पन्न केली जाते.

विकासाचा पर्यायी नमुना व मार्ग कोणता याचा शोध आपणास घ्यावयाचा आहे. त्यासाठी प्रथम आजची विकासाची शैली व नीती यांच्याबद्दलचे आपल्या मनातले संभ्रम दूर केले पाहिजेत. आपण न्याय व समताप्रस्थापनेचे ध्येय स्वीकारले आहे ते प्रचलित दुटप्पी विकासामधून कधीच साध्य होणार नाही हे तर झालेच. आजची अवस्था ही केवळ एक संक्रमणावस्था आहे असे जे प्रतिपादन नेहमी प्रचलित नमुन्याची भलावण करणारे करीत असतात ते खोटे आहे ही गोष्ट आपण पक्की ध्यानात घेतली पाहिजे. समताधिष्ठित समाजनिर्मितीच्या वाटेपासून आपण चुकून भरकटलो आहोत असे नाही. जी वाट आपण धरली आहे ती आपणास वेगळ्याच ठिकाणी घेऊन जाणारी आहे. या वाटेने आपणास घेऊन जाणाऱ्या प्रक्रियांना हळूहळू स्थिर रीतीभाती व संस्थांचे रूप दिले जात आहे. त्या स्वाभाविक व योग्यच आहेच अशी स्वीकृती त्यांना मिळत आहे. फक्त स्पष्टपणे बोलून दाखविले जात नाही इतकेच काय ते.

शिक्षणाच्या क्षेत्रातील दुटप्पी व्यवस्थेपासून आपला समाज दुभंगण्यास आरंभ झाला. वास्तविक सर्वांना शिक्षणाची समान संधी उपलब्ध करून द्यायला शासन घटनेनुसार प्रतिबद्ध आहे. आरंभीच्या काळात या मुद्द्यावर देशात एकवाक्यता पण होती. नवोदय विद्यालयाची स्थापना करून आपण हे ध्येय संपूर्णपणे नाकारले आहे असेच जणू शासनाने जाहीर केले. उच्च दर्जाच्या अतिशय प्रतिष्ठित अशा विशिष्ट रोगांच्या संशोधनास वाहिलेल्या संशोधनसंस्था व अशीच इस्पितळे यांचे एक जाळे देशात उभारले जात आहे. आरोग्य विमा योजनाही मोठा डांगोरा पिटून अंमलात आणल्या जात आहेत. असे लक्षात येईल की या व्यवस्था उच्चस्तरियांच्या व साधनांच्या आरोग्याचीच खऱ्या अर्थाने काळजी घेतात. म्हणजे, रोग निवारणाच्या क्षेत्रातही दुटप्पी व्यवस्था आज दृढमूल झाली आहे. शहरांमधील बस व उपनगरी रेल्वे आधारित सार्वजनिक दळणवळणव्यवस्था या देशातील सधन उच्चभ्रू वर्ग वापरत नाही. या मोडकळीला येत असल्या, त्यांच्यावर असह्य असा ताण पडत असला, लोकांची दैन्यावस्था होत असली तरी त्याची श्रेष्ठीवर्गांना पर्वा करण्याचे कारण नाही. मंत्रिगण, पुढारी, शास्ते प्रशासक व उद्योजक-व्यवस्थापक मोटारींमधूनच प्रवास करतात. सामान्यांना जुन्या बसेसना लोंबकळत प्रवास करावा लागतो. दीर्घकाळपर्यंत रेल्वे व टपाल या दोन सेवा अशा राहिल्या, ज्यांच्या बाबतीत व्यवस्था दुटप्पी नव्हती. रेल्वेवाहतुकीच्या बाबतीत वर्गीय भेद कमी करण्याचा निर्णय जाणूनबुजून घेण्यात आला होता. पण आता 'स्पीड पोस्ट'ची नवी योजना अमलात आली आहे आणि आगगाड्यांच्या बाबतीत वातानुकुलीत डब्यांमधून प्रवास करण्याची सोय अंगभूत सोय म्हणून स्वीकारली गेली आहे. म्हणजे या तीन सेवाही दुटप्पी बनविल्या गेल्या आहेत. याबद्दल कोणी आवाजही उठविला नाही. काही काही क्षेत्रांमध्ये दुटप्पी व्यवस्था अद्यापि आढळत असली तर ती केवळ संक्रमणावस्था आहे असे म्हणणे आता अवघड ठरत आहे. आकाशवाणी व दूरदर्शनच्या सर्वदूर प्रसाराद्वारे लोकांना दिपवून टाकले जात आहे. ज्या जीवन-शैलीपासून व राहणीमानापासून तो अनेक योजने दूर आहे आणि ज्या गोष्टी कायम त्याच्या आवाक्याबाहेरच्या राहणार आहेत त्या जीवनशैलीत व राहणीमानात जणू आपण सहभागी आहोत या आभासात श्रोता व प्रेक्षक म्हणून त्याला अडकवून टाकले जात आहे. बाजारात अनेकानेक प्रकारचा चकचकीत माल आणून टाकला जात आहे. त्यांतल्या काही वस्तू तरी आपणास घेता याव्यात या धडपडीत सामान्य माणसाला आजची दुटप्पी व्यवस्था यशस्वीपणे गुंतवून टाकीत आहे.

विकासाचा आजचा नमुना व रीत ही फार तर नऊ दिवसांची नवलाई आहे हा खरा मुद्दा आहे. पाश्चात्त्य देशांना अनेक प्रकारची अनुकूलता होती व आजही आहे म्हणून इतका दीर्घकाळपर्यंत तेथे ही नवलाई टिकून राहिली व तीत भरही पडत राहिली. पण आता सधन पाश्चात्त्य देशांतही नव्याची नवलाई संपुष्टात येण्याची चिन्हे स्पष्ट दिसू लागली आहेत. आपल्या परिचयाची आधुनिककालीन विकासाची प्रक्रिया चिरस्थायी नाही. भारताच्या संदर्भात तर वर्तमान विकासप्रक्रियेची क्षणभंगुरता आजच उघड झाली आहे.

आग्नेय आशिया खंडातील मोठ्या लोकसंख्येच्या देशांना उपलब्ध असलेले साधनस्रोत आणि त्यांच्या देशांतील लोकसंख्या यांचे प्रमाण व्यस्त आहे. सधन पाश्चात्त्य देशांशी तर या बाबतीत आपली तुलना होऊ शकत नाहीच; पण

जगातल्या इतर अनेक देशांच्या तुलनेतही आपली परिस्थिती जास्त प्रतिकूल आहे. सार्वत्रिक उपभोगाच्या उद्देशाने मोठ्या प्रमाणावर भौतिक वस्तूंचे उत्पादन एका मर्यादेपलीकडे करावयाचा प्रयत्न केल्यास पर्यावरणीय समतोल ढासळणे अनिवार्य आहे. अल्पसंख्य उच्चभ्रू वर्गाने पाश्चात्त्य सधन देशांचे अनुकरण करून चंगळवादी जीवनसरणीचा अंगीकार केला आहे. एवढ्यानेदेखील आपला पर्यावरणीय समतोल धोक्यात आजच आलेला आहे. अधिकाधिक ऊर्जेचा वापर करीत जाण्यावर, भौतिक वस्तूंच्या उपभोगाचे मान सतत उंचावण्यावर बेतलेला पाश्चात्त्य धर्तीचा विकास चिरस्थायी ठरणार नाही. लोकसंख्येच्या एका छोट्याशा विभागाने पाश्चात्त्य धर्तीचे सधन चंगळवादी जीवन जगावे व इतरांनी तोंडमिळवणी करण्याच्या धडपडीत कायम ग्रस्त राहावे असा विकासाचा दुटप्पी घाट निवडावयाचा, की सर्वांना सामायिक अशी जीवन-शैली उपलब्ध करून देणारा चिरस्थायी विकासाचा मार्ग अनुसरावयाचा? राष्ट्र म्हणून आपणास या दोन्ही मधून एका पर्यायाची निवड करावयाची आहे. समत्व व न्याय यांचा पक्ष घेऊ इच्छिणाऱ्यांनी कोणत्या पर्यायाची निवड केली पाहिजे ते स्पष्ट आहे.

फार काळ टिकाव धरू न शकणारा व विषमतेस खतपाणी घालणारा असल्यामुळे चंगळवादी उपभोगास प्रोत्साहन देणारा विकासाचा नमुना जर आपण अव्हेरला तर मग जीवनाच्या सर्व अंगांच्या बाबतीत फार उशीर होण्याच्या अगोदर, राष्ट्र म्हणून आपणास वेगळ्या घाटाची व्यवस्था लावण्याचा जाणीवपूर्वक निर्णय करावयास पाहिजे. पाश्चात्त्य देशांना या प्रश्नाला आताआतापर्यंत सामोरे जावे लागले नाही. दुसऱ्यांचा अनुभव वा उदाहरण आपणास येथे उपयोगास येणार नाही. आपल्या परिस्थितीबद्दल आपणच विवेकाने निवाडा करून निर्णय घ्यायचा आहे. या प्रश्नाला माझ्या मते पायाभूत महत्त्वाचे दोन पैलू आहेत : १. कोणती तंत्रविद्या अंगीकारावयाची हे ठरविण्याचे निकष कोणते? आणि २. जीवनाची गुणवत्ता आपणास कोणती अभिप्रेत आहे आणि तिची स्पष्टता आपण कशी करतो? विकासाचे इतर अनेक मापदंड या दोन प्रश्नांना दिल्या जाणाऱ्या उत्तरांवरून ठरणार आहेत.

उत्पादनतंत्र कोणते निवडावयाचे हा गुंतागुंतीचा प्रश्न प्रथम विचारात घेऊया. तंत्रविद्येतील प्रगती ही आर्थिक बुद्धीला चालना देणारी मुख्य शक्ती राहिली आहे ही गोष्ट खरी. वस्तूंचे उत्पादन करण्याची खरी जबाबदारी स्वतःच्या खांद्यावर घेऊन माणसाला त्याच्या कल्पनेतले जीवन साकार करण्यासाठी पूर्णपणे मुक्त करण्याची क्षमता असलेली तंत्रविद्या एक दिवस विकसित होईल असे दिसते आहे. पण पर्यावरणीय-दृष्ट्या, आणि सामाजिकदृष्ट्याही अशी सर्वस्वी स्वयंचलित तंत्रविद्येवर काम करणारी व्यवस्था चिरस्थायी ठरणार नाही असे वाटते. माणसाला ढोरमेहनत करावी लागणार नाही यासाठी तंत्रविद्येचा आधार घेतला पाहिजे, व तो आज उपलब्ध आहे. पण माणसाचे जीवन निकोप व स्वस्थ बनवायचे असेल तर उत्पादक श्रम हे त्याच्या दैनंदिन जीवनाचे एक संघटक तत्त्व म्हणून कायम राहिले पाहिजे. तंत्रविद्येला स्वयंभू व सार्वभौम दैवताचे स्थान देण्याची सूचना आपण स्वीकारू शकत नाही. मानवी गरजांची पूर्तता करण्यासाठी तंत्रविद्या आहे व हेच गौण स्थान तिला सदैव दिले गेले पाहिजे. वसुंधरा पृथ्वी ही सर्व मानवजातीला समायिक आहे आणि विकासात सर्वांना समानत्वाने वाटा मिळावयास हवा ही गोष्ट अनेकानेक राष्ट्रांमधील लोक कोठवर व्यवहारात स्वीकारतात यावर बऱ्याच अंशी पुष्कळ काही अवलंबून आहे. अर्थ असा की, जगाची विभागणी पृथक् सार्वभौम राष्ट्र-राज्यांमध्ये झालेली आहे, आणि आप-पर भेदवृत्तीने राष्ट्रे एकमेकांशी व्यवहार करीत आहेत तोवर कोणत्या उत्पादनतंत्रांची निवड करावी याचा निर्णय आदर्श स्वरूपात घेतला जाऊ शकणार नाही.

काही क्षेत्रे अशी आहेत की जेथे काही प्रकारची तंत्रे स्वीकारणे अनिवार्य ठरेल असे दिसते. इतर बाबींचा विचार करून निवड करायला हवी असे आपण ठरवू शकणार नाही. उदाहरणार्थ, पृथक् व सार्वभौम राष्ट्रराज्यांच्या आजच्या जागतिक रचनेमुळे संरक्षण-व्यवस्थेच्या प्राणभूत महत्त्वाच्या क्षेत्रात लष्करी बळ व शस्त्रसज्जता यांची एक पातळी कायम राखणे आपणास टाळता येणार नाही. मग या दृष्टीने आवश्यक ती तंत्रे व व्यवस्था आपणास अनिवार्य म्हणून उभारावी लागणार. तसेच क्लेशापासून माणसांना मुक्त करायलाच हवे अशी जेथे नितांत निकड असेल तेथे आजच्या घडीला उपलब्ध असलेली उच्चतम तंत्रविद्या आपणास अंगीकारावी लागेल. पण म्हणून अर्थव्यवस्थेच्या संपूर्ण क्षेत्रात पाश्चात्त्यांचे अंधानुकरण करून उच्चतंत्राचा स्वीकार करण्याची काही गरज नाही. असे करण्याची अनिवार्यता आहे असे म्हणण्यास तर्काचा आधार नाही. आपली राष्ट्रीय उद्दिष्टे ध्यानात घेऊन ती साध्य करण्याच्या दृष्टीने








अधिकाधिक क्षेत्रांमध्ये आपण स्वतंत्र बुद्धीने निर्णय घेऊ शकू असे पाहिले पाहिजे. जे धाब्यावर बसवून चालणार नाही असे काही पायाभूत मापदंड आहेत आणि त्यांना आपण घट्ट धरून ठेवले पाहिजे. उदाहरणार्थ, सर्व नागरिकांना मानवीय रोजगार व किमान जीवनमान उपलब्ध झाले पाहिजे. इतकेच नाही तर, जीवनाच्या निकोपतेसाठी उत्पादक श्रमांचे स्थान प्रत्येक माणसाच्या जीवनात आहेच आहे. तसेच जे काम उपजीविकेसाठी माणसाला करावे लागेल ते करीत असताना त्याच्या व्यक्तित्वाचे संगोपन व संवर्धन पूर्णपणाने होत राहिले पाहिजे. हे काही असे प्राणभूत मापदंड आहेत. अनिवार्यतेने अमुक एक उत्पादनतंत्र व व्यवस्था स्वीकारलीच पाहिजे असे नाही, अशा सर्व क्षेत्रांमध्ये कोणती तंत्रविद्या अंगीकारावयाची हे तंत्रविद्येच्या क्षेत्रातील घडामोडींच्या आधारे ठरविले जाता कामा नये. अद्ययावत तंत्रे कोणती आहेत किंवा तांत्रिकदृष्ट्या काय शक्य आहे या कसोट्यांवरून निवड केली जाता कामा नये. कोणती सामाजिक उद्दिष्टे साध्य करावयाची आहेत त्यावरून निवड ठरली आहे. आपल्या देशाच्या विशिष्ट परिस्थितीत श्रमसघन उत्पादनतंत्राची निवड करणे अगत्याचे ठरते. काही क्षेत्रांत अनिवार्यतेमुळे जी भांडवलसघन उत्पादनतंत्रे वापरावी लागतील त्यांच्या तुलनेत हे दुसरे टोक आहे. एक राष्ट्र म्हणून आपणास अपरिहार्य कारणामुळे तंत्रविद्येच्या संदर्भात दुटप्पी व्यवस्था मान्य करणे भाग आहे अशा निर्णयाप्रत आपण येतो.

दोन प्रकारची, पातळ्यांवरची तंत्रविद्या स्वीकारणे याचा अर्थ दुटप्पी अर्थव्यवस्थेमागील तर्कशास्त्र पण स्वीकारणे आणि ज्या प्रक्रियांमुळे अर्थव्यवस्थेचे दुटप्पीपण मजबूत बनत आहे त्यांनाच उचलून धरणे असा नाही का, असे विचारले जाईल. भांडवलसघनता, विवक्षित उत्पादनतंत्र आणि तंत्राधिष्ठित व्यक्तिगत कौशल्ये यांच्या विभिन्न पातळ्या वेगवेगळ्या क्षेत्रांमध्ये राबविल्या जात असल्याने देशातील विषमता तीव्रतर होत आहे असे स्पष्टीकरण दिले जाते. पण हा भ्रामक युक्तिवाद आहे. प्रगत सधन देशांमधील अनुभवही या युक्तिवादाची पुष्टी करीत नाही. कोणत्या कौशल्यास किती मेहनताना दिला जावा, त्याचे सापेक्ष मोल काय; किंबहुना 'कौशल्य' या शब्दाची व्याख्या कशी करावी किंवा कशाला 'कौशल्य' म्हणावे, आणि विभिन्न कौशल्यांची प्रतवारी कशी लावावी हे विवाद्य मुद्दे आहेत. या बाबतीत व्यवहारात घेतले जाणारे निर्णय लहरी व फार पक्षपाती असतात. जो फरक केला जातो त्याचे सुसंगत तर्कशुद्ध स्पष्टीकरण दिले जाऊ शकत नाही. पारंपरिक शेती काम करणाऱ्यांच्या कौशल्यांना अत्यंत निकृष्ट मानले जाते. कौशल्यांची प्रतवारी किती लहरी व पक्षपाती असते याचे हे अगदी ठळक उदाहरण आहे. तसेच, आपल्या देशातील सर्वसामान्य लोकांच्या बाबतीत, त्यांचे जीवन ढोरमेहनतीचे व काबाडकष्टांचेच असणार, ते सुखद कसे होईल याचा विचार करण्यासाठी विशेष उपाययोजना करण्याचे कारण नाही असे जणू गृहीत धरलेले आहे. आजच्या दुटप्पी विकासाच्या चौकटीत त्यांच्या जीवनाचा घाट बदलण्याचा विचारही आढळत नाही.

राष्ट्रीय अर्थव्यवस्थेवर श्रेष्ठीवर्गाची मक्तेदारी पकड आहे. हा वर्ग व्यवस्थेच्या संघटित विभागात मोडणारा आहे. स्वतःच्या मक्तेदारी प्रभुत्वाचा उपयोग करून तो कौशल्याची प्रतवारी आणि कोणत्या कौशल्यांना भरपूर वाव द्यायचा ते ठरवितो. संघटित विभागात उपलब्ध असलेले रोजगार आणि त्यांना मिळणारे वेतन/रोजी यांना भक्कम संरक्षण दिले गेलेले आहे. शिक्षित बेकारांच्या संख्येत वेगाने वाढ होत आहे. यांच्या स्पर्धेमुळे वा अस्तित्वामुळे संघटित विभागातील मंडळींचे उत्पन्नाचे मान कमी होणार नाही याची पूर्ण खबरदारी घेतली जात आहे. संघटित विभागात वेतन व मजुरीचे दर मुद्दामच सापेक्षतः खूप कमी राखले जात आहेत. बेकार मनुष्यबळाचा 'साठा' कायम उपलब्ध राहील अशीच आजची व्यवस्था आहे. स्वतःचे दारिद्र्य व हलाखी अटळ भोग म्हणून पत्करण्यास अनुकूल मानस या परिस्थितीतून घडते, टिकविले जाते.

तंत्रविद्येच्या क्षेत्रात वर उल्लेखिलेल्या कारणाने दुटप्पी चौकट धोरण म्हणून स्वीकारावी असा नवा विकासव्यूह सुचविला आहे. पण यांच्या आधारे पारंपरिक शेती व ग्रामोद्योग, लघुउद्योग या क्षेत्रांतील लोकांचे कौशल्य कमी प्रतीचे लेखण्याचा, श्रमाचेच मूल्य उपेक्षिण्याचा हेतू आहे असा त्यातून अर्थ काढता कामा नये. कोट्यवधी लोकांना ढोरमेहनत करूनच स्वतःचे पोट भरावे लागत आहे तोपर्यंत त्याची नुकसानभरपाई म्हणून त्यांना विशेष मेहनताना रास्त अधिकार म्हणून मिळायला हवा हा मुद्दाही सोडून देण्याचे कारण नाही. किंबहुना जाणीवपूर्वक उलट भूमिका अंगीकारायला हवी. आधुनिक उच्चतंत्राभोवती प्रतिष्ठेचे व प्रगतीचे वलय आहे. संघटित विभागांमध्ये उच्चतंत्राधिष्ठित रोजगार एकवटलेले आहेत. अधिक सुखद परिस्थितीत व आकर्षक शर्तींवर माणसे अशा उद्योगामध्ये

कमी श्रमाची कामे करीत असतात. त्याच वेळी राष्ट्रीय अर्थव्यवस्थेची अनिवार्य गरज म्हणून अनाकर्षक शर्तींवर अडचणींमध्ये अधिक मेहनतीची कामे करण्याची पाळी मोठ्या समूहावर येत असेल तर अप्रगत तंत्रांच्या अंगीकाराच्या क्षेत्रात उपजीविका हस्तगत करावी लागणाऱ्या लोकांच्या कामांची कौशल्यांची किंमत मुद्दाम झुकते माप देऊन जास्त केली पाहिजे. प्रगत पाश्चात्त्य देशांमध्ये जादा अंगमेहनतीच्या कामांना पुष्कळ अधिक मजुरी देऊन ती कामे करवून घेतली जातात. आपल्याकडेही ठरवून असे धोरण राबविले जाण्याची गरज आहे.

जीवनाच्या गुणवत्तेशी घनिष्ठपणे निगडित असा तंत्रविद्येचा एक पैलू आहे. श्रेष्ठींचेही श्रेष्ठी असलेल्या प्रगत पाश्चात्त्य देशांनी केंद्रीभूत नियंत्रणाच्या दृष्टीने अनुकूल व सहाय्यभूत अशा उत्पादनतंत्रांची व व्यवस्थेची निवड करून जागतिक अर्थव्यवस्थेची उभारणी केली असली तर नवल नाही. मोठ्या प्रमाणावर उत्पादन करण्याचे लाभ सगळे स्वत:कडे ओढून ते घेत राहिले; तर वासाहतिक संबंध असलेल्या इतर देशांना दुटप्पी जागतिक व्यवस्थेच्या नियमाप्रमाणे, वेगवेगळ्या प्रकारांनी त्यांची किंमत द्यावी लागली. अर्थात अशी जागतिक व्यवस्था उभारण्यामुळे या इतर देशांतील काही विभागांपर्यंत काही प्रमाणात लाभ पोचत राहिले. राष्ट्रीय संदर्भात आपणही जर तंत्रविद्येच्या बाबतीत अशीच दुटप्पी चौकट वैध म्हणून स्वीकारली तर तोच तर्क देशातही लागू होणार आहे. म्हणजेच, देशांतर्गत एका मोठ्या विभागाशी वासाहतिक संबंध प्रस्थापित करावे लागतील, किंवा होतील. ही गोष्ट सरळसरळ तसे सांगून करता येणार नाही ही उघड गोष्ट आहे. पण उच्च-तंत्राधिष्ठित महाकाय आकाराचे आधुनिक प्रकल्प जेव्हा आपल्या देशात राबवले जातात तेव्हा त्याचे लाभ व त्याचे विपरित आघात यांचे 'वाटप' कोणात कसे होते ते जर पाहिले तर हीच प्रक्रिया येथेही घडत असलेली दिसून येते. ज्यांना लाभ मिळतात तो वर्ग अल्पसंख्य असतो, तर विपरित आघात सहन करावा लागणारा समाज मोठा असतो. 'विकासासाठी काही किंमत तर द्यायलाच हवी', 'विध्वंस व नवी उभारणी या हातात हात घालून जाणाऱ्या प्रक्रिया आहेत' असे प्रतिपादन करून या 'वाटपा'तील विषमता व अन्याय यांच्यावर पांघरूण घातले जाते. राष्ट्रीय अर्थव्यवस्थेची एकात्मता आपण गंभीरपणे प्रतिपादत असलो तर असे शेरे त्यांची विशेष दखल न घेता तसेच सोडून देणे अनुचित होईल. विकासामागची ही गृहीतकृत्ये वास्तव व प्रस्तुत म्हणून स्वीकारली जाता कामा नयेत. लाभ व विध्वंस यांचे विभिन्न समाज-विभागांमध्ये होणारे हे वाटप सर्वसामान्य समाजाच्या पातळीवर चटकन ध्यानात न येणारे आहे. पण आदिवासी क्षेत्रांमध्ये त्याचे राक्षसी विध्वंसक रूप नागव्या स्वरूपात समोर येते. दुटप्पी व अन्याय्य वाटपाचा हा जो जीवघेणा खेळ आहे तो खेळण्यासाठी आदिवासी क्षेत्र हा एक आदर्श आखाडा आहे असे म्हणता येईल. उदाहरणार्थ, आदिवासी क्षेत्रात महाकाय औष्णिक वीजप्रकल्प उभारला जातो तेव्हा वीज शहरी विभागांतील वरिष्ठ वर्गाच्या जीवनाचा चैनविलास अधिक झगमगाटी बनविते; त्याच वेळी त्या प्रकल्पाच्या आसमंतात राहणाऱ्यांची शेती व जीवन हवेत फेकल्या जाणाऱ्या राखेने अक्षरश: काळवंडून जाते. असे प्रकल्प उभारले गेले की प्रकल्पांच्या स्थानिक क्षेत्रांतही सधनतेची बेटे उदयास येतात. दुटप्पी व्यवस्थेमधल्या लाभधारकांच्या वर्तुळात समाविष्ट होणाऱ्यांच्या जीवनात समृद्धी येते. त्याचवेळी स्थानिक आदिवासी जमातींच्या वाट्याला घाण, प्रदूषण व बकालपणा येतो.

मोठ्या प्रकल्पांना जन्मास घालणाऱ्या तंत्रविद्येमधून देशांतर्गत वसाहतवाद आकारास येणे अटळ आहे. समता व न्याय यांना बांधिलकी असणाऱ्या लोकांना विकासाची ही तऱ्हा मंजूर होऊ शकत नाही. सधन पाश्चात्त्य देशांनी स्वत:च्या गरजा व आकांक्षांच्या पूर्ततेसाठी तंत्रविद्येचा ज्या दिशेने विकास केला तीच दिशा व तीच 'प्रगत' तंत्रविद्या आपण स्वीकारली पाहिजे याची कोणतीच आवश्यकता नाही. येथील भौतिक व आर्थिक वास्तव वेगळे आहे आणि आपले सामाजिक वास्तवही वेगळे आहे. आपली उद्दिष्टेही त्यांच्यापेक्षा भिन्न आहेत. तंत्रविद्या ही स्थलकालसापेक्ष आहे. विज्ञान स्थलकालनिरपेक्ष आहे. जर ते खरे विज्ञान असेल तर, देशातील श्रेष्ठीवर्ग वा आंतरराष्ट्रीय पातळीवरील श्रेष्ठींचाही श्रेष्ठी असलेला वर्ग यांच्या आकांक्षा व गरजा यांच्या पूर्ततेसाठी उपयोगी अशी तंत्रविद्या आम्ही विकसित करू नये. विज्ञानातील अद्ययावत संशोधन व प्रगती यांच्या आधारे आमच्या स्थलकालास अनुरूप व राष्ट्रीय उद्दिष्टांच्या पूर्ततेसाठी उपकारक अशी तंत्रविद्या आम्ही विकसित करायला हवी.

साधनस्रोत व लोकसंख्या यांचे आपल्या येथील सापेक्ष व्यस्त प्रमाण ध्यानात घेऊन आपण नव्याच जीवनशैलीचा








अंगीकार करण्याची गरज आहे. आपल्या साधनस्रोतांवर किमान ताण येईल याची खबरदारी घेणारी ही जीवनशैली असायला हवी. तरच पर्यावरणाचा तोल राखला जाईल आणि चिरस्थायी विकास साध्य होईल. म्हणजेच भारतीय विकासाची व्यूहरचना अशी असायला हवी, की भौतिक सुखोपभोगाच्या वस्तू व सेवा यांच्या उत्पादनाची व सेवनाची मात्रा संयमित व परिमित राखली जाईल आणि 'भौतिकेतर' वस्तू व सेवा यांचे उत्पादन व सेवन यांना जास्त प्राधान्य दिले जाईल. सगळ्या समाजाची वा समुदायाची गरज सामाजिकपणे भागविणाऱ्या सेवा व व्यवस्था यांच्यात सुधारणा घडवून आणण्यावर जास्त भर असेल. छोट्या छोट्या समुदायांच्या (कम्युनिटी) पातळीवर समवयस्कांमध्ये यासमवेत ज्यांची सिद्धी करता येईल व ज्यांचा आविष्कार करता येईल अशा स्वरूपात व्यक्तींच्या ठायी असलेली गुणसंपदा प्रकट होण्यावर, विकसित करण्यावर भर असेल.

पाश्चात्त्य सधन राष्ट्रांपेक्षा वेगळ्या वळणाने आपण ज्या बाबतीत वाटचाल करावी अशी आणखी एक बाब आहे ती म्हणजे फुरसतीचा वेळ कामी लावण्याच्या त्यांच्या तऱ्हा. माणसातील अंगभूत गुणवैशिष्ट्यांच्या आविष्काराचे व विकासाचे साधन व माध्यम म्हणून जे नाना उपक्रम आज तिकडे फुरसतीच्या वेळाचा उपयोग करून केले जातात त्यांची मौलिकता व महत्त्व कमी लेखण्याचा प्रश्न नाही. पण त्यांनी अंगीकारलेली तऱ्हा आणि त्यांना प्राप्त होणारा घाट आपणास परवडणारा नाही. तो स्पर्धात्मक, व्यक्तिवादी व अतिशय खर्चिक आहे. या राष्ट्रांजवळ असलेला वाढावा ते कोणत्या गोष्टींसाठी वापरीत आहेत त्याची काही उदाहरणे पाहण्यासारखी आहेत. काल्पनिक जागतिक महायुद्धे ते खेळत आहेत (वॉर गेम्स); आकाशात भरारी मारण्यावरून, कोण प्रथम कोणत्या ग्रहावर जाऊ शकतो वा अंतराळ संशोधनात आघाडी मारू शकतो यावरून एकमेकांशी स्पर्धा करीत आहेत, 'शिरो सम गेम्स' नावाने ओळखल्या जाणाऱ्या बौद्धिक कपटात रमून जात आहेत. फाजील वस्तुवैपुल्याचा प्रश्न सोडविण्यासाठी जाहिरातबाजीवर साधन-स्रोतांचा मोठ्या प्रमाणावर चुराडा करीत आहेत. या क्षेत्रांमध्ये काम करणाऱ्या बुद्धिवंत संशोधकांच्या, कलावंतांच्या, व्यवस्था-पकांच्या व्यक्तिमत्त्वांचा परिपोष होत आहे असे एका अर्थाने जरूर म्हणता येईल. पण यांचे उदाहरण पुढे करून त्यांच्या पावलावर पाऊल टाकून पुढे जाण्याचा, प्रगती करण्याचा आपणही खटाटोप करीत आहोत. आपणास हे परवडणारे नाही. यापेक्षा कितीतरी अधिक निकडीच्या गोष्टी आपणास प्रथम करावयास हव्यात हे तर झालेच. पण श्रीमंती चोचले आपण भविष्यातही कधी करू शकणार नाही ही गोष्ट स्वीकारली पाहिजे. उत्पादनव्यवस्था ज्या नाना नित्य नव्या वस्तूंचे उत्पादन करीत आहे त्या विकत घेऊन त्यांच्याशी खेळ करीत बसण्याला उच्च मूल्य देणाऱ्या जीवनशैलीची पाश्चात्त्य समाजातील लोकांवर मोहिनी टाकण्यात आली आहे. यांपैकी अनेकानेक वस्तूंची लोकांना खरी गरज नसते. पण त्या वस्तू प्राप्त होणे व त्यांचा उपभोग घेता येणे याने त्यांना कृतार्थ वाटावे असे त्यांचे मानस घडविले गेले आहे. पाश्चात्त्य देशांमधील सधन वर्गाच्या जीवनशैलीशी बरोबरी आपणास करता आली पाहिजे अशी आस भारतातल्या उच्चभ्रू वर्गांच्या ठायी उत्पन्न झाली आहे. प्रगती, समृद्धी, प्रतिष्ठा यांविषयीच्या त्यांच्या कल्पना ग्राह्य मानून त्यांना समाधान देण्याचे उद्दिष्ट आपण राष्ट्रीय उद्दिष्ट म्हणून स्वीकारायचे, की कोट्यवधी लोकांच्या मूलभूत प्राथमिक गरजांची पूर्तता करण्यास अग्रक्रम द्यावयाचा? कोणत्या उद्दिष्टांची निवड आपण केली पाहिजे हे स्पष्ट आहे. म्हणूनच कोणत्याही वस्तू व सेवा यांच्या उत्पादनातील ती वाढ का असेना, उत्पादन वाढणे/वाढविणे यालाच मोठे मूल्य आहे या भूमिकेचा आपण अव्हेर केला पाहिजे. उत्पादनवाढ ही विकासाचे गमक सरळसरळ होऊ शकत नाही. 'कोणत्या वस्तू/सेवा यांचे कशासाठी व कोणासाठी उत्पादन' हा प्रश्न दरवेळी उपस्थित केला पाहिजे. आज श्रेष्ठीवर्गाची जीवनशैली विकासाची चौकट ठरविते, विकासाची व्याख्या करते. असा विकास चिर-स्थायी ठरणार नाही व तो सर्वांच्या वाट्याला कधीच येणारा नाही. तेव्हा या प्रकारच्या विकासाचा संपूर्ण अव्हेरच केला पाहिजे.

विकासाचा आजचा नमुना अंगीकारताना कोणता युक्तिवाद केला गेला ते पाहिल्यास काही गोष्टी स्पष्ट होतील. सर्वांना समानत्वाने समृद्धीचे वाटप करावयाचे असेल तर विपुल उत्पादनाची क्षमता असलेली मजबूत अर्थव्यवस्था प्रथम उभारली पाहिजे; समान वाटपाला तेव्हाच अर्थपूर्णता लाभेल, असा तो युक्तिवाद होता. उत्पादनाची रेलचेल करून सोडता यावी म्हणून दुटप्पी व्यवस्था येथे उभारली गेली. नियोजनबद्ध विकासाच्या पहिल्या टप्प्यावर औद्योगिक क्षेत्र हे अग्रेसर व अग्रक्रमाचे क्षेत्र म्हणून स्वीकारले गेले. उद्योगीकरण शक्य

व्हावे म्हणून ग्रामीण अर्थव्यवस्थेची व विशेषतः शेती क्षेत्राची पिळवणूक केली गेली. या बाबतीत प्रगत विकसित देशांत जे पूर्वी घडले त्याचेच आपण अनुकरण केले. समाजाच्या कोणत्या तरी विभागाने पोट बांधल्याखेरीज, वा काही काळ कोणत्यातरी क्षेत्राची उपासमार व पिळवणूक केल्याखेरीज विकासाची खासगी प्रक्रिया सूरूच होऊ शकत नाही हा युक्तिवाद क्षणभर ग्राह्य धरावयाचा म्हटले तरी, अग्रेसर औद्योगिक क्षेत्राच्या उभारणीमधून जे लाभ देशाच्या पदरात पडले असतील त्यांचे वाटप लौकरात लौकर सर्वांमध्ये केले जावयास हवे असे तर समतेच्या तत्त्वाच्या आधारे जरूर म्हणता येईल. तसे व्हायचे तर आता अर्थ-व्यवस्थेच्या आधुनिक विभागाकडून पारंपरिक विभागाकडे भांडवलाचा, साधनस्रोतांचा कुशल प्रशिक्षित मनुष्यबळाचा ओघ सुरू व्हायला हवा.

अगदी आरंभापासूनच आधुनिक विभागावर तंत्र-वैज्ञानिक संशोधनाची, गुंतवणुकीची, प्रगतीची मोठी खैरात करण्यात आली आहे. आणि उत्तरोत्तर तिचे प्रमाण वाढतच चालले आहे. एक ना एक सबब पुढे करून या विभागाला मिळणारी आवडतीची वागणूक तशीच कायम मिळत राहिली आहे. अर्थव्यवस्थेतला पारंपरिक विभाग शे-दोनशे वर्षांच्या कालावधीत इतका दुबळा करून ठेवला गेला होता की त्यांची वाटचाल आरंभाला मंद व संथ राहणे अटळ होते. या विभागाचे आधुनिकीकरण केल्याने तात्काळ फार मोठा लाभ पदरात पडणे शक्यही नव्हते. या दोन विभागांमधील वाढीत पडलेले अंतर भरून निघण्याची काही चिन्हे दिसत नाहीत. साधनस्रोतांचा ओघ विरुद्ध दिशेने वाहू लागण्याचीही चिन्हे दिसत नाहीत. उलटपक्षी, या दोन विभागांची वाढ विषमगतीने झाल्याचा परिणाम असा झाला आहे की, या दोन विभागांच्या आर्थिक व राजकीय बळात पुष्कळ अंतर पडले आहे. याचा फायदा आधुनिक विभागाने कोणताही मुलाहिजा न बाळगता उठविला आहे. अर्थव्यवस्थेच्या असंघटित विभागाची तसेच पारंपरिक विभागाची कोंडी निवळ होती तशी कायम राहिली आहे एवढेच नाही तर ती अधिक तीव्र बनत आहे. भांडवलीकरणाची वाढती पकड, व्यवस्थेतल्या दुटप्पी प्रक्रियांची वाढती मजबूती या कारणांनी पारंपरिक विभागात राहणाऱ्या, उपजीविका हस्तगत करणाऱ्या लोकांच्या मालकीच्या साधनस्रोतांचे वाढत्या प्रमाणावर हस्तांतर होत आहे. जे सार्वजनिक स्वरूपाचे साधनस्रोत त्यांच्या जीवनाची पुष्टी करत होते, त्या साधनस्रोतांपर्यंत ते पोचू शकणार नाहीत अशा प्रकारे त्यांच्या भोवती निर्बंधांची कुंपणे घातली जात आहेत. वनांचे रक्षण व संवर्धन केले पाहिजे, वन्य प्राणिजातींना अभय दिले पाहिजे, राष्ट्रीय विकासासाठी धरणे बांधायला, खाणी खोदायला, वेगवेगळे प्रकल्प उभारायला जमिनी पाहिजेत अशा उच्च व व्यक्तिहिताच्या गोष्टी करीत, कायदेकानूंचा बडगा वापरून लोकांना वंचित केले जात आहे. जे काही थोडे त्यांच्या वाट्याला राहिले होते तेही हिसकावून घेतले जात आहे. दोन हातांनी श्रम करण्याची शक्ती/क्षमता बाजारात विकून पोट भरण्याची पाळी लोकांवर वाढत्या प्रमाणात येत आहे. भविष्यात श्रमशक्ती विकण्यात देखील त्यांना अडचण पडेल अशी चिन्हे दिसत आहेत. श्रमशक्ती विकू पाहणारे स्पर्धक फार झाल्याने श्रमशक्ती जर खुल्या बाजारात खात्रीने विकली जाण्याचे आश्वासन नसेल तर यांना ते स्वातंत्र्यही मोबदल्यात विकून बांधील गडी बनण्याचा पर्याय पत्करण्याची पाळी येईल अशी परिस्थिती समोर दिसत आहे.

विकासाची आजची प्रचलित शिष्टमान्य चौकट स्वीकारली की विकास कोणत्या प्रकारचा होईल हे जवळपास खात्रीपूर्वक सांगता येते. दोन दिशांनीच स्थूल मानाने विकास होऊ शकतो : १) उच्चभ्रू संघटित विभागाची वाढ घडून येते आणि २) या विभागात समाविष्ट लोकांच्या हातीच क्रयशक्ती एकवटत असल्याने या विभागात समाविष्ट लोकांची ज्या वस्तू व सेवांसाठी मागणी असते त्या वस्तूंचे व सेवांचे उत्पादन वाढते. याचे आणखी एक कारण असे की अर्थव्यवस्थेतल्या आधुनिक विभागाची जोमदारपणे वाढ होत असते, आणि या विभागाची वाढ होण्यासाठी पारंपरिक विभागाला दडपून ठेवले जात असते. साहजिकच पारंपरिक विभागात समाविष्ट लोक संख्येने जास्त असले तरी वस्तू व सेवा यांना त्यांच्याकडून मागणी येत नाही. दारिद्र्याचे मान कमी करण्यासाठी ज्या योजना हाती घेतल्या जातात त्या घेतानाही क्रयशक्ती हाती असलेल्या लोकांची मागणी कशाला आहे, त्यांच्या बाजारपेठेत कोणत्या गोष्टी विकल्या जातील यानुसार योजना हाती घेतल्या जातात. उदाहरणार्थ, लांबवरच्या शहरी बाजारपेठांमध्ये विकण्यासाठी दूधउत्पादनास प्रोत्साहन देणाऱ्या - गायी व म्हशी यांच्यासाठी कर्जपुरवठा सवलतीने करणाऱ्या - योजना हाती घेतल्या गेल्या आहेत. पैसा खिशात खुळखुळतोय अशा उच्चभ्रू मंडळींची शोभेच्या कलात्मकवस्तू विकत घेण्याची हौस व क्षमता लक्षात घेऊन हस्तकलेच्या वस्तू, गालिचे व तत्सम

वस्तू तयार करण्याची केंद्रे काढण्याच्या योजना बनविल्या जातात. आणि लोकांचे दारिद्र्य दूर करण्यासाठीचा हमखास उपाय म्हणून अलीकडच्या काळात ज्या व्यवसायाचा शोध लागला आहे तो पर्यटनव्यवसायदेखील सधनांचे चोचले पुरविण्याचे उद्दिष्ट डोळ्यासमोर ठेवतो ही गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. व्यवस्थेच्या कारवायांमुळे जे हालाखीच्या परिस्थितीत ढकलले गेले आहेत, त्यांच्यावर ज्यांनी अन्याय केलेला आहे त्यांचीच सेवाचाकरी करण्याची पाळी यांच्यावर येते आणि अल्प व सुमार स्वरूपात लाभ पदरात टाकण्याबद्दल यांना त्यांचे उतराई व्हावे लागते अशी ही उपाययोजना असते हे देखील ध्यानात घेतले जात नाही. वंचित लोकांना भीक वाढली जाते आणि ही उदारपणे दिली जाण्याचा देखावा केला जातो. आपणास आणखी काय काय, कधी व किती मिळणार आहे याची आशाळभूतपणे वाट पाहायला या लोकांना लावावयाचे याची कलाच या व्यवस्थेने विकसित केली आहे. दीर्घकाळ संघर्ष करायला लावायचा व मग सवलत म्हणून चार तुकडे त्यांच्या अंगावर फेकावयाचे आणि आपण केवढे समंजस व न्यायी आहोत असे भासवण्याची कलाही या दुटप्पी व्यवस्थेने विकसित केली आहे. दुसरीकडे कोणत्याही प्रकारे आपली रीत न बदलता दुर्बल व वंचित लोकांची पिळवणूक करण्याचे काम हात न आखडता चालूच ठेवते.

राष्ट्रीय अर्थव्यवस्थेत संघटित आणि असंघटित यांच्यातील संबंध निश्चित करणारी पायाभूत समीकरणे तीच आहेत जी जागतिक चौकटीत प्रगत देश व इतर जग यांच्यातील संबंध नियंत्रित व निश्चित करतात; नव्हे, ती त्यांच्यापेक्षाही अधिक विघातक आहेत. याचे कारण असे की राष्ट्रीय व्यवस्थेत श्रेष्ठीवर्ग अधिक परिणामकारक रित्या त्यांच्यावर सोज्ज्वळ मुलामा चढवू शकतो. वेगवेगळ्या विभागातील देवाणघेवाणीच्या शर्ती कोणत्या बाजूने झुकत्या आहेत या मुद्द्याची गरमागरम चर्चा अलीकडे पुष्कळ केली जात आहे. पण ग्रामीण अर्थव्यवस्था आणि संघटित विभाग यांच्यात प्रच्छन्नपणे साधनस्रोतांचे हस्तांतरण संघटित विभागाच्या दिशेने इतक्या मोठ्या प्रमाणावर होत आहे की संघटित विभागाच्या विकासाची गती केवळ या हस्तांतरणामुळेच टिकून राहू शकत आहे. असे असल्यामुळे उलट्या दिशेने साधनस्रोतांचे हस्तांतरण कधी काळी घडून येईल अशी आशाच बाळगावयास नको. विषम व शोषक संबंध उत्पन्न करणारी पायाभूत समीकरणे बदलावयास हवीत; म्हणजे ती खंडित करावयास हवीत.

आर्थिक, राजकीय व प्रशासकीय, नव्हे जीवनाच्या सर्वच क्षेत्रात जे कमालीचे केंद्रीकरण घडून आले आहे ते मुळात या परिस्थितीला जन्म देण्यास कारणीभूत आहे. निर्णय करणारी आणि निर्णयांविरुद्ध दादफिर्याद ऐकून घेणारी, दोन्ही प्रकारची केंद्रे शहरी विभागांमध्ये एकवटावीत असाच औपचारिक व्यवस्थेचा आराखडा आहे. ही केंद्रे ज्या पद्धतीने काम करतात ती पद्धती, यमनियम समजणे सामान्यांच्या आवाक्यापलीकडची गोष्ट आहे. शिक्षण व आरोग्य यांच्यासहित सर्व सार्वजनिक सेवा शहरी विभागाभिमुख आहेत. सर्व आर्थिक संस्था शहरांमध्येच स्थित आहेत. या कारणाने यांच्याकडून कामे करवून घेण्यासाठी या सेवा पदरात पाडून घेण्यासाठी ग्रामीण भागातल्या लोकांना जादा व मोठी किंमत तर मोजावी लागतेच, पण केवळ या संस्था/यंत्रणा यांच्यापर्यंत पोचण्यासाठी त्यांना पुष्कळदा इतका पैसा व वेळ खर्ची टाकावा लागतो की त्यातही ते जवळपास लुटलेच जातात.

अर्थव्यवस्थेच्या या दोन विभागांमधील दरी बुजविल्या खेरीज आणि त्यांच्यातील भेद मिटवल्याखेरीज समताधिष्ठित रचना प्रस्थापित करता येणार नाही. लोकांच्या हाती अधिकार व सत्ता दिल्याशिवाय व ती त्यांना राबविता येईल अशी रचना केल्याशिवाय हा बदल घडून येणार नाही. स्वराज्याचा अधिकार लोकांना आहे हा दुसरा पायाभूत मुद्दा येथे उपस्थित होतो. लहान समुदायांमध्येच, आमनेसामने भेटू शकतात अशा स्थितीतच निर्विवादपणे व स्पष्टपणे लोकांच्या हाती स्वराज्याचा अधिकार दिला तरच त्यांना तो व्यवहारातही राबविता येईल हे सत्य आहे. खरे ग्रामस्वराज्य तेव्हाच अस्तित्वात येईल.

विकासाच्या पर्यायी मार्गाचा शोध घ्यावयाचा तर आर्थिक विकासाचे कार्यक्रम वा नियोजनाची नीती यांच्या मर्यादेतच बंदिस्त करून घेऊन तो समाधानकारकपणे घेता येणार नाही. राष्ट्रीय जीवनाच्या सर्व अंगांना व्यापणारा तो शोध असावा लागेल. आपल्या कृतींमुळे व्यवस्थेच्या अंगोपांगी प्रतिसाद उत्पन्न होईल अशा मोक्याच्या जागा कोणत्या ते हुडकून काढणे महत्त्वाचे आहे. ज्या दिशेने व्यवस्थेमध्ये आपणास परिवर्तन घडून यावयास हवे आहे त्या दिशेने व्यवस्थेला पावले टाकावीच लागावीत असे आघात करतील अशा त्या मोक्याच्या जागा असल्या पाहिजेत. प्रचलित, शिष्टमान्य विकासाच्या व्याख्येला, नमुन्याला व प्रक्रियेला बौद्धिक आव्हानही

दिले जाण्याची आवश्यकता आहे. विकासाचा आजचा व्यूह आपण पाश्चात्त्य सधन देशांकडून उसनवारीने घेतला आहे. या व्यूहाने त्यांचे उद्दिष्ट छान साधले, आणि आजही साधले जात आहे. आपल्या भूमीतही तिकडील नमुन्याबरहुकूम त्यांच्या येथील वारसदारांनी समृद्धीची बेटे तयार केली आहेत. मनोमन तिकडचीच झालेली ही मंडळी असा आभास निर्माण करीत आहेत की एतद्देशीय परिस्थितीला अनुरूप असाच हा व्यूह आहे. त्यांची ही पढवणूक इथे लोकांनी आत्मसात केली आहे. मानसिक गुलामीच्या या बेड्या तोडणे हे पहिले मोठे काम आहे.

या बेड्या तोडण्याचे काम कोठून सुरू करावयास हवे? विषम व अन्याय्य दुटप्पी व्यवस्थेला लोकमानसात अधिमान्यता मिळवून देण्यासाठी ज्या भिन्न कल्पना प्रसृत करून रुजविल्या आहेत त्यांचे भ्रामकत्व प्रथमतः उघडे पाडावयास हवे. आजची दुटप्पी व्यवस्था ही केवळ संक्रमण-काळापुरती आहे ही भ्रामक मिथ्यकल्पना कशी आहे हे आपण याआधी पाहिलेच आहे. स्वातंत्र्यानंतरच्या चाळीस वर्षांच्या अनुभवानंतर आपण असे ठामपणे म्हणू शकतो की, समृद्धी हळूहळू का होईना पण निश्चितपणे उत्तरोत्तर अधिकाधिक प्रमाणात खालपर्यंत झिरपत जाईल या सिद्धांतातही काही तथ्य नाही. परिवर्तन व विकास यांच्या प्रक्रियेच्या संदर्भात तंत्रविद्या ही एक स्वायत्त-स्वयंभू शक्ती आहे असे गृहीत धरता कामा नये व तसे गृहीत धरण्याची गरज पण नाही.

विषमता उत्पन्न करणे व टिकवून धरणे याला मदत करणारी सर्वात मोठी मिथ्यकल्पना म्हणजे खुद्द दारिद्र्याचे वास्तव हीच आहे. खरे तर आपल्या देशात लोक दरिद्री नाहीत; त्यांना त्यांच्या रास्त अधिकारांपासून व लाभांपासून अनेकानेक डावपेचांनी वंचित करून दारिद्र्यात ढकलले गेले आहे, हे सत्य आहे. निसर्ग व तंत्रविद्या यांचे राष्ट्रीय अर्थ-व्यवस्थेला जे योगदान होत आहे त्यातला त्यांचा योग्य व हक्काचा वाटा त्यांना मिळू दिला जात नाही; एवढेच नाही तर, ते जे श्रम उत्पादनाच्या कारणी लावतात त्याचाही योग्य तो मेहनताना त्यांच्या पदरात पडू दिला जात नाही. अतिशय उपयोगी व मौलिक अशा कौशल्यांना 'कौशल्यांचा अभाव' असे म्हटले जाते आणि बिनदिक्कतपणे त्यांची किंमत नगण्य अशी लावली जाते. पारंपरिक शेतीशी संबंधित, शेतमजुरांजवळ असलेली कौशल्ये तर ओळखलीच जात नाहीत; शेतमजूर हे 'अकुशल' मजूर आहेत असेच त्यांचे वर्गीकरण केले जाते. मजुरीचे दर ठरविले जात असताना त्यांना सर्वात खालच्या पायरीवर उभे केले जाते. या गोष्टीबद्दल कोणी प्रश्न पण उपस्थित करत नाही.

वेतन ठरविले जात असताना ज्या तत्त्वांचा आधार घेतला जातो ती तत्त्वेही एकसारखी नसतात. संघटित विभागा-तील कामगारांची मागणी अशी असते की सर्व कुटुंबांचे पोषण करण्यासाठी पुरे पडेल इतके वेतन प्रत्येकास मिळाले पाहिजे आणि या विभागातील कामगारांचे वेतन ठरविताना हे तत्त्व स्वीकारलेही गेले आहे. पण असंघटित विभागातील कामगारांची वेतनश्रेणी निश्चित करताना या तत्त्वाचा निर्देशही केला जात नाही. समता व न्याय या मूल्यांना व ध्येयांना आपली बांधिलकी घोषित करणारेही अशी वेळी वरील तत्त्व विसरून जातात. किमान वेतनविषयक कायदे करताना राज्यांची विधानमंडळे श्रमिकांमध्ये भेदभाव करतात. (असा भेदभाव करून ते खरे तर घटनेचा भंग करीत असतात.) जणू काही किमान वेतन कायद्याचे लक्ष्य असलेले मजूर ही एक वेगळीच जात आहे. एका वेगळ्याच ग्रहावरचे ते रहिवासी आहेत अशी भावना आढळते. निष्कारण त्यांच्याबद्दल फार उमाळा वाटून घेण्याचे काही कारण नाही, आपण वेगळे, ते वेगळे असा व्यवहार त्यांच्या संदर्भात होत असतो.

कमालीची अन्याय्य व विषम अशी वागणूक दिली जात असताना तिचे समर्थन हरप्रकारे केले जाते; कारण ज्या लोकांच्या हाती निवाडा करण्याचे काम असते ते स्वतःच हितसंबंधी गटांचे सभासद असतात. विकसनशील अर्थव्यवस्थेत अकुशल माणसांना श्रमशक्तीच्या बाजारपेठेत विशेष मागणी नसते. पण हे न ओळखून हे लोक पोरांचे लेंढार काढत राहतात आणि बाजारात गर्दी होत राहते. मजुरीचे दर खाली घसरावेत हे ओघानेच आले. मजुरीचे मान अगदी कमी ठरवावे लागत असले तर त्याला कोण काय करणार? असा गोंडस युक्तिवाद केला जातो. बेरोजगारांच्या संख्येमुळे मजुरीचे दर निकृष्ट पातळी गाठतात ही गोष्ट खरी नाही; मजुरीचे मान अतिशय अपर्याप्त असल्याने लोकांना श्रमशक्ती विकण्यासाठी बाजारपेठेत गर्दी करावी लागते. संघटित विभागामध्ये जेव्हा कुटुंबातील एकाहून अधिक व्यक्ती अर्थार्जन करू लागतात तेव्हाचा संदर्भ आणि असंघटित विभागातील कुटुंबातील साऱ्या व्यक्ती कामासाठी बाहेर पडतात तेव्हाचा संदर्भ यांत जमीन-

अस्मानाचे अंतर असते. एका कुटुंबाच्या वाट्याला रास्त हक्क म्हणून जेवढी मिळकत यायला हवी त्यापेक्षा अधिक वाटा पदरात पाडून घेण्याची क्लृप्ती संघटित विभागातील कुटुंब योजीत असते. आपण मोक्याच्या जागी आहोत किंवा उपजीविकेच्या साधनांवर आपली पकड आहे याचा फायदा ते कुटुंब उठवीत असते. अधिक मेहनतीची व अनाकर्षक, गैरसोयीची कामे दुर्बल व पीडित गटांमधील व्यक्तींना निकृष्ट वेतनावर किंवा त्याहूनही कमी अशा मजुरीवर करायला लावून घेतल्यावर, स्वतःसाठी जो फुरसतीचा वेळ उरतो त्या वेळेत आपल्या आवडीच्या वा सुखद अशा कामांमध्ये स्वतःला गुंतवून घेण्याचाही हा प्रकार असतो. उलटपक्षी, असंघटित विभागातील कुटुंबातील सर्वांना - स्त्री-पुरुष, पोरेसोरे, म्हातारेकोतारे - किमान तोंडमिळवणी करण्यासाठी, पोट भरण्यासाठी काम करावे लागते. असंघटित विभागात दिली जाणारी निकृष्ट मजुरी ही एकंदर आखणीचाच एक भाग आहे. दुर्बल व पीडित लोकांच्या श्रमशक्तीचा पुरेपूर वापर नाममात्र मूल्य देऊन करून घेण्यासाठी केलेली ती आखणी आहे. किमान उपजीविकेसाठी जेवढे या विभागातील लोकांना एकंदरीने मिळावयास हवे त्यापेक्षाही कमी त्यांच्या पदरात टाकले जाते. या अशिष्ट व्यवहाराचे लाभ संघटित विभागाच्या पदरात पडतात. त्यामुळे मजुरी, वेतन व नफा यांची उच्च पातळी टिकवून धरणे शक्य होते. या कृत्रिमरित्या वाढवून घेतलेल्या मिळकतीच्या आधारावर अनेकानेक उत्पादक आर्थिक व्यवहार शक्य होतात जे एरवी टिकून राहू शकले नसते, किफायतशीर ठरले नसते. आपल्या अर्थव्यवस्थेत बेकारी जरूर आहे; पण ही बेकारी लोकांना त्यांचा रास्त वाटा न देण्यातून उत्पन्न करण्यात आलेली बेकारी आहे. कष्टकऱ्यांना त्यांचा रास्त अधिकार असलेली रोजी द्यायला सुरुवात केली की ही बेकारी दूर होईल.

शेती व इतर पारंपरिक उद्योगव्यवसाय आर्थिकदृष्ट्या किफायतशीर नाहीत ही भिन्न कल्पना अशीच पद्धतशीरपणे जोपासली व प्रसृत केली गेली आहे. या उद्योगव्यवसायांची उत्पादकता कमी आहे, या व्यवसायांमध्ये त्यांना पुरेसे काम नसते म्हणून आणि म्हणून हे उद्योगव्यवसाय किफायतशीर नाहीत असा युक्तिवाद केला जातो. वास्तव वेगळेच आहे. शेतकऱ्यांना त्यांच्या शेतीत पुष्कळ कामे करावी लागतात व त्यात त्यांच्या श्रमशक्तीला पुरेपूर काम असते. आधुनिक औद्योगिक विभागातील सर्वस्वी भिन्न परिस्थितीला अनुरूप असे मापदंड व पद्धती कामाचे मोजमाप वस्तुनिष्ठपणे करण्यासाठी निश्चित करण्यात आलेल्या आहेत. शेतीमधील कामांचे वेळापत्रक अगदी वेगळे असते, कामांची सघनता एकसारखी नसते आणि त्यामुळे या मापदंडाचा व पद्धतींचा वापर करून त्यांचे 'वस्तुनिष्ठ'पणे मोजमाप करणे शक्य नसते ही वस्तुस्थिती आहे. छुपी बेकारी शेतीच्या क्षेत्रात कशी व किती आहे याची जोरदार चर्चा करून एक गैरसमज निर्माण केला गेला आहे. पण प्रत्यक्ष जर तुम्ही शेतकऱ्याच्या जीवनाचे निरीक्षण केलेत तर तो एक ना एक कामात सतत गुंतलेला आहे असे आढळेल. ज्या परिस्थितीच्या निर्मितीत त्याचा काही वाटा नाही असा अत्यंत प्रतिकूल परिस्थितीमध्ये कसेबसे पोट भरण्याइतपत उत्पन्न मिळवण्यासाठी त्याची अविरत धडपड चाललेली आपणास अनुभवायला मिळते. पण नियोजनकार व धोरणे निश्चित करणारे शास्ते यांना मात्र तो काही काम न करता बसून वेळ घालवितो आहे असे वाटते.

उत्पादनखर्चावर आधारित भाव शेतमालाला देण्याचे धोरण वरकरणी शेतकऱ्याला न्याय देणारे आहे असे भासते. पण या धोरणामुळे शेतकऱ्यांची अर्थव्यवस्था फार कोलमडली आहे. जी जमीन तो कसतो त्या जमिनीचा मालक म्हणून त्याला वास्तविक जे मिळावयास हवे ते त्याच्या पदरात न टाकण्यासाठीच या 'उत्पादनखर्चाधारित भावा' च्या उच्च तत्त्वाचा उपयोग (की दुरुपयोग) झालेला आहे. शेतीत काम करणारा तो एक मजूर आहे असे गृहीत धरून सारा हिशेब केला जातो. त्याने जमिनीचा पोत सुधारला, तिची सुपीकता वाढविली, सुधारित उत्पादनतंत्राचा वापर केला तर उत्पादनात वाढ होते त्याचा जास्तीतजास्त लाभ त्याला मिळत नाही. कारण उत्पादनात जी वाढ झालेली असते ती शेती पिकविण्यासाठी केलेल्या उत्पादन घटकांच्या गुंतवणुकीपोटी प्रथम हिशेबात धरली जाते. यामुळे उत्पादनखर्चाधारित किंमत ठरविली जाते तेव्हा उत्पादकता वाढत जाते तशा किंमती कृत्रिमरित्या कमी निर्धारित केल्या जातात. म्हणजे स्वतःच्या जमिनीची उत्पादकता वाढविली तरी वाढत्या उत्पादकतेचा लाभ त्याच्या पदरात पडत नाहीच. दर एकरी शेतीउत्पादन चांगले, प्रगत आहे असे प्रदेश हे किंमत निर्धारित करण्यासाठी आधारभूत म्हणून धरले जातात. या क्षेत्रात उत्पादनासाठी अधिक चढ्या स्वरूपात गुंतवणूक केली जात असते आणि ती हिशेबात धरली पाहिजे






असे समजले जाते. आर्थिक कुवत नसल्याकारणाने वा जमिनीला पाणी मिळू शकत नसल्याने वा अन्य कारणांनी ज्यांना आधुनिक शेतीपद्धतीचा लाभ घेता येत नाही आणि ज्यांना पारंपरिक पद्धतीने शेती करण्यावरच विसंबून रहावे लागते त्यांचे सर्वाधिक नुकसान होते. स्वतःच्या शेतीत जे श्रम करतात त्या श्रमांना मिळणारा, दिला जाणारा मोबदला असा धुपून जात राहतो, जमीनसुधार व तांत्रिक प्रगती यांच्यापोटी जे फळ त्यांच्या पदरात पडावयास हवे तेही त्यांना मिळू दिले जात नाही आणि वर मजुरीच्या रूपाने त्यांना जे उत्पन्न मिळावयास हवे त्यातलाही बराच मोठा भाग कापला जातो. शेतकी अर्थ-व्यवस्थेच्या चुकीच्या धारणांमुळे शेतकऱ्यांची आर्थिक स्थिती गरिबीच्या सीमारेषेच्या दिशेने घसरत राहिली आहे. भांडवलाचे भक्कम पाठबळ असलेले व्यापारी पद्धतीने शेती करणारे उद्योजक-शेतकरी आणि ज्यांच्या वेठीला बांधील गड्यांचे श्रम असतात असे सरंजामदार जमीनमालक यांच्या बाबतीतच आज शेती किफायतशीर राहिली आहे. गरिबांना वंचित करण्यावरच त्यांची अर्थव्यवस्था मूलतः उभी आहे.

शेतीच किफायतशीर नसल्याने शेतमजुरीचे दर अतिशय निकृष्ट राहणे अपरिहार्य आहे असे शेतमजुरांच्या अत्यल्प मजुरीचे स्पष्टीकरण दिले जाते. खरा कार्यकारणसंबंध उलटा आहे. भांडवली शेतकरी व सरंजामदार जमीनदार यांची गोष्ट सोडली तर, भारतातील बहुसंख्य शेतकरी मालक-शेतकरी आहेत. त्यांचे कुटुंबीय व ते स्वतः शेतीत खपतात. हंगामात जेव्हा कामांची गर्दी असते तेव्हा ते जरुरीपुरते मजूर लावतात. तात्पर्य असे की, शेतीत गुंतविल्या जाणाऱ्या एकूण श्रमशक्तींपैकी बव्हंश श्रमशक्ती ही मालक-शेतकरी कुटुंबियांची आहे. शेतमजुरांच्या श्रमशक्तीचे प्रमाण कमी आहे. उत्पादन-खर्चाधारित शेतमालाच्या किंमतीमुळे शेतीतल्या मजुरीचे दर दडपले जाण्याचा परिणाम म्हणून शेतकरी समाजाच्या श्रम-शक्तीचे अवमूल्यन केले जाते. श्रमशक्तीचीच किंमत अशा रीतीने कृत्रिमरित्या कमी धरल्याने शेतमालाला योग्य किंमत मिळत नाही. मग शेतीत मजुरी कमी मिळण्याचे कारण म्हणून शेतकऱ्याचे उत्पन्न कमी असते असा उफराटा युक्तिवाद केला जातो. शेतमजूर व शेतकरी-मालक दोघेही त्यांची संघटित व बुद्धिजीवी विभागांकडून होणारी वंचना व मानहानी निमूटपणे सहन करतात. आपली शेतीच अनुत्पादक, मागास व आत-बट्ट्याची तेव्हा कोण काय करणार, असे तेही आपले समाधान करून घेतात.

असंघटित विभागाची अशी दुरावस्था आहे तर संघटितांची परिस्थिती दिवसेंदिवस सुधारते आहे. संघटित विभागातील लोकांची सारी शक्ती-बुद्धी आपल्या विभागाकडे गोळा होणाऱ्या समृद्धीत स्वतःसाठी जास्त वाटा मिळवून घेण्यावर केंद्रित झाली आहे. असंघटितांची पिळवणूक वाढलीच आहे हे वर स्पष्ट केले आहेच. आधुनिक तंत्रविद्येचा अंगीकार केल्यामुळे अर्थव्यवस्थेच्या काही भागांच्या हाती संपत्ती मोठ्या प्रमाणात गोळा होत आहे. या संपत्तीवर वास्तविक साऱ्या राष्ट्राचा हक्क आहे. पण या साऱ्या संपत्तीच्या निर्मितीचे श्रेय जणू काही आपल्याच बुद्धिमत्तेला, कौशल्यांना आहे असे गृहीत धरून त्यांचे वाटप आपल्यामध्येच झाले पाहिजे असा पवित्रा संघटित विभागाने घेतला व त्याला मान्यताही मिळवून घेतली आहे. परिश्रम आणि पारिश्रमिक यात समसंबंध नाही. नाना प्रकारच्या क्लृप्त्यांनी आपल्या फायद्यासाठी वाकविली जाणारी अर्थव्यवस्था असे आपल्या अर्थव्यवस्थेचे वर्णन करणे वास्तवाला धरून होईल. उद्दिष्ट गाठले जात आहे तोवर साधनांविषयी कोणताही विवेक बाळगण्याचे कारण नाही अशी भूमिका आहे. समृद्धीच्या दिशेने दिसणारी प्रगती ही भ्रामक आहे. या बोटावरची थुंकी त्या बोटावर करण्याच्या मतलबी कौशल्याच्या आधारे चिरस्थायी विकास साध्य होऊ शकत नाही.

आधुनिक उद्योगाधारित संघटित विभाग संपूर्ण अर्थव्यवस्थेला योग्य नेतृत्व देईल असा भरवसा बाळगला गेला होता. पण तो खोटा ठरला आहे. या विभागाने स्वतःस तटबंदीआड वेगळे व सुरक्षित केले आहे. बाकीच्या अर्थव्यवस्थेशी या विभागाचे असलेले संबंध एकतर्फी व शोषणाचे आहेत. या संबंधांनी या विभागाचीच तेवढी पुष्टी होत आहे. संपूर्ण अर्थव्यवस्था टप्प्याटप्प्याने विकसित व समृद्ध होत आहे असे अनुभवास येत नाही. आपण योजना खूप महत्त्वाकांक्षी व मोठ्या बनविल्या. काय घडेल याविषयी अत्यंत आशादायी भविष्य रेखाटले. पण वास्तवात असे घडले आहे की, आधुनिक विभागावर प्रगती-विकास-समृद्धी यांच्यासाठी आपण फाजील विसंबून राहिलो. आपली आर्थिक वृद्धी मंदगतीने होत आहे याला आपले या विभागावरील अतिरेकी परावलंबन खरे तर कारणीभूत आहे. याच दिशेने वाटचाल होत राहिली तर आधुनिक संघटित विभाग व उर्वरित अर्थव्यवस्था यांच्यातील

अनुक्रमणिका

अंतर्विरोध तीव्रतर होईल व याचा परिणाम म्हणून विकासाची गती अधिकच मंद होईल. जोवर संपूर्ण अर्थव्यवस्थेतील सुप्त क्षमता व प्रचंड मनुष्यबळ यांचा कमाल उपयोग करून घेतला जात नाही तोवर वाढ ही चिरस्थायी ठरणार नाही.

आपण माणसापासून सुरुवात केली पाहिजे. यंत्र-तंत्रापासून नाही. प्रत्येक माणसाच्या ठायी असलेल्या सुप्त क्षमता, त्याच्या अंगी असलेले गुणविशेष यांचा पूर्ण विकास व्हावा हे आपले उद्दिष्ट असायला हवे. त्याचा स्वतःचा विकास; त्याचा साधन म्हणून वापर करून इतर लक्ष्ये गाठण्यासाठी केलेला 'विकास' नव्हे. प्रत्येक सक्षम व प्रौढ व्यक्तीस माणसाला साजेसा रोजगार मिळण्याचा हक्क आहे; तो त्याचा जन्मसिद्ध अधिकार आहे, हा मध्यवर्ती बिंदू आहे. या हक्काची परिपूर्ती करण्यासाठी नियोजन हवे. किंबहुना राष्ट्रापुढचा हा एककलमी कार्यक्रम असायला हवा. या कार्यक्रमाची राबवणूक करण्यात साहाय्यक म्हणून यंत्राचे स्वागत आहे. माणसाशी स्पर्धा करणारे यंत्र आपणास नको आहे. कोणालाही ढोरमेहनत करावी लागता कामा नये हे ठीक; पण कोणाचेही हात रिकामे राहणार नाहीत हे पाहण्याची पण तेवढीच गरज आहे. अंतिमतः मानवी श्रमांवरच साऱ्या गोष्टींचे उत्पादन अवलंबून असते. तेव्हा श्रमाला रास्त मूल्य मिळालेच पाहिजे. श्रमांचे मोल ठरविताना समत्वबुद्धीने व्यवहार झाला पाहिजे. तथाकथित 'अकुशल', कुशल आणि उच्च प्रशिक्षित श्रमांच्या मूल्यांमध्ये एकास-तीन यापेक्षा अधिक फरक असण्याचे कारण नाही. याहून अधिक विषमतेचे समर्थन होऊ शकत नाही.

उत्पादनसाधनांची जोड मिळाल्याखेरीज श्रमशक्ती सार्थकी लागत नाही. आज अगणित लोकांजवळच्या श्रमशक्तीला उत्पादनसाधनांपासून वंचित ठेवण्यात आलेले आहे. उत्पादन-साधनांच्या साहाय्याने, त्यावर काम करून जो आपली उपजीविका हस्तगत करीत नसेल त्याची मालकी त्या उत्पादनसाधनावर नसली पाहिजे. उत्पादनसाधनांवरील मालकी हक्काचे केंद्रीकरण संपुष्टात आणले पाहिजे.

उत्पादन कोणत्या गोष्टींचे करावयाचे हा त्या तंतरचा प्रश्न आहे. चंगळवादी जीवन सर्वांना जगता येणार नाही हे तर झालेच; पण काही थोड्यांच्या चंगळवादी जीवनालाही पृथ्वीवरील साधनसंपत्ती पुरी पडणार नाही ही गोष्ट आज स्पष्ट झाली आहे. पंचतारांकित चैनविलास आणि अठराविश्वे दारिद्र्य या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. चंगळवादावर कठोर आघात करायलाच हवा; त्याचे उच्चाटनच करायला हवे. एरवी लोक वंचित होण्याचे, दडपले जाण्याचे थांबणार नाही. पैशाने वस्तू, सेवा वा साधनस्रोत विकत घेता येतात या आजच्या स्थितीत आमूलाग्र पालट व्हायला हवा, पैसा हा कोणत्याही प्रकारचे बळ प्राप्त करून देत नाही अशी व्यवस्था निर्माण केली पाहिजे.

केंद्रीभूत सत्ता निरंकुशतेच्या दिशेने अटळपणे वाटचाल करते. केंद्रीकरण व निरंकुशता या दोन गोष्टी हातात हात घालूनच वावरतात. आपल्या अर्थव्यवस्थेची तसेच राज्यव्यवस्थेची बैठकच बदलण्याची आवश्यकता आहे. माणसाच्या जीवनव्यवहारांना जास्तीतजास्त प्रमाणात बाजार-व्यवस्थेच्या पकडीपासून मुक्त ठेवले पाहिजे. कुटुंब व गाव-समुदाय (शहर असेल तर पेठ वा मोहल्ला यात राहणारा, परस्परांना ओळखणारा समुदाय - face to face community.) यांच्या मध्यभागी ठेवून विस्तारत जाणाऱ्या वर्तुळांच्या स्वरूपात बाजारपेठेची रचना करण्याची आवश्यकता राहील : प्रत्येक वर्तुळ अधिकात अधिक प्रमाणात स्वावलंबी व स्वायत्त असावे. राजकीय व प्रशासकीय व्यवस्थादेखील या उद्दिष्टांशी सुसंवादी असायला लागेल. गावाच्या हाती मूलतः पर्याप्त प्रमाणात राजकीय व प्रशासकीय अधिकार देणे जरुरीचे आहे. ग्रामस्वराज्याच्या दिशेने वाटचाल केली पाहिजे.



देश का तरुण अशान्त है। वर्तमान समाज से उसे समाधान नही है। वह उसे बदलने के लिए छटपटा रहा है। लेकिन वह समझ नहीं रहा है की नये समाज के लिए नयी क्रांती की सिद्धी पुरानी क्रांतिकारी पद्धती की लीक पर चलकर नही हो सकेगी। उसे नयी क्रांती के लिए नया मार्ग खोजना होगा। आज गांधी के संकेत से विनोबा उस मार्ग को प्रस्तुत कर रहे है। क्या देश का तरुण समाज ग्राम-स्वराज्य की इस क्रांती को समझेगा और जल्दी से इसे पुरा करने मे जुटेगा?

धीरेन्द्र मजूमदार

# विकास आणि राष्ट्रीय एकात्मता

लक्ष्मी जैन (अनुवाद : वसंत पळशीकर)

स्वातंत्र्यलढ्याच्या काळात महात्मा गांधी म्हणाले होते, 'केवळ ब्रिटिशांच्या राजकीय जोखडापासून भारताला मुक्त करण्यात मला रस नाही. भारतीयांच्या मानेवर कोणतेही जोखड नसावे. सर्व प्रकारच्या जोखडांपासून भारताला मुक्त करण्यासाठी मी बद्ध-परिकर आहे.'

स्वातंत्र्याचे राजकारण करणाऱ्या क्रियाशील व्यक्तींनी जेल भरण्याचा कार्यक्रम पार पाडावा एवढ्याने महात्मा गांधींचे समाधान झाले नव्हते. 'विधायक कार्यक्रमा'तील समाविष्ट तेरा कार्यक्रमांपैकी कोणत्या ना कोणत्या कामात कार्यकर्त्याने स्वतःला गुंतवून घ्यावे असा गांधीजींचा आग्रह होता. हिंदू-मुस्लिम ऐक्य, अस्पृश्यतानिवारण, दारूबंदी, खादी, आर्थिक समता, प्रादेशिक व राष्ट्रभाषा यांचा विकास, कुष्ठरोग्यांची सेवा, ग्रामसफाई इत्यादींचा समावेश 'विधायक कार्यक्रमा'त होता.

रचनात्मक कार्ये अनेक अंगांनी विस्तार पावली आणि विधायक कार्य करणाऱ्यांच्या संख्येत बरीच भर पडली तशा वेगवेगळ्या कार्यांना वाहून घेतलेल्या अखिल भारतीय वा प्रादेशिक स्वायत्त संस्था उभ्या राहिल्या. यात स्त्रिया व पुरुष दोघांचाही समावेश होता. या संस्थांमध्ये काम करणारे कार्यकर्ते काँग्रेस संघटनेतही क्रियाशील होते. पण या संस्था काँग्रेस संघटनेच्या बाहेर, स्वायत्त होत्या.

एका अर्थाने या संस्थांचे काम राज्यसंस्थेच्या कार्यकक्षेत न मोडणारे होते; 'अराजकीय' स्वरूपाचे होते. पण यांचे काम काही वेळा सरकारच्या सरळसरळ विरोधात असे. परकीय मालावरील बहिष्कार आणि स्वदेशी मालाचा पुरस्कार हा कार्यक्रम एकाच वेळी रचनात्मक होता आणि तत्कालीन सरकारच्या धोरणांचा सरळसरळ विरोध करणारा होता. कापड आणि (परदेशी) दारू यांवर बहिष्कार टाकलेला होता. मी जे म्हणतोय त्याचे हे एक चांगले उदाहरण आहे. महात्माजींनी आंदोलन छेडले की विधायक कार्यकर्ते आपापली नित्याची कामे सोडून सत्याग्रहात सामील होत, तुरुंगवास पत्करीत. लढा मागे घेतला की परत आपापल्या विधायक कार्यात बुडून जात. 'शांततेच्या काळातील छावण्या' या शब्दांमध्ये गांधीजींनी या संस्थांचे वर्णन केलेले आढळते.

'प्रजासत्ताक खेडी' आणि 'स्वावलंबी खेडी' या दोन संकल्पनांच्या आधारे गांधीजींनी खऱ्या अर्थाने स्वतंत्र असणाऱ्या भारताची प्रतिमा उभी केली. स्वतंत्रता प्राप्त झालेल्या भारताची राजकीय संरचना ग्रामपंचायत या पायाभूत एककाच्या आधारे, तर ग्रामस्वावलंबनाच्या - म्हणजे स्थानिक गरजांच्या पूर्तीसाठी स्थानिक उत्पादन - आधारे आर्थिक पुनर्मांडणी करावयाची होती. राजकीय स्वातंत्र्य हस्तगत केल्यावर व्यापक व मूलगामी समाजपरिवर्तन घडवून आणणे हे गांधीजींच्या डोळ्यासमोरील लक्ष होते. या 'दुसऱ्या स्वातंत्र्या'च्या सिद्धीमध्ये जनसामान्यांना मध्यवर्ती व निर्णायक भूमिका पार पाडावयाची होती. राजकीय व आर्थिक विकेंद्रीकरणाच्या गांधींच्या या रणनीतीमध्ये जनसामान्यांची ही महत्त्वपूर्ण भूमिका अनुस्यूत होती.

भारताला राजकीय स्वातंत्र्य प्राप्त करून दिल्यावर काँग्रेस संघटनेने आपले जीवित कार्य पार पाडले आहे याविषयी गांधीजींची स्पष्टता होती असे निश्चितपणे म्हणता येते. राज्याची धुरा सांभाळणारा एक राजकीय पक्ष असे रूपांतर काँग्रेसच्या भूमिकेमध्ये घडून आल्यावर, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर, भारतीय समाजाचे व्यापक व मूलगामी राजकीय-आर्थिक परिवर्तन घडवून आणणाऱ्या चळवळीचे नेतृत्व करण्याची क्षमता काँग्रेसमध्ये उरणार नाही अशा निष्कर्षाला ते पोचले होते. या कामाची धुरा लोकसेवक संघाला सांभाळावी लागेल असे त्यांचे मत होते. वेगवेगळ्या रचनात्मक कार्यांच्या द्वारे अशा परिवर्तनाची प्रक्रिया गतिमान करणाऱ्या लोकसेवक संघाची घटना, कार्यपद्धती व उद्दिष्टे यांची मांडणी करण्याचे काम गांधीजींनी हाती घेतले होते. नेमक्या या क्षणी त्यांचा खून झाला. शासनाने नियोजनबद्ध विकासाचा कार्यक्रम पुढच्या काळात हाती घेतला. लोकांच्या पुढाकाराने व सहभागाने 'दुसरे स्वातंत्र्य' हस्तगत करण्याच्या कार्यक्रमाहून हा सरकारी कार्यक्रम अगदी भिन्न होता.

गांधीजी समाज आणि राज्यसंस्था यांच्यातील भेद

अनुक्रमणिका






महत्त्वाचा मानत होते. यामागे तात्त्विक अधिष्ठान होते राज्यसंस्थेची किंवा शासनसंस्थेची कार्यकक्षा व पोच किमान असावी. किमान तेवढ्या गोष्टी आपल्याकडे घेते ते शासन गुणवत्तेने श्रेष्ठ होय, असे त्यांचे मत होते. जीवनाचे संघटन व व्यवस्थापन जास्तीत जास्त प्रमाणात सर्व क्षेत्रांत समाजाने स्वतःचे स्वतःच करावे, तशी क्षमता संपादावी, यावर त्यांचा कटाक्ष होता. व्यक्ती असो की समाज असो, कोणी परावलंबी असावे या गोष्टीचा त्यांना तिटकारा होता. त्यातही, समाजाने शासनसंस्थेवर अवलंबून राहणे म्हणजे, त्यांच्या मते, आत्महत्याच करणे होय.

जीवनाचे कप्पे पडू शकत नाहीत असेही गांधीजींचे मत होते. सामाजिक, राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक, धार्मिक वा नैतिक - जीवनाची सारी अंगे सलग, अतूट व अन्योन्यसंवर्धक असतात अशी त्यांची धारणा होती.

"राजकारण हा धर्माचरणाचाच भाग नाही का? सद्धर्माचरणाचे भान ठेवून राजकारण केले तरच लोकांना योग्य दिशेने प्रभावित करण्यात राजकारण यशस्वी होऊ शकते. राजकारणामध्येही शुद्ध नैतिक वर्तनाची तेवढीच गरज आहे.

" 'विधायक कार्यक्रमा'त समाविष्ट सर्व कामे करण्यात देशातील सगळीच्या सगळी चाळीस कोट जनता मग्न झाली अशी कल्पना करा. तळापासून, पायापासून राष्ट्राची उभारणी करण्याच्या उद्देशाने 'विधायक कार्यक्रमा'चा आराखडा तयार करण्यात आलेला आहे. राजकारणाच्या संसर्गाने विधायक कार्य भ्रष्ट होईल असे राजकारणाचे स्वरूप असणार नाही, असता कामा नये. 'विधायक कार्यक्रमा'मध्ये राजकारण सामावलेले आहेच. (लुई फिशर यांनी लिहिले आहे : राजकारण्यांची अशी इच्छा होती की गांधीजींनी राजकारणी व्यवहार करावा, तर खेडुतांना सशक्त बनविणाऱ्या 'व्हिटॅमिन्स' चा पुरवठा करणे हे गांधीजींच्या मते सर्वोत्तम राजकारण होते.)

"अर्थकारण आणि धर्मकारण यांच्यात अन्योन्य संबंध असण्याची आवश्यकता, व त्यांच्या अभिन्नते मधून तयार होणारे सौंदर्य यांचा प्रत्यय विधायक कार्यामध्ये गुंतलेल्या सर्व संघटनांना आला आहे.

"चरखा चालविता चालविता ईश्वराचे दर्शन घडणे शक्य आहे. कोट्यवधी जनसामान्यांशी समरस होण्याची क्षमता चरखा आपल्या ठायी उत्पन्न करतो. दरिद्रांतील दरिद्री माणसालाही आपल्या वर्तुळात समाविष्ट करून घेण्याचा विशेष गुण चरख्यामध्ये आहे. कोणासही वगळण्याच्या आड चरखा उभा राहतो."

सूतकताई आणि ईश्वर, अर्थकारण आणि धर्म, राजकारण आणि विधायक कार्य यांच्यात एकत्व कल्पिणे हे प्रथमदर्शनी असंभवनीय वाटते. पण हे एकत्व साध्य करण्याची गुरुकिल्ली गांधीजींनी आपल्या हाती दिली. ध्येये व साध्ये आणि साधनमार्ग दोन्ही नैतिक मूल्यांनी नियमित व नियमित झाली पाहिजेच ही त्यांची शिकवण होती. हीच गुरुकिल्ली होय. "साध्य व साधन हे शब्द असे आहेत की जे एकमेकांच्या जागी वापरले जाऊ शकतात" असे म्हणून गांधीजी म्हणतात, "म्हणून जेथे साधने अनेक प्रकारची व परस्परविरोधी असतात तेथे साध्यांमध्येही त्यांचे प्रतिबिंब पडते. साध्येही अनेक व परस्परविरोधी बनतात. कोणती साधने वापरावयाची, कोणते मार्ग अनुसरावयाचे ते आपल्या हाती असते. साध्यांवर आपले असे नियंत्रण नसते.

राजकारण व सत्य आणि अर्थकारण व नैतिकता यांच्यातला संबंध जुळ्यांचा होता असे गांधीजी मानीत. "असत्याचा आश्रय घेऊन मी भारताचे स्वातंत्र्य संपादन करणार नाही", अशी त्यांची प्रतिज्ञा होती. भारतीय स्वातंत्र्याचे ध्येय सफळ करण्यासाठी शुद्ध नैतिक साधन-मार्गांचाच अवलंब करण्याची भूमिका भारतीय समाजाच्या पुनर्रचनेच्या संदर्भातही कायम होती. ऑगस्ट १९४७ मध्ये भारताला स्वातंत्र्य मिळाले. त्यानंतर पुरते सहा महिनेदेखील गांधीजी जगले नाहीत. पण त्यांच्या ज्या सहकाऱ्यांनी राज्याची धुरा सांभाळली त्या नेहरू, पटेल प्रभृती मंडळींमध्ये आणि शासनाबाहेर राहून खेड्यांच्या उत्थानाला पूर्णपणे वाहून घेतलेल्या विधायक कार्यकर्त्यांमध्ये एवढ्या थोड्या अवधीतही तीव्र मतभेद उत्पन्न झाले. शासनसंस्था भलत्याच दिशेने नेणारी धोरणे अवलंबित आहे. त्यांचा सल्ला मानीत नाही, अशी त्यांनी गांधीजींपाशी तक्रार केली. तेव्हा गांधीजींनी त्यांना सांगितले, "सगळ्याच्या मुळापर्यंत जा आणि पाया भक्कम करण्याचा जेवढा प्रयत्न करता येईल तेवढा करा."

'विधायक कार्या'चे संघटन करण्याचे उद्दिष्ट जनतेच्या ठायी व त्या पातळीवर राजकीय शक्ती उत्पन्न करणे हे आहे. प्रौढ मताधिकारावर चालणाऱ्या व्यवस्थेत,





आपण जर खरे विधायक कार्यकर्ते असलो आणि आपण आपले काम चोखपणे बजावले तर लोकांवर आपला प्रभाव इतका असायला हवा की आपण ज्याची निवड करू तो निवडून येईल. आजच्या काँग्रेस संघटनेच्या करवी आपल्या कल्पनेतील नवसमाजव्यवस्था अवतरणार नाही हे आपण ओळखले पाहिजे. राज्यघटना बनविण्याचे काम काही महिन्यांमध्ये पुरे होईल. पुढे काय? ती यशस्वीपणे राबविणे तुमच्या कामावर अवलंबून आहे." गांधीजी असेही म्हणाले, "लोक जर तुमच्याबरोबर असतील तर शासनाला प्रतिसाद देणे भागच पडेल." शासनाकडून आपले म्हणणे मान्य करवून घेण्याच्या भूमिकेपासून समजुतीने पण ठामपणे आपल्या अनुयायांना परावृत्त करून लोकांमध्ये राहून काम करण्याच्या मार्गावर त्यांना गांधीजींनी दृढ केले.

गांधीजींच्या मृत्यूनंतर थोड्याच अवधीत "विधायक कार्य करणाऱ्या वेगवेगळ्या संस्था सर्वसेवा संघ या नावाच्या विशाल संघटनेमध्ये एकत्र आल्या. गांधीजींची जागा दुसरा कोणी भरून काढणे शक्य नव्हते. पण विनोबा भावे व जयप्रकाश या दोन चैतन्यशील कृतिवीरांनी पुढच्या काळात सर्वोदय चळवळीचे नेतृत्व केले. विनोबांकडे महात्मा गांधींचा अध्यात्मिक वारसदार म्हणून पाहिले जात होते. समाजवादाकडून सर्वोदयाकडे जयप्रकाशांचा वैचारिक प्रवास घडला होता. दोघांची पार्श्वभूमी वेगळी होती व वळणही वेगळे होते.

विधानसभा आणि मंत्रालय-सचिवालयांच्या बाहेर राहून स्वयंशासनाची क्षमता असलेल्या खेड्यांची बांधणी करण्याचा लोकलढा पुढे चालविण्याचे आवाहन जयप्रकाशांनी स्वातंत्र्य-सैनिकांना केले. गांधीजींच्या शिकवणुकीशी सुसंगत असाच कार्यक्रम जयप्रकाश देत होते. शासनाच्या गैरचालींविरुद्ध प्रतिकार करण्याची व लढा देण्याची ही प्रजासत्ताक खेडी केंद्रे बनावित आणि भारताच्या प्रजासत्ताकाची इमारत अशा खेड्यांच्या विटांनी रचली जावी, अशी त्यांची दृष्टी होती.

गांधीजींची थोर शिकवणूक स्मरणात ठेवण्याचे सामाजिक क्रांतीमध्ये सक्रिय असणाऱ्या कार्यकर्त्यांना आवाहन करीत जयप्रकाश म्हणाले, "साध्ये व साधने यांच्यात एकत्व असते. दुष्ट साधनांकरवी सुष्ट साध्ये सफळ होत नाहीत. सर्व राजकारण हे सत्तेचे राजकारण नसते, नसायला हवे. लोकशाहीच्या परिपोषासाठी हे आवश्यक आहे की लोकांचे शासनसंस्थेवर कमीत कमी अवलंबन राहील, आणि स्वसामर्थ्यावर त्यांचा जास्तीत जास्त भरवसा राहील."

या तत्त्वांविरुद्ध पद्धतशीरपणे गांधीवधोत्तर कालखंडात आपण वाटचाल केली आहे. परिणामी समतेवर अधिष्ठित समाजाची निर्मिती आपण गोत्यात आणली आहे. आणि ज्या मर्यादेत व प्रमाणात आपली समता प्रस्थापनाच्या दिशेने वाटचाल चालू आहे त्या वाटचालीसाठी आपण आपली सर्व मदार शासनसंस्थेच्या खांद्यावर ठेवली आहे.

राष्ट्रबांधणीविषयी गांधीजींची दृष्टी व भूमिका काय होती याची येथवर आपण उजळणी केली. राष्ट्रीय एकात्मता व राष्ट्र बांधणी यांची आपली संकल्पना काय आहे, असा प्रश्न आपण आता स्वतःला विचारू या. हिमालय पर्वतराजी आणि पश्चिम घाटातल्या डोंगररांगा या परस्परांमध्ये विलीन व्हाव्यात अशी कोणीच अपेक्षा करीत नाही. मुद्दा असा की, ज्या विविधतेने देश नटलेला आहे ती विविधता व भेद सर्व काही मिटणे म्हणजे राष्ट्रीय एकात्मता साकार होणे नव्हे. भविष्यातल्या एकात्म राष्ट्रातही हिंदू व मुस्लिम ओळखू येण्याइतके वेगळे राहणार आहेत. अर्थ असा की, एकात्मता, समरसता साधली आहे की नाही हे तपासून पाहण्याच्या निर्णायक व मोक्याच्या जागा कोणत्या आहेत याचे भान राखले पाहिजे.

उदाहरणार्थ, आपल्या समाजातल्या दोन समूहांचा विचार करा. आजही उपजीविका हस्तगत करण्यासाठी ज्यांना डोक्यावरून रोज मैला वाहावा लागतो असे लोक आपल्या देशात आहेत. स्वतःचा मैला नाही तर इतरांचा मैला. अशा लोकांचा की ज्यांना अंघोळ करण्यासाठी, स्वतःची स्वच्छता करण्यासाठी सोयी उपलब्ध आहेत. पण ज्यांना मैला वाहून न्यावा लागतो त्यांना स्वतःची स्वच्छता करण्यासाठी, स्वतःचे आरोग्य सांभाळण्यासाठी साबण, मुबलक पाणी या गोष्टी उपलब्ध आहेतच असे नाही. यांचा भंगीव्यवसाय 'घाणेरडा' मानला जातो व त्यांना दूर ठेवले जाते.

मृत जनावर स्वतःच्या खांद्यावर वाहून नेणारे, आणि हातांनी गुरे फाडणारे व पायांनी चामडे कमावणारे लोकही आपल्या देशात आहेत. मृत जनावरे तातडीने हलवून त्यांची विल्हेवाट लावणाऱ्या या माणसांची सेवा उपलब्ध नसती तर ग्रामीण भागातील लोकांवर साथीच्या रोगांचे संकट कायम टांगलेले राहते. हा व्यवसायही घाणेरडा मानला जातो.

भंगी आणि ढोर, चांभार यांना समाज अस्पृश्य मानतो. वास्तविक समाजाची मौलिक सेवा ते बजावतात. या









दोन व्यवसायांचे 'घाणेरडेपण' दूर करून ते 'स्वच्छ' व्यवसाय बनावेत आणि हे व्यवसाय करणाऱ्याची अस्पृश्यता मिटावी यासाठी आपण काय केले आहे? समाजातील इतर लोकांशी यांची समरसता व एकात्मता झाल्याशिवाय राष्ट्र एकात्म कसे काय बनणार आहे?

स्वातंत्र्याची पहाट ज्यांच्या आयुष्यात उगवलेलीच नाही, स्वातंत्र्याची ऊब ज्यांच्यापर्यंत पोचलेलीच नाही त्यांना एकात्म व समरस बनविण्याचा कोणता कार्यक्रम आपल्यापाशी आहे? ऑगस्ट १९४७ मध्ये भारतमाता स्वतंत्र झाली. पण तिची लक्षावधी लेकरे आजही 'बंधुआ मजदूर' (बांधील गडी) आहेत. गोऱ्या साहेबांचे ते दास नाहीत. त्यांच्याच बांधवांचे ते दास आहेत. बांधील गड्यांना मुक्त करण्याचा आपण जसा फार्स करीत आहोत तसे ब्रिटिशांनी केवळ देखाव्यापुरते भारतास राजकीय स्वातंत्र्य बहाल केले नाही हे आपले केवढे भाग्य! बंधुआ मजदुरांचे दास्य जास्त घट्ट बनेल अशा प्रकारे आपण त्यांना 'मुक्त' करीत आहोत. स्वतःचे पोट भरण्याचा कोणताच रोजगार वा उत्पादनाचे साधन उपलब्ध नसलेली ही माणसे पुन्हा एकवार त्यांच्या जुन्या मालकांकडे परततात आणि कर्जाच्या गाळात दुप्पट खोलवर रुततात आणि दास्याच्या अधिक जाड बेड्या पायात घालून घेतात. वर सरकारचे कर्जही त्यांच्या डोक्यावर बसते. मुक्त करताना सरकार त्यांना जी रक्कम कर्जाऊ देते ती त्यांच्या उपयोगी पडत नाही; ती त्यांना आणखी करकचून बांधून घेण्याच्या कामी त्यांच्या मालकांच्याच कामी येते : सरकारी कर्ज फेडण्यासाठी ही माणसे मालकाकडून पैसे घेऊन स्वतःला त्यांच्या हवाली करतात. भारतमातेच्या जिव्हारी लागणारी याहून अधिक खोलवर जखम कोणती होऊ शकते?

दारिद्र्यरेषा कोठे आखावयाची आणि त्या रेषेखाली असलेल्या कुटुंबांना रेषेच्या 'वर' नेण्यासाठी काय करता येईल यासाठी चालणारी चर्चा वांझोटी असते हे आपणास अनुभवाने चांगले माहीत आहे, म्हणून मी त्यात शिरत नाही. दारूच्या व्यसनापायी अगणित कुटुंबे कायम दारिद्र्यात राहतात याकडे मी तुमचे लक्ष वेधू इच्छितो. केवळ उत्पन्नाच्या कसोटीवर मोजल्यास जी कुटुंबे दारिद्र्यरेषेच्या वर आहेत असे ठरेल ती कुटुंबे या व्यसनामुळे दरिद्री बनतात व दरिद्रीच राहतात. गुहान या अभ्यासकाने यास 'सेकंडरी पॉव्हर्टी' असे म्हटले आहे. दारूपासून मिळणाऱ्या व अबकारी कराच्या उत्पन्नाचा लोभ आज राज्यशासनांना इतका आहे की व्यसनाच्या वाढीस सरकारे प्रोत्साहन देत आहेत, खतपाणी घालत आहेत.

गुहान जी तथ्ये आपणासमोर ठेवतात ती डोळ्यात अंजन घालणारी आहेत : "२० ते २५ टक्के कर आकारला जातो असे गृहीत धरले तर दरवर्षी १२ ते १५ हजार कोटी रुपयांची दारू खपते असा अंदाज निघतो. कारण १९८८-८९ या वर्षामध्ये दारूपासूनच्या कराचे उत्पन्न ३००० कोटी रुपये होते. ही रक्कम राष्ट्रीय उत्पन्नाच्या ५ टक्के इतकी अधिक आहे. अंगमेहनतीचे काम करून पोट भरणाऱ्या लोकांमध्ये आणि आदिवासी व पूर्वास्पृश्य यांच्यामध्ये दारूच्या खपाचे प्रमाण विशेष करून जास्त आहे. दारू पिण्यापासून इतर जे काही वाईट परिणाम होतात ते होतातच; घरातील इतर बाया व मुले यांच्या परिस्थितीवर पुरुष मंडळींच्या दारू पिण्याने होणारा आघात विशेष तीव्र असतो.

शारीरिक व मानसिक क्षमता व जोम यांच्या बाबतीत समाजातल्या सुस्थितीतील वर्गांबरोबर येण्याच्या आड येणारे इतरही अडथळे आहेत. या अडथळ्यांमुळे विपन्नावस्थेत असलेल्या लोकांची अन्य समाजघटकांबरोबर एकात्मता साधण्याचे लक्ष्य अधिकच दुर्घट बनते.

इंडियन कौन्सिल ऑफ मेडिकल रिसर्च या संस्थेच्या म्हणण्यानुसार 'सामान्य स्थितीतल्या प्रौढ भारतीय व्यक्तीचे अन्नसेवन हे तिच्या पोषणविषयक गरजेच्या मानाने फार कमी आहे.' विशेषतः 'गरजेच्या मानाने केवळ एक-तृतियांश प्रमाणाइतके थोडे प्रथिन शरीराला मिळते. सरासरी उंची, वजन जोम आणि बालक-अवस्थेतील मेंदूची वाढ यांत इष्ट ती सुधारणा होण्यासाठी इतर पोषणद्रव्यांच्या जोडीला प्रथिनांच्या सेवनामध्ये वाढ होणे नितांत आवश्यक होते. दारिद्र्याचे निर्मूलन करावयाचा सगळ्यात सरळ व मुळावर घाव घालणारा उपाय कोणता असे विचारल्यास, निर्णायक महत्त्वाच्या पोषणद्रव्यांचे (उदा. प्रथिने) उत्पादन व सेवन वाढविणे हा तो उपाय होय, असे उत्तर द्यायला हवे.' असे पोषण देणारे जे अन्नपदार्थ आहेत त्यांमध्ये दारूला अजिबात जागा नाही पण प्रथिनांच्या पुरवठ्याला अग्रेसर महत्त्व आहे.

डाळींमध्ये प्रथिनांचे प्रमाण भरपूर आढळते. शाकाहार हाच भारतातील जनसामान्यांचा नेहमीचा आहार आहे. शाकाहारी जेवणात पुरेशा प्रमाणात डाळींचा समावेश असावा म्हणून याला फार मोठे महत्त्व आहे. गरिबांच्या दृष्टीने विचार करता

अनुक्रमणिका

डाळी हाच प्रथिनांचा मुख्य स्त्रोत आहे.

गेल्या पंचवीस वर्षांच्या काळात डाळींची आहारातील दरडोई दैनिक उपलब्धता ६९ ग्रॅमपासून ४० ग्रॅमपेक्षाही कमी इतकी खाली घसरली आहे. म्हणजेच जवळपास ४० टक्क्यांनी घट झाली आहे. गोरगरीब जनतेच्या रोजच्या आहारात डाळींचे प्रमाण अर्थातच या सरासरीपेक्षा फार कमी आहे. देशातल्या अगदी वरच्या १० टक्के कुटुंबांमध्ये दरमहा डाळींवर जेवढा खर्च होतो तो तळातल्या १० टक्के कुटुंबांमध्ये केल्या जाणाऱ्या खर्चापेक्षा पाच पटींनी अधिक आहे. शिवाय गेल्या २५ वर्षांत डाळींच्या ठोक भावाच्या निर्देशांकात ४.५ पटींनी वाढ झाली आहे. गरीब कुटुंबांना डाळ विकत घेणे आज परवडणारे राहिले नाही.

अगदी वरच्या व अगदी तळच्या १० टक्के कुटुंबांच्या अन्नसेवनामध्ये सुमारे पाच पटींचे अंतर आहे. दुधाच्या सेवनात तर १५ पटींचे अंतर आहे. अनेक रोग पायांवाटे शरीरात प्रवेश करतात. आरोग्य व स्वच्छता या दोन्ही दृष्टीने पादत्राणे घालता येणे महत्त्वाचे आहे. पादत्राणांवर केल्या जाणाऱ्या खर्चाच्या बाबतीत अंतर १६ पटींहून जास्त आहे.

अशा कमालीच्या विषम परिस्थितीमध्ये जगणाऱ्या समाजघटकांना एकात्म बनविणे ही गोष्ट महाकर्मकठीण आहे.

इतक्या वेगवेगळ्या प्रकारच्या प्रभावांनी ग्रस्त उपासमारीचे जीवन जगाव्या लागणाऱ्या लोकांनी आपल्याच समाजातील अधिक भाग्यवान लोकांचे आगतस्वागत करावयाची हिंमत बांधली तर त्यांनी संवाद कसा साधावयाचा? त्यांची साक्षरता व निरक्षरता हिशेबात घेऊन? देशातील किती लोकांना लिहितावाचता येते याची गिनती करून या प्रश्नाचे उत्तर देणे पुरेसे नाही. साक्षर व निरक्षर यांच्यात पडणाऱ्या दरीचे इतर काही पैलू वा पदर चिंतनीय आहेत. स्त्रियांना पुरुषांपासून वेगळे पाडणारी ही दरी आहे. जवळपास २४१ दशलक्ष स्त्रिया निरक्षर आहेत. ग्रामीण भागातल्या खेडुतांना नागर समाजापासून वेगळी करणारी ही दरी आहे. अनेक राज्यांमध्ये ग्रामीण भागात स्त्रियांच्या साक्षरतेचे प्रमाण १० टक्क्यांहूनही कमी आहे. पूर्वास्पृश्यांमध्ये साक्षर स्त्रियांचे प्रमाण शून्य टक्क्याच्या जवळपास आहे. या स्त्रिया इतर सर्व समाजापासून या दरीने किती दूर फेकल्या जात असतील याची कल्पना करा. मुले मुलांपासून विभागणारी ही दरी आहे. अक्षरे ज्यांनी कधी पाहिली नाहीत, व्याकरणाचा ज्यांच्यावर कधी संस्कार झाला नाही, ज्यांनी कधी शाळेची पायरी चढली नाही अशी लाखो मुले आहेत. ती आपल्या धाकट्या भावंडांना सांभाळतात किंवा गुराढोरांच्या मागे जातात. आधीच अगदी अपुऱ्या असलेल्या कुटुंबांच्या जेवणात कदाचित मिठाची भर घालता यावी म्हणून वेठबिगार करतात. निरागस बालपण ही काय चीज असते याचा अनुभव न घेताच ती प्रौढ बनतात. ही केवढी मोठी शोकांतिका आहे! आयुष्यभर बालिश अवस्थेतून बाहेर न येणाऱ्या 'प्रौढां'बरोबर बालपण न अनुभविलेल्या या प्रौढांची एकात्मता कधी साधावयाची?

सर्व मुलांना प्राथमिक शिक्षण दिले जावे यासाठी राज्यघटनेने १० वर्षांची मुदत घालून दिली होती. चाळीस वर्षांनंतरही हे लक्ष्य गाठण्याच्या आपण आज जवळपास पण कोठे नाही. 'पैसा कमी आहे' हे कारण पुढे करून शिक्षण मंत्रालय असे जाहीर करते की या बाबतीत आपण फार काही करू शकणार नाही. पैशाची कमतरता आणखी वाढणारच आहे. सहाव्या पंचवार्षिक योजनेच्या काळात केंद्र व राज्य सरकारे यांचा पोलिसयंत्रणेवरील एकूण खर्च ८२३२ कोट रुपये झाला त्याच काळात शिक्षण, आरोग्य व कुटुंबकल्याण व नियोजन या बाबींवर योजनेच्या अंतर्गत ६,३८८ कोट रुपये खर्ची पडले. १९८०-८१ साली पोलिस यंत्रणेवरील खर्च ११०० कोट रुपये होता. हे मान तसे मुळात चढेच आहे. पोलिसयंत्रणेवरील खर्च याच पातळीवर रोखून धरला असता तर शिक्षण, आरोग्य व कुटुंबनियोजन या बाबींसाठी सहाव्या योजनेच्या काळात जवळपास ५० टक्क्यांनी अधिक पैसा उपलब्ध झाला असता.

केवळ पोलिसयंत्रणेवरील खर्च वेगाने वाढत आहे असे नाही. सरकारी कर्मचाऱ्यांवर होणाऱ्या खर्चात होणारी वाढ अशीच प्रचंड आहे. १९८०-८१ आणि १९८५-८६ या काळात प्रशासन व प्रशासनाशी संलग्न सेवांवर वेतन व रोजी या स्वरूपात होणाऱ्या खर्चात दुपटीने वाढ झाली. प्रा. लाकडावाला यांच्या म्हणण्यानुसार, 'कर्मचाऱ्यांच्या संख्येत आणि त्यांच्या खऱ्या उत्पन्नात (real income) जर बदल झाला नसता तर १९८५-८६ मध्ये ४८०० कोट रुपयांची बचत झाली असती.' ४८०० कोट रुपयांपैकी दोन-तृतियांश वाढ ही सरकारी कर्मचाऱ्यांच्या खऱ्या उत्पन्नात घडून आलेल्या वाढीमुळे झालेली आहे. महाराष्ट्र राज्यात राबविल्या जाणाऱ्या रोजगार हमी योजनेच्या धर्तीवर एक रोजगार हमी योजना





अखिल भारतीय पातळीवर चालविण्यासाठी ४८०० कोट रुपयांची रक्कम पुरेशी पडली असती असे प्रा. लाकडावाला यांचे मत आहे. महाराष्ट्रातल्या रोजगार हमीयोजनेमुळे ग्रामीण भागातल्या लोकांच्या, विशेषतः स्त्रियांच्या उत्पन्नात लक्षणीय वाढ झाली आहे आणि त्यामुळे मुलांचे पोषण सुधारण्यास हातभार लागला. शेतमजुरांना किमान वेतन मिळवून देण्याच्या दृष्टीनेही या योजनेचा उपयोग झाला आहे.

रोजगारनिर्मितीच्या लक्ष्यास राज्यकर्ते फार खालचा क्रम देत आहेत हे तर झालेच; पण असलेला रोजगार मोठ्या प्रमाणावर काढून घेण्याची धोरणे मात्र नेटाने अमलात आणली जात आहेत. हातमाग विणकरांचे उदाहरण बोलके आहे. कापड उद्योगातील एका असामीने दहा वर्षांच्या आतच १००००कोटहून अधिक रुपयांची भांडवली गुंतवणूक असलेला उद्योग-समूह उभारला आहे. गेल्या शंभर वर्षांच्या कालावधीत एक कोट विणकरांना, सर्वांना मिळूनही जेवढी भांडवली मालमत्ता संपादता आलेली नाही त्यापेक्षा अनेक पटींनी या एका उद्योगपतीने मालमत्ता आज संपादन केली आहे.

सुरक्षित रोजगार असलेले काही लाख लोक एका बाजूला तर बेरोजगार वा रोजगार गमावून बसणारे कोट्यवधी दुसऱ्या बाजूला, या दोघांमध्ये एकात्मता कशी काय प्रस्थापित करणार? संघटित क्षेत्रातील औद्योगिक कामगारांचे प्रमाण १३ टक्के तर असंघटित क्षेत्रातील कामगारांचे प्रमाण ८७ टक्के आहे. संघटित क्षेत्रातील औद्योगिक कामगारांचे उत्पन्न व जीवनसरणी चलनवाढ होत असतानाही संरक्षित राहते इतकेच नाही तर, उत्पन्नात खऱ्या अर्थाने वाढपण होते व जीवनसरणी उंचावतेही. अशा परिस्थितीत या दोन कामगार समाजांची एकात्मता कशी प्रस्थापित करावयाची?

यांच्यातील विषमतेने व्यथित होऊन प्रा. दांतवाला यांनी मोठ्या खेदाने असे म्हटलेय की, समताप्रस्थापनेचे ध्येय भारतात विस्मृतीच्या गर्तेत ढकलले गेले आहे. ते म्हणतात, "विषमतेच्या समाजविघातक परिणामांविषयी स्वातंत्र्यलढ्याचे नेतृत्व करणाऱ्यांना तीव्र बोच होती. अस्पृश्यतानिर्मूलनाचे कार्य, श्रमनिष्ठ जीवनावरील भर आणि त्यांच्या अठरा कलमी रचनात्मक कार्यक्रमामध्ये समतेच्या प्रस्थापनेची प्रतिपादलेली निकड यांवरून महात्मा गांधींना समताप्रस्थापनेविषयी असलेली आस्था व बांधिलकी यांची कल्पना येते. आर्थिक समतेच्या भक्कम पायावर जर साऱ्या रचनात्मक कार्यक्रमांची बांधणी केली नाही तर सर्व इमला पत्त्यांच्या बंगल्याइतकाच क्षणभंगुर ठरेल ही गोष्ट त्यांनी फार स्पष्टपणे नोंदवली आहे. धनवान आणि उपासमारीत जगणारी कोट्यवधी जनता यांच्यात रुंद दरी कायम असेतोवर अहिंसेवर अधिष्ठित शासन अस्तित्वात येणे अशक्य आहे असे त्यांचे म्हणणे होते..."

विषमतेला खुद्द गांधीजींची प्रतिक्रिया कशी होती? मार्च १९३० मध्ये (म्हणजे साठ वर्षांपूर्वी) व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांना लिहिलेल्या पत्रात गांधीजी म्हणतात, "अगदी तुम्हाला मिळणाऱ्या पगाराचीच गोष्ट घ्या. तुम्हाला २१००० रुपायांहून अधिक पगार मिळतो. शिवाय इतर अनेक प्रकारांनी त्यात भर पडते. भारतीय माणसाचे सरासरी दर दिवशीचे दरडोई उत्पन्न केवळ दोन आणे आहे तर तुम्हाला दर दिवशी ७०० रुपयांहून जास्त पगार मिळतो. याचाच अर्थ तुम्हाला भारतीय माणसाच्या सरासरी उत्पन्नापेक्षा ५००० पटींनी जास्त आहे...

"या वस्तुस्थितीचा तुम्ही गंभीरपणे विचार करावात अशी माझी तुम्हाला नम्र विनंती आहे. ज्या व्यवस्थेत इतकी मोठी विषमता चालू शकते ती व्यवस्था मुळातच बाद केली पाहिजे."

शासनावर दोषाचे खापर फोडण्याकडे आपल्या देशात लोकांचा चटकन कल होतो. आपल्यापैकी पुष्कळजणां-कडून हा प्रमाद घडतो. काय चुकले यावर आपण प्रकाशझोत टाकतो खरे, पण दुसऱ्या कोणामुळे तरी ही चूक घडली असेही आपण सुचवतो. परिस्थिती सुधारण्याच्या आड येणारी ही फार मोठी धोंड आहे. भारतीय समाज एकात्म बनवायचा असेल तर अर्थपूर्ण परिवर्तन घडून यायला हवे, आणि असे परिवर्तन प्रत्येकाने दुसऱ्यावर दोषारोप करण्यामधून सुरू होऊ शकणार नाही.

गरज आत्मपरिक्षणाची आहे. आज विषमता अधिक खोल व रुंद झालेली आहे. तसेच शिक्षण, आरोग्यसेवा, उत्पन्न मालमत्ता व प्रभुत्व या सर्व बाबींच्या संबंधात वरिष्ठ थरांमधील मंडळींच्या हातात असलेल्या रचनेमध्ये फार वाढ-विस्तार झालेला आहे. सत्तावान वर्गाचे मतपरिवर्तन करण्यासाठी आपण सदैव प्रयत्नशील राहिले पाहिजे यात शंका नाही. समाजातल्या वरिष्ठ थरांतील जास्तीतजास्त जाणत्या लोकांनी आजची विषमतेची व दारिद्र्याची परिस्थिती लक्षात घेऊन साधी, संयमित जीवनशैली अंगीकारली तर सत्तावान मंडळींची

समाजावरची पकड सैल पडण्यात मदत होईल असे मला वाटते. आणि 'उच्च' जीवनमानाच्या मागे न लागल्यास सामाजिक पुनर्रचनेच्या कामासाठी आपणास काही वेळ देता येईल व आपली बुद्धी व कौशल्ये यांचाही त्या कामी उपयोग करता येईल. गांधीजींच्या कल्पनेतील लोकसेवक साकारला नाही; तो साकारला असता तर त्यामुळे या दिशेने अनेकानेक लोक प्रेरित झाले असते.

ही केवळ भाबडी आशा आहे असे मात्र नाही. आकाश काळ्या रुपेरी ढगांनी झाकलेले आहे असे वाटत असले तरी रुपेरी कडा स्पष्ट करणारे आश्वासन आहे.

पृथ्वीवरील जीवसृष्टी चिरंतन टिकून राहावी यासाठी आपला सदसद्विवेक जागृत करण्यासाठी आणि आपल्या ठायी जबाबदारीची जाणीव निर्माण करण्यासाठी झटणाऱ्या तरुणतरुणींना प्रथम मानवंदना दिली पाहिजे. पृथ्वीवरील साधनस्रोत निरंतर उत्पादनक्षम राहावेत या दृष्टीने त्यांची जपणूक व संगोपन करण्याचे महत्त्व ते आपणास पटवून देत आहेत. दोन घास पोटाला मिळवण्यासाठी या पायाभूत साधनस्रोतावर गोरगरीब माणसे अवलंबून आहेत ही गोष्ट या मंडळींनी आपल्या नजरेस आणून दिली आहे. प्रामुख्याने महाकाय धरणे व औद्योगिक प्रकल्पांच्या नावे गेल्या चाळीस वर्षांमध्ये जंगल व जमीन यांचा जो अविवेकी नाश व ऱ्हास घडून आला त्यामुळे पुरांची व दुष्काळांची तीव्रता व प्रमाण या दोन्हींमध्ये वाढ झाली आणि याचा फटका इतरांपेक्षा गरीब जनतेलाच जास्त बसला या गोष्टी त्यांनी शास्त्यांना मान्य करायला लावल्या आहेत. या प्रकल्पांमुळे जेवढे लोक बेदखल झाले, व्यवसाय बुडाल्याने बेरोजगार झाले, गरीब व बेवारशी झाले त्यांची संख्या दारिद्र्यनिवारणाच्या लोककल्याणकारी योजनांचा लाभ मिळणाऱ्या लोकांपेक्षा अनेक पटींनी जास्त आहे.

आपल्यानंतर येणाऱ्या पिढ्यानी मागे वळून आपल्या युगाचा उद्धार 'क्रूरकर्म्यांचे युग' असा करू नये, त्यांच्याहीसाठी पर्याप्त प्रमाणात जीवनपोषण करणारे साधनस्रोत शिल्लक राहावेत एवढ्याच उद्देशाने पर्यावरणीय संरक्षणसंवर्धनाच्या चळवळीतली मंडळी काम करीत आहेत असे नाही. वर्तमानकालीन गरीब अधिक गरीब होऊ नयेत, त्यांचे जीवनमान उंचवावे म्हणूनही त्यांचा खटाटोप आहे.

पर्यावरणाच्या विषयात कार्य करणाऱ्या संघटनांच्या कार्यपद्धतीचे वैशिष्ट्यही ध्यानात घेण्याची व त्यांच्या कार्यपद्धती विषयी त्यांचा गौरव करण्याची गरज आहे. गांधीजी म्हणत असत त्या अर्थाने ते अगदी मुळाशी जात आहेत. लोकांमध्ये जाऊन ते लोकांचे शिक्षण व प्रबोधन करीत असून, लोकांच्या पाठिंब्यानिशी, सक्रिय सहभागाच्या आधारे ते शासनाकडे दादफिर्याद मागत आहेत. म्हणूनच शास्त्यांना त्यांचे म्हणणे ऐकून घेणे भाग पडत आहे. चिपको, नर्मदा बचाव, टिहरी धरण, कैगा अणुप्रकल्प आंदोलनांच्या नेत्यांविषयी राज्यकर्त्यांनी प्रसंगी नको ते अपशब्द उच्चारले असले तरी त्याने परिस्थितीत काही फरक पडलेला नाही. कारण शिवीगाळ युक्तिवादाचे प्रत्युत्तर करू शकत नाही.

कैगा प्रकल्पासंबंधी जाहीररित्या विरोधकांसोबत चर्चा करण्यास कर्नाटकच्या शासनाने (त्या वेळी जनता दलाचे शासन कर्नाटकात होते. - सं.) संमती दिली. हे विधायक प्रतिसादाचे अगदी ताजे उदाहरण आहे.

अणुऊर्जेपासून कोणते लाभ होणार आहेत आणि अणुऊर्जा उत्पादनांपासून संभवणारे धोके कोणते यांची अगदी स्पष्ट कल्पना कैगा प्रकल्पावरील चर्चेने आली. पण या चर्चेचे आणखी एक मोठे योगदान आहे. विकासविषयक नीतीच्या विषयामध्ये या चर्चेने अनपेक्षितपणे मोठे योगदान दिले. दारिद्र्यनिर्मूलनासाठी अणुऊर्जानिर्मिती नितांत आवश्यक आहे असा युक्तिवाद काहींनी केला. उद्योगीकरणात आणखी पुष्कळ वाढ केल्याशिवाय दारिद्र्य दूर करता येणार नाही, आणि विजेच्या मुबलक पुरवठ्याखेरीज उद्योगधंद्यांमध्ये वाढविस्तार घडवून आणता येणार नाही असा युक्तिवादाचा पूर्ण आशय होता. तत्वतः हा युक्तिवाद तसा बिनतोड म्हणावा लागेल. पण तो अति सोपा करून मांडलेला होता ही त्याची त्रुटी होती.

उद्योगीकरण आपण प्रथमच हाती घेत आहोत अशातला भाग नाही. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेपासून आपण मोठ्या प्रमाणावर उद्योगीकरणास प्रारंभ केला. मुख्यतः विजेच्या स्वरूपात ऊर्जाउत्पादनावरही आपण काही कमी भांडवली गुंतवणूक केलेली नाही. या दोन क्षेत्रांमध्ये तेव्हापासून आजपावेतो जी प्रचंड गुंतवणूक केलेली आहे आणि या गुंतवणुकीपासून जी फलिते प्राप्त झालेली आहेत त्यांच्या आकडेवारीत मी येथे शिरत नाही. सरकारी प्रकाशनामध्ये ती सारी उपलब्ध आहे. पण आजवर उत्पादित केलेल्या विजेमुळे आणि तिच्या



अनुक्रमणिका

जोरावर चालविल्या जाणाऱ्या उद्योगधंद्यांमुळे बेकारी व दारिद्र्य यांचे निवारण नावालाच झाले ही गोष्टही शासन कबूल करीत आहे. दारिद्र्य व बेकारी यांच्या निवारणार्थ राबविल्या जाणाऱ्या आय.आर.डी.पी., एन.आर.इ.पी. व अशाच इतर योजना आपत्कालीन तातडीच्या व तात्कालिक म्हणून शासनाने हाती घेतल्या आहेत ही गोष्ट वरील अर्थाने कबुली दिल्याचाच पुरावा आहे. बेकारी व दारिद्र्य यांची समस्या आज सर्वव्यापी व अक्राळविक्राळ बनली आहे. याचाच अर्थ असा की, वीजउत्पादन व उद्योगीकरण या दोन क्षेत्रांमध्ये ज्या प्रमाणात व जेवढी एकंदर गुंतवणूक केली आहे ती गुंतवणूक आणि बेकारी व दारिद्र्य यांचे निवारण यांचा फारच थोडा संबंध आहे.

विजेचे उत्पादन वाढविले की बेकारी व दारिद्र्य दूर करणारे उद्योगधंदे तेवढ्या प्रमाणात वाढणार असे गृहीत धरणे चुकीचे आहे. लाखो खेड्यांमध्ये हातमाग विणकर शेकडो वर्षे कापडांचे उत्पादन करीत आले आहेत. ऊर्जेच्या व्यापारी आधुनिक स्रोतांसाठी त्यांच्याकडून फारशी मागणी आलेली नाही, आणि तरीही तेवढ्याच प्रमाणात मोजमाप केले तर यंत्राधिष्ठित उद्योगांद्वारे मिळतो त्या रोजगाराच्या तुलनेने कितीतरी पटींनी अधिक लोकांना हातमाग-व्यवसाय रोजगार पुरवीत आला आहे. पण सरकारी धोरणाने निवड कोणती केली? तर भांडवलसघन व वीजसघन पद्धतींचा अवलंब करून कापडाचे उत्पादन करण्यास प्रोत्साहन व पाठिंबा दिला. या निवडीचाच पुढचा भाग असा की पेट्रो-केमिकल उद्योगात नव्याने आणखी मोठी गुंतवणूक केली गेलीय, यातला काही पैसा परदेशातून कच्चा माल आयात करण्यावर खर्च होतो हे तर झालेच, पण या प्रचंड गुंतवणुकीतून फार मोठ्या संख्येने रोजगार निर्माण होईल अशी काहीही शक्यता नाही. कारण कृत्रिम रासायनिक धाग्यांच्या उत्पादनाचा हा सर्व उद्योग 'उच्च-तंत्रा'धिष्ठित आहे. रासायनिक कृत्रिम धाग्यांपासून कापड उत्पादन करण्याचे धोरण अंगीकारल्याने केवळ लाखो हातांनी कातले जाणारे सूत व कापड निकालात काढले गेले आहे असे नाही तर लाखो कापूस उत्पादकांच्या उपजीविकेवरही गदा आलेली आहे. भारताचे उद्योगीकरण तर यात कोठेच आढळत नाही. हा केवळ उद्योगधंद्यांचा ऱ्हास नाही तर खऱ्या अर्थाने प्रचंड प्रमाणावरील मोडतोड आहे.

आण्विक, औष्णिक वा जल, कोणत्याही पद्धतीने केंद्रीभूत स्वरूपात विजेची निर्मिती व तिचे वाटप हे कर्नाटक राज्यात राबविण्यात येणाऱ्या विकेंद्रित उद्योगीकरणाच्या आराखड्याशी सुसंवादी नाही, शासनाची कितीही प्रामाणिक इच्छा असो, दारिद्र्याचे निर्मूलन करण्याच्या किंवा ग्रामीण भागांचा विकास करण्याच्या बाबतीत कोणतेही शासन काय व कितपत परिणामकारक उपाय करू शकते याला मर्यादा असते याचे स्पष्ट भान कर्नाटक शासनाला झाले आहे. विकेंद्रित पद्धतीने विकास घडवून आणण्याच्या नमुन्याचा अंगीकार यापोटी कर्नाटक शासनाने केला आहे. विकासाचे नियोजन करण्याची आणि स्वतःच बनविलेल्या योजनांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी २६०० मंडल समित्यांवर सोपवली गेली आहे. ५६००० लोकनियुक्त प्रतिनिधींच्या खांद्यावर जबाबदारी टाकण्यात आली आहे. या लोकप्रतिनिधींमध्ये १२००० स्त्रियांचा समावेश आहे.

विकासाचे नियोजन करण्याचे काम या हजारो लोकप्रतिनिधींना चांगल्या प्रकारे करता यावे म्हणून शासनाने त्यांना प्रतिष्ठा व अधिकार बहाल केले आहेत. आवश्यक त्या प्रमाणात त्यासाठी पैसा उपलब्ध करून दिला आहे. त्यांच्यावर कार्याची जबाबदारी सोपविताना पुरेसा कर्मचारी वर्गही उपलब्ध करून दिला आहे. त्यांच्या त्यांच्या स्थानिक समस्यांना सामोरे जाण्यास या मंडल व जिल्हा समित्यांनी आरंभ केला आहे. उत्पादन व रोजगार या दोन्हींमध्ये वाढ कशी होईल आणि प्राथमिक किमान गरजांच्या पूर्ततेमधून अधिक सुखसमाधान कसे प्राप्त होईल या दिशेने पावले टाकावयास या समित्यांनी सुरुवात केली आहे. स्थानिक पातळीवर उपलब्ध साधनस्रोत कामी आणण्याची, नवनव्या योजना बनविण्याची कल्पकता त्या प्रकट करीत आहेत. त्यांनी हाती घेतलेल्या योजनांसाठी देखील काही प्रमाणात विजेची गरज त्यांना भासणार आहेच. पण या विकेंद्रित स्वरूपात काम करणाऱ्या समित्यांची कमीअधिक मागणी पुरविण्याच्या दृष्टीने वीजनिर्मिती व वितरण यांची केंद्रीभूत व्यवस्था पुरेशी लवचिक आणि तत्परच नव्हे तर कार्यकारी होऊ शकेल का याची तपासणी करणे आवश्यक आहे. कारण जर केंद्रीभूत व्यवस्था विजेचा पुरवठा तत्परतेने, खात्रीलायक स्वरूपात व हवा तेवढा करू शकली नाही तर विकेंद्रीकरणाचा प्रयोग हाती घेतेवेळी बाळगलेली स्वप्ने धुळीला मिळतील, असे झाले तर त्याचे खापर विकेंद्रीकरणाच्या प्रयोगावर फोडले जाईल.





उत्पादनासाठी व इतर कामे पार पाडण्यासाठी ऊर्जेची जेवढी गरज आहे त्यापैकी काही भाग हा विकेंद्रित स्वरूपात ऊर्जानिर्मिती करण्याच्या पर्यायांद्वारा भागविता येईल. या संदर्भात व्यवहार्य पर्याय पुढे ठेवले गेले आहेत. हे पर्याय पर्यावरणाचा समतोल राखणारे वा संवर्धन करणारे आहेत ही गोष्ट विशेष ध्यानात घेण्याजोगी आहे. नित्य पुनर्निर्मितीक्षम (renewable) व विकेंद्रित ऊर्जा-उत्पादन पद्धतींचा गंभीरपणे विचार करण्याला आज मोठा विरोध आढळतो. मनामध्ये खोलवर रुजलेले पूर्वग्रह व ठाम मते यांमधून हा विरोध उभा राहतो असे दिसते. चाकोरीत दीर्घकाळ रुळलेली चूक ही नव्या सत्याच्या आकलनाच्या व स्वीकाराच्या आड येणारी मोठी, धोक्याची धोंड ठरते ही दुर्दैवाची गोष्ट आहे.

यात अपराध एखाद्या विवक्षित सरकारचा वा मंत्र्याचा वा प्रशासकाचा वा वीजअभियंत्याचा वा आण्विक वीज निर्माण करणाऱ्या यंत्रणेचा आहे असे म्हणणे बरोबर होणार नाही. एके काळी दैदिप्यमान भासणाऱ्या कल्पनांचा प्रभाव आजही समाजमानसावर आहे, आणि अपराधाचे मूळ या कल्पनांमध्ये आहे. आज जगभर या कल्पना कालबाह्य ठरल्या आहेत हे ओळखण्याची गरज आहे.

विकासाची संकल्पना व विकासाचे साधन-मार्ग या मुद्द्यावरून गांधींची व पं. नेहरू यांची मते दोन विरुद्ध टोकाची होती. "स्वतःच्या गरजेपुरते अन्नधान्य व कापड यांचे उत्पादन करणे हे प्रत्येक खेडेगावाचे प्रथम कर्तव्य होय" अशी गांधीजींची मांडणी होती. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे अन्य औद्योगिक यंत्रणा ही अशी उभी करावयाची होती की ज्यामुळे खेडेगावांच्या स्वावलंबी अर्थव्यवस्थेला भक्कमपणा येईल. ते म्हणतात, "ग्रामोद्योगांच्या जोडीला जहाज बांधणी, पोलाद निर्मिती, यंत्रांचे उत्पादन, वीज उत्पादन आणि तत्सम उद्योगधंदे यांचे अस्तित्त्वच मी गृहीत धरले आहे. आजवर खेडेगाव व ग्रामोद्योग यांचा विनाश घडून यावा या पद्धतीने उद्योगीकरण केले गेले आहे. भविष्यात खेडूत आणि त्याचे कारागिरी उद्योग यांच्या संरक्षण-संवर्धनासाठी उद्योगीकरणाची बांधणी उद्याच्या काळात शासन करील."

याउलट पाश्चिमात्त्य देशांच्या उदाहरणावर पं. नेहरूंची सारी भिस्त होती. भारताच्या नियोजन मंडळाचे पहिले अध्यक्ष म्हणून बोलत असताना ते असे म्हणाले की, 'किती पोलादाचे देश उत्पादन करतो, किती वीज निर्माण करतो आणि या दोन गोष्टींची खपत देशात किती आहे यावरून देशाचे खरे सामर्थ्य किती ते ठरते."

१९७० नंतर खनिज तेलाच्या किमती एकदम वाढल्या व त्यामधून पृथ्वीवरील साधनस्त्रोतांच्या उपलब्धतेच्या मर्यादांविषयी, साधनस्त्रोतांच्या प्रचलित वापरामुळे बिघडत असलेल्या समतोलाविषयी चिकित्सक विचारविमर्शाला चालना मिळाली. तसेच देशात एकंदर उत्पादन वाढले, समृद्धी उत्पन्न झाली की ती 'झिरपून' काही प्रमाणात तरी सर्वसामान्य लोकांपर्यंत पोचेल आणि विषमता कमी होईल अशी आपल्या नियोजनकारांची व पं. नेहरूंची पण मान्यता होती. समृद्धी झिरपण्याचे प्रमाण किती अल्प असते आणि ही प्रक्रिया किती मंद असते याचा अनुभवही आज आपणास पुरेसा आलेला आहे. जागतिक पातळीवर देखील 'पहिले जग' व 'तिसरे जग' यांच्यातील दरी विकासाची चार दशके ओलांडून झाल्यावरही कमी होण्याऐवजी अधिक रुंदावली आहे. हा सारा अनुभव घेतल्यावर सर्व जगभर विचारमंथन सुरू झाले आणि विकासाची संकल्पना व विकासाचे साधन-मार्ग यांबद्दलच्या भूमिका आता सुधारून घेतल्या जात आहेत. स्वतःच्या विचारांमध्ये अशी सुधारणा करण्याची संधी पं. नेहरूंना दुर्दैवाने मिळाली नाही. त्यांचे निधन १९६४ साली झाले. आज 'विकसित औद्योगिक' देशांमध्ये दर एकक उत्पादनासाठी कमीतकमी विजेचा, कच्च्या साधनसामुग्रीचा आणि मालवाहतुकीच्या यंत्रणेचा वापर करणारी उत्पादनतंत्रे व प्रक्रिया यांचा वाढत्या प्रमाणावर अवलंब करण्यावर जोर दिला जात आहे. हा बदल केल्यावरही राष्ट्रीय ठोकळ उत्पादनात सतत वाढ होते असे या देशांमध्ये दिसून आले आहे.

भारतात मात्र उच्च विद्याविभुषितांचा वर्ग या बाबतीत योग्य तो बोध आत्मसात करण्याच्या बाबतीत फार मागे पडलेला आहे. त्याला स्वतःलाच पुरती जाग आलेली नाही. वीज व पोलाद यांचे भरपूर उत्पादन केले की तेवढ्यानेच दारिद्र्य निर्मूलन साध्य होईल असे नाही याची समज विकास-विषयक धोरणे निश्चित करणाऱ्या श्रेष्ठी मंडळींच्या ठायी उत्पन्न करण्याच्या बाबतीत तर आमचे विद्वान आणखीनच सुस्त आहेत. आपल्या देशातील उद्योजक ज्या प्रकारचे उद्योगीकरण घडवून आणण्यास लायक व समर्थ आहेत त्या प्रकारच्या उद्योगीकरणाचे मोल कमी नाही. पण दारिद्र्य-निर्मूलनामध्ये त्या प्रकारचे उद्योगीकरण फारसा हातभार लावू



अनुक्रमणिका

शकत नाहीत. पण याच प्रकारात मोडणाऱ्या उद्योगधंद्यांची वीजेसाठीची भूक प्रचंड आहे; वीज हवी, आणखी वीज हवी असा त्यांचा धोशा चाललेला असतो. जितकी वीज मोठ्या केंद्रामध्ये, मोठ्या प्रमाणावर उत्पन्न केली जाईल तितके यांना हवे असते. कारण मग ती त्यांना ठोक पद्धतीने स्वस्त दराने पदरात पाडून घेता येते.

पण ही उत्पादन व्यवस्था तीमधून उत्पादित होणाऱ्या वस्तू विकून नफा कमावणाऱ्यांवर अवलंबून आहे. पुरेसा नफा मिळणार नसेल तर उद्योजक स्वतःचा पैसा गुंतवण्यास राजी असणार नाहीत. या बाबतीत काय लक्षात येते? प्रचलित आधुनिक उद्योगधंदे ज्या वस्तूंचे उत्पादन करीत आहेत त्या गोरगरींबांची जीवनसरणी व त्यांच्या गरजा यांच्याशी मेळ न साधणाऱ्या आहेत. ८० कोटी भारतीय जनतेपैकी फक्त १० कोटी लोकांमधून जी 'मागणी' पुढे येते तिची पूर्तता करण्यासाठी आजची आधुनिक उद्योगव्यवस्था राबत असते. ह्या व्यवस्थेच्या समर्थकांचे म्हणणे काय आहे? ते म्हणतात की, ब्रिटन व फ्रान्स या दोन देशांच्या बाजारपेठा एकत्रित केल्या तरी त्यांच्यापेक्षाही १० कोटींची बाजारपेठ मोठी आहे. भारतीयांच्या गरजांच्या पूर्ततेचा विचार करण्याविषयी बेपर्वा राहून कार्य करणारी ही उत्पादन व्यवस्था आहे ही गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. भारतामध्ये एकात्म समाजाची निर्मिती करण्याचे ज्याचे ध्येय असेल तो औद्योगिक उत्पादनाच्या आजच्या व्यवस्थेने समाधान कसा काय पावू शकेल?

म्हणून विकासाविषयीच्या प्रचलित धारणेविरुद्ध आक्षेप उपस्थित करून चर्चा घडवून आणणारे आणि विकासाची नव्याने व्याख्या करण्याचे कार्य पार पाडणारे गट आकारास येण्याची गरज आहे. पर्यावरणाच्या संरक्षण संवर्धनासाठी धडपडणाऱ्या गटांना जेवढा विरोध होतो त्यापेक्षा जास्त तीव्र विरोधास प्रचलित विकासनीतीला आव्हान देणाऱ्या गटांना तोंड द्यावे लागेल.

कर्नाटकात आज बारा हजार स्त्रिया मंडल पंचायत समित्यांच्या सभासद आहेत या गोष्टीचा मी वर उल्लेख केला. येथे मला आशेला जागा दिसते. त्यांच्यापैकी थोड्याच स्त्री-सभासदांना मी आजवर भेटू शकलो आहे. पण तेवढ्यानेही माझ्या आशा पल्लवीत झाल्या आहेत. त्यांच्या दैनंदिन जीवनात सुधारणा घडवून न आणणाऱ्या दरिद्री कल्पना, योजना आणि भूतकालीन चुका या त्या सहन करण्यास राजी होणार नाहीत. समाजपरिवर्तनाची जबाबदारी भारतीय समाज पेलेल आणि अर्थपूर्ण एकात्मता साध्य करील असा भरवसा मला या स्त्रियांना भेटल्यावर वाटतो.

गांधीजींच्या तत्त्वांवर व कार्यक्रमांवर निष्ठा असणाऱ्या सर्वांनी समाजपरिवर्तनासाठी बद्धपरिकर झालेल्या या भगिनींचे हात मजबूत करण्यासाठी तत्परतेने पुढे आले पाहिजे. स्त्रियांच्या पुढाकाराने व शक्तीने घडून येणाऱ्या समाजपरिवर्तनाचे दृश्य पाहायला मिळाले असते तर गांधीजींना सर्वाधिक आनंद झाला असता.



स्वराज्य की इमारत की नीव 'ग्राम-स्वराज्य' ही है। यह विचार इस देश में गांधी ने ही रखा, ऐसी बात नहीं है। अंग्रेजोंके चले जाने के ४० साल पहले सन १९०७ में योगी अरविन्द ने भी बंगाल में प्रथम स्वदेशी-आंदोलन के दिनों में यही बात कही थी। उन्होंने अपने प्रवचन में कहा था, 'जब तक गाँव के लोगों का जीवनक्रम और रहन-सहन एकता एवं राष्ट्रीयत्व की बुनियाद पर संगठित नही होगा, तब तक शिक्षित-अशिक्षित, प्रतिष्ठित-अनाडी का भेद मिटेगा नहीं। इस भेद को कम कर एकता की भावना पैदा कर उसका विकास करना संभव हो, तो वह गाँव में ही सम्भव है। क्योंकि गाँवो में ही इन वर्गो का परस्पर निकट सम्पर्क आता है। इसलिए बहुजन समाज को स्वराज्य का प्रत्यक्ष परिचय करा देने के कार्य का आरम्भ गाँव से ही होना चाहिये। प्रथम ग्राम-समितियों के द्वारा गाँवो को स्वराज्य का भान कराना होगा, फिर धीरे-धीरे जिला, प्रान्त, देश या राष्ट्र तक यह भावना फैलेगी। गाँव के लोग भी राष्ट्रीय स्वराज्य को एकदम समझ नहीं सकेंगे। ग्राम-समितियों के द्वारा प्रत्यक्ष स्वराज्य का अनुभव जब वे ले सकेंगे, तब उसकी उपयुक्तता और आवश्कता उन्हें मान्य होगी। बहुजन समाज को रातनैतिक शिक्षा देने का एक ही मार्ग है, ग्राम-समितियों की स्थापना कर कार्यान्वित करना। दूसरे किसी मार्ग से यह संभव नहीं होगा।' लोकमान्य तिलक से जब पूछा गया था कि स्वराज्य के बाद क्या होगा, तो उन्होंने भी कहा था कि स्वराज्य के बाद ग्राम-स्वराज्य होगा। वस्तुतः जब लोकतंत्र का लोक मुख्य तत्त्व है और तंत्र लोक के हाथ का औजार है, वह गौण है और उसका कोई अपना स्वतंत्र अस्तित्व ही नहीं है, तब लोकतंत्र की जो भी इमारत बनेगी, इसकी प्रारम्भिक मंजिल ग्राम-स्वराज्य ही होगी क्योंकि इस देश का लोक मुख्यतः गाँव में ही रहता है।

- धीरेन्द्र मजूमदार

अनुक्रमणिका

# उद्योगीकरण, पर्यावरण आणि अस्तित्व

कमला चौधरी (अनुवाद : डॉ वीणा मुळे)

### गांधी-नेहरू : दृष्टीतील अंतर

स्वातंत्र्य मिळण्याच्या सुमारास गांधींनी स्वतंत्र भारताच्या भावी विकासाच्या दिशा आणि अग्रक्रम यांबाबत विचारविनिमय करण्यास सुरुवात केली. ऑक्टोबर १९४५ मध्ये त्यांनी नेहरूंना लिहिले, 'मला आपल्या दृष्टिकोणांतील वेगळेपणाबद्दल लिहायचे आहे. आपण परस्परांनीं आपापल्या भूमिका नीट समजून घेतल्या पाहिजेत. आता माझे वय झाले आहे. तुम्ही माझे वारस आहात. तरीदेखील मी माझ्या वारसाला आणि त्याने मला समजून घ्यायलाच हवे. तरच मला समाधान लाभेल.' गांधींना वाटले, मतभेद मूलभूत असतील तर ते जनतेला कळायला हवेत, नाहीतर स्वतंत्र भारताला पुढे अपायकारक ठरतील. उलट, नेहरूंचा असा ठाम विश्वास होता की, अशा प्रकारची चर्चा लोकांचा मानसिक गोंधळ अधिक वाढवेल आणि त्याचा परिणाम सद्कालीन निष्क्रियतेत होईल. त्यांनी म्हटले, 'काँग्रेससारख्या पक्षांनी अशा बाबींवर वादविवाद करून बरबाद होऊ नये असे मला वाटते.'

परंतु असे वाटत असूनही नेहरूंनी आपली भूमिका गांधींजवळ स्पष्ट केली : 'पुरेसे अन्न-वस्त्र-निवारा, शिक्षण, आरोग्यरक्षण इत्यादी बाबी देशाला आणि प्रत्येकाला किमान मिळायलाच हव्यात ही उद्दिष्टे नजरेसमोर ठेवून ती वेगाने कशी गाठता येतील हे आपण शोधले पाहिजे.' 'वेगाने' म्हणजे आधुनिकीकरण, जड उद्योगांचा विकास, मोठी धरणे, विज्ञान आणि तंत्रविज्ञानावर आधारलेल्या पायाभूत व्यवस्थेची उभारणी. या सगळ्या गोष्टी करण्यावाचून, नेहरूंच्या मते दुसरा पर्यायच नव्हता.

उलट, भारताला जर खरे स्वातंत्र्य मिळवायचे असेल तर लोकांना शहरांऐवजी खेड्यांत आणि महालांऐवजी झोंपड्यांत राहावे लागणार आहे, ही गोष्ट आपण ओळखायला हवी, असे गांधींचे म्हणणे होते. म्हणूनच त्यांनी ग्रामविकास आणि ग्रामोद्योग यांना अग्रक्रम दिला होता. नेहरू मात्र विकासप्रक्रिया गाव आणि ग्रामविकास यांच्यापासून सुरू करायला नाखूष होते. त्यांचे म्हणणे होते की, 'खेडे, सर्वसाधारणपणे, बौद्धिक आणि सांस्कृतिकदृष्ट्या मागासलेले असते. मागासलेल्या वातावरणातून कोणताही विकास शक्य नाही.' गांधींची ग्रामीण लोकांकडे बघण्याची दृष्टी अगदी निराळी होती. त्यांच्या दृष्टीने ते धरतीचे मीठ, लोकशाहीचा आधारस्तंभ होते. भारतीय शेतकऱ्याचे वर्णन करताना त्यांनी म्हटले आहे, 'या ओबडधोबड आवरणाखाली एक प्राचीन संस्कृती, आध्यात्मिकतेचा प्रचंड साठा दडलेला आहे. पश्चिमेकडे असे काही सापडणार नाही. ह्याचे सततचे दारिद्र्य व निरक्षरता बाजूला होऊ द्या. सुसंस्कृत, सुधारलेला, स्वतंत्र नागरिक कसा असावा याचा उत्तम नमुना तुम्हाला मिळेल.'

हे उघडच होते की, ग्रामविकासाला अग्रक्रम देण्याबाबत गांधी आणि नेहरू यांच्यात प्रचंड बौद्धिक आणि दृष्टिकोणात्मक अंतर होते. नेहरूंनी आपल्या आत्मचरित्रात लिहिले : 'खादी ग्रामोद्योग यांच्यामुळे भारताच्या दारिद्र्याचे दीर्घ मुदतीचे प्रश्न सुटतील अशी अपेक्षा करणे म्हणजे स्वप्नरंजन नव्हे का? गांधींचा चरख्यावरील भर अतिरेकी आणि उद्योगप्रधान जगातील अपयशाची पूर्वसूचनाच नाही का?' आणखी एका प्रसंगी त्यांनी म्हटले : 'संक्रमणाची गंगा आपल्याला थांबविता येणार नाही किंवा तिच्या प्रवाहाबाहेरही राहता येणार नाही. सुधारणेची मधूर फळे चाखल्यानंतर त्यांची चव विसरून, मानसिकदृष्ट्या पुन्हा आदिम अवस्थेत आपल्याला जाता येणार नाही.' नेहरूंचा असा ठाम विश्वास होता की जोपर्यंत भारत आधुनिक, आणि तंत्रदृष्ट्या विकसित होत नाही तोपर्यंत, तो खऱ्या अर्थाने स्वतंत्र होणे शक्य नाही.

### गांधी-नेहरू : विलक्षण संबंध

याच केवळ नव्हे, इतर बाबतींतही नेहरू आणि गांधी यांच्यात मतभेद होते; परंतु परस्परांवरील जिव्हाळ्यामुळे त्यांची जवळीक टिकून राहिली. बी.आर. नंदा यांनी तिचे वर्णन असे केले आहे : 'राष्ट्रीयत्वाच्या इतिहासातील ती एक दीर्घ, विलक्षण बुचकळ्यात टाकणारी, आणि फलदायी भागीदारी होती. ज्यांनी गंभीरपणे त्या दोघांच्या जीवनाचा आणि

अनुक्रमणिका

इतिहासातील त्या कालखंडाचा अभ्यास केला आहे त्या सर्वांना हे कोडे आहे की वयातील वीस वर्षांच्या अंतरानेच केवळ नव्हे तर, बुद्धी आणि स्वभावानेही अगदी वेगळी असणारी ही दोन माणसे इतका दीर्घकाळ एकत्र काम कसे करू शकली?' नेहरू विज्ञानाचे आणि मानवतावादाचे पुरस्कर्ते होते. प्रार्थना, उपवास, आतला आवाज आणि चरखा यांना महत्त्व देणाऱ्या एका संताचे त्यांना आकर्षण वाटावे ही गोष्ट नंदांना गोंधळात टाकते.

शिक्षण, स्वभाव आणि समस्यांकडे बघण्याची दृष्टी या बाबतीत वेगळे असूनही गांधींचा नेहरूंवर विलक्षण प्रभाव होता. नेहरूंनी म्हटले आहे, 'मोठ्यांतल्या मोठ्या भौतिक शक्तीसमोरही न नमणारे असे काहीतरी पोलादी, कातळासारखे त्या दुबळ्या शरीराच्या माणसात होते यात शंका नाही. त्याचे रूप सामान्य होते. शरीरावर पंचाशिवाय दुसरे वस्त्र नसे. तरीही त्यांच्यात असणाऱ्या राजसदृश वैशिष्ट्यांमुळे लोक खुषीने त्यांचे आज्ञापालन करीत. त्यांचा नितळ, स्वच्छ आवाज थेट काळजाला भिडे आणि लोक उत्स्फूर्तपणे त्यांना प्रतिसाद देत.' दुर्दैवाने जानेवारी १९४८ मध्ये गांधींची हत्या झाल्यामुळे विकासासंबंधीची चर्चा अपुरी राहिली आणि अनेक बाबी अनिर्णित राहिल्या. भारताचे पहिले पंतप्रधान झाल्यावर नेहरूंना गांधीच्या मार्गदर्शनाशिवाय, प्रभावाशिवाय आणि त्यांच्या नितळ, स्वच्छ, अंतःकरणाला भिडणाऱ्या आवाजाशिवाय या देशाचे भवितव्य ठरविण्यासाठी पुढे व्हावे लागले.

### नेहरूंचे विकास-तत्त्वज्ञान

१९४७-४८ मध्ये नेहरूंना मजबूत औद्योगिक (आणि लष्करी) राज्य की ग्रामीण आणि शेतीवर जेमतेम गुजारा करणाऱ्या समुदायांचा संघ, यांतून निवड करायची होती. नेहरूंनी तत्परतेने पहिल्याची निवड केली. हे खरे की, समुदाय-विकासाचे कार्यक्रम आणि खादी-ग्रामोद्योगाला साह्य ह्यांकडेही त्यांनी लक्ष पुरविले. तरीही त्यांचा कल आधुनिकीकरणाकडे आणि उद्योगीकरणाकडे आहे हे सुरुवातीपासूनच स्पष्ट झाले. ग्रामविकास, ग्रामोद्योग, आर्थिक-राजकीय विकेंद्रीकरण, स्थानिक साधनांबाबत स्थानिक लोकांना सत्ता इत्यादी गांधींच्या कल्पना बाजूला सारल्या गेल्या. नेहरूंना आशा होती की आधुनिकीकरण व उद्योगीकरण यांमुळे होणारा आर्थिक विकास खेड्यापर्यंत झिरपत जाईल व खेडी दारिद्र्य-बेकारीच्या कचाट्यातून सुटतील.

नंदा सुचवतात त्याप्रमाणे नेहरूंचे विकासाचे तत्त्वज्ञान फेबिअन साहित्य, मार्क्सवाद, आणि पाश्चात्त्य उदारमतवादी विचारसरणी यांतून तयार झाले होते. नफा कमावण्याच्या वृत्तीवर नियंत्रण, प्रमुख उद्योगधंदे सार्वजनिक मालकीचे, आणि शासकीय यंत्रणेचा आर्थिक हालचालींवर नियंत्रण ठेवण्यासाठी उपयोग अशा समाजवादावर नेहरूंचा विश्वास होता. त्यांच्या दृष्टीने गांधींचा समाजवाद म्हणजे 'अस्ताव्यस्त मानवतावाद' होता.

### गांधींचा दृष्टिकोण

उलट, गांधींवर जरी थोरो आणि टॉलस्टॉय यांचा प्रभाव होता तरी ते खऱ्या अर्थाने भारतीय आणि अध्यात्मवादी होते. भारताचा सनातन आत्मा त्यांना कळला होता, त्यांचे विकासाचे तत्त्वज्ञान, ग्रामीण गरीबांचे त्यांना झालेले आकलन व त्यांच्याबद्दलची आस्था यांवर आधारलेले होते. पाश्चात्यांच्या तंत्रविषयक यशांनी ते कधी भारावून गेले नाहीत. भारताने आपल्या विकासाचा मार्ग इकडची वस्तुस्थिती आणि संस्कृती लक्षात घेऊन आखावा, असे त्यांना वाटे. गांधींच्या नेतृत्वात नेता आणि नीत यांत एक परस्पराश्रयी संबंध होता. नीतांची प्रत्यक्ष स्थितीच नेत्याची मार्गदर्शक होती.

### समस्यांचे तीव्र स्वरूप

नेहरूंच्या नेतृत्वाखाली देशाने अनेक क्षेत्रांत नेत्रदीपक प्रगती केली : बऱ्याच विभागात मजबूत औद्योगिक पाया घातला गेला. आधुनिक पद्धतीची शेती व हुकमी पाणीपुरवठा यांमुळे स्वावलंबी होण्याइतकी अन्नधान्य-उत्पादनवाढ झाली. तसेच, अणुऊर्जा, अंतरीक्ष, इलेक्ट्रॉनिक्स, औद्योगिक आणि कृषीविषयक संशोधन यांसाठी आवश्यक अशा मूलभूत वैज्ञानिक आणि तांत्रिक यंत्रणेची उभारणीही झाली. एकूण, ऊर्जानिर्मिती, खाणकाम, मोठे उद्योग, रेल्वे इत्यादींवर लक्ष केंद्रीत करण्याच्या प्रमुख धोरणाला अनुसरुनच नेहरूंच्या विकासयोजना तयार झाल्या होत्या. परंतु ज्यांवर नेहरूंनी भर दिला होता त्या सगळ्या गोष्टी केवळ ऊर्जाकेंद्रीच नव्हे तर प्रदुषकही आहेत. त्यांच्यामुळे पर्यावरणासंबंधी व अस्तित्वासंबंधी गंभीर समस्या उत्पन्न होतात. ग्रामीण दारिद्र्य, निरक्षरता, बेकारी, विषमता आणि स्त्रियांचे काबाडकष्ट या बाबींकडे दुर्लक्ष झाले आहे हे अपयश आहेच. शिवाय, उत्पन्न व उपभोग यात वाढत चाललेल्या तफावतीमुळे सामाजिक-राजकीय उद्रेक, सर्वव्यापी भ्रष्टाचार आणि सामाजिक एकसंधतेचा नाश यांना चालना मिळाली

अनुक्रमणिका

आहे.

जंगलकटाई, खाणकामाच्या चुकीच्या पद्धती, साचलेले पाणी आणि मोठ्या उद्योगधंद्यांमुळे तयार झालेला विषारी कचरा यांमुळे जमिनीचा दर्जा घसरला आहे व त्याचा दुष्परिणाम ग्रामीण विभागाला भोगावा लागत आहे. तेथील गरिबी अधिकच वाढली आहे. ३२९ दशलक्ष हेक्टरपैकी सुमारे १७५ दशलक्ष हेक्टर जमीन, म्हणजे देशाचा निम्म्यापेक्षा अधिक भाग निकृष्ठ कसाचा आणि निरुपयोगी झालेला आहे. हिमालय, पश्चिम घाट, आणि शिवालिक येथील बऱ्याच भागांतील जंगले नष्ट झाली आहेत. परिणामी जमिनीची धूप होऊन तिचे वाळवंटात रूपांतर झाले आहे. उपग्रहप्रतिमेनुसार आपल्या देशातील जंगले दरवर्षी १.५ दशलक्ष हेक्टर याप्रमाणे नष्ट होत आहेत. ही गती कायम राहिली तर या शतकाअखेर जंगले मुळी शिल्लकच राहायची नाही. याखेरीज, शेतीखाली असलेली सीमांत जमीन, रस्तेबांधणीसाठी ठिसूळ पर्वतांत केलेले स्फोट, खाणकामाच्या चुकीच्या पद्धती, उद्योगीकरण आणि नागरीकरण यांमुळे पीकयोग्य जमिनीचा आणखी एक दशलक्ष भाग बहुधा दरवर्षी निरुपयोगी होत आहे. जमीन वापराच्या नियोजनाकडे दुर्लक्ष केल्याची किंमत देशाने मोजली आहे, अजून मोजतो आहे. कारण गरिबांच्या उपजीविकेचे साधन असलेली लागवडीखाली न आलेली जंगले, कुरणे यांखालची तसेच समुदायांची आणि महसुली जमीनही झपाट्याने निकस होऊन अनुत्पादित होत आहे. जमिनीवरचा बोजा मात्र वाढती लोकसंख्या आणि जमिनीची वाढती निकृष्ठता यांमुळे प्रचंड वाढला आहे. १९५१ मध्ये लागवडीयोग्य जमिनीचे दरडोई प्रमाण ०.४८ हेक्टर होते. ते १९८१ मध्ये ०.२६ हेक्टर इतके घटले. २००० पर्यंत ते दरडोई केवळ ०.११ हेक्टर इतकेच राहील असा अंदाज आहे.

जंगलतोड आणि जमिनीची वाढती धूप यांमुळे पूर आणि अवर्षण यांची संख्या, प्रमाण व तीव्रता वाढली आहे. यामुळे ग्रामीण भागाचे प्रचंड नुकसान होऊन तेथील लोकांचा त्रास वाढला आहे. सरपण, चारा आणि आता पिण्याचे पाणी यांची तीव्र टंचाई निर्माण झाली आहे. गरीब जनता एक दुष्ट भोवऱ्यात सापडली आहे. जगण्यासाठी त्यांना आपल्याजवळील साधनांचा प्रमाणाबाहेर उपयोग करावा लागत आहे. पर्यावरणाच्या दारिद्र्यामुळे त्यांचे दारिद्र्य वाढले आहे; जगणे कठीण व अनिश्चित झाले आहे. दारिद्र्यनिर्मूलनावर प्रत्येक पंचवार्षिक योजनेत भर असतो; तरीदेखील चाळीस वर्षांनंतरही लोकसंख्येचा जवळ जवळ अर्धा भाग दारिद्र्य-रेषेखालील आहे. निखळ संख्याच विचारात घेतली तर विकास-प्रवासाला प्रारंभ केला तेव्हा ती जितकी होती तितकीच ती आजही आहे.

मोठे उद्योग, मोठी धरणे, मोठ्या विज्ञानसंस्था हा विकासपर्याय निवडण्यामुळे अत्यंत केंद्रित नोकरशाही यंत्रणेचादेखील स्वीकार करावा लागला. गरिबी-हटाव कार्यक्रमा-साठीदेखील मग तिचाच उपयोग. त्याच्या परिणामाने मन उदास होते. गांधींच्या मनात 'नियोजित परोपकारी राज्याच्या गुदमरवणाऱ्या कळकळीबद्दल' नितांत भय होते. गांधींच्या मनात 'राज्य म्हणजे आत्मविहीन यंत्र. त्याचे अस्तित्वच हिंसेवर अवलंबून असते व त्यापासून त्याला कधीही तोडता येत नाही.' गेल्या चाळीस वर्षांत राज्याच्या स्वरूपाचा आणि हिंसेचा भरपूर पुरावा - विशेषत: गरीब आणि उपेक्षित लोकांच्या बाबतीत मिळालेला आहे.

### गांधी : उद्योगप्रधान सभ्यतेला नकार

दारिद्र्य, बेकारी व विषमता यांना गंभीरपणे हाताळायचे असेल तर ग्रामविकास, ग्रामोद्योग, ग्रामीण रोजगार, विकेंद्रीकरण व स्थानिक लोकांना सत्ता यांबद्दलच्या गांधींच्या आस्थेकडे व आग्रहाकडे अधिक लक्ष द्यायला हवे. औद्योगिक समाजाच्या तंत्रविषयक यशाने गांधी कधीही दिपून गेले नाहीत. त्यांचा वैश्विक दृष्टिकोणच मुळी वेगळा होता. ते म्हणत, 'माझी खात्री आहे की, भारताला आणि भारताद्वारे जगालासुद्धा, खरे स्वातंत्र्य मिळवायचे असेल तर लोकांना शहरांऐवजी खेड्यांत आणि महालांऐवजी झोपड्यांत राहावे लागणार आहे ही वस्तुस्थिती जाणून घ्यायलाच हवी.' विकासाची दिशा लक्षात घेऊन ते म्हणाले, 'सगळे जग चुकीच्या दिशेने जात असले तरी मी बावरून जाता कामा नये आणि ज्योतीभोवती बेभान होऊन उडणारा पतंग अखेर तिच्यावरच झेप घेऊन जळतो त्याप्रमाणे माझे होऊ नये.' त्यांनी पुढे म्हटले, 'भारताचे आणि भारताच्या माध्यमातून सगळ्या जगाचे या सर्वनाशातून रक्षण करणे, त्यासाठी प्रयत्न करणे हे अखेरच्या श्वासापर्यंत माझे कर्तव्य आहे.'

जग चुकीच्या दिशेने जाते आहे, उद्योगप्रधान जीवनपद्धती टिकावू नाही व ती लवकरात लवकर संपवली पाहिजे या गांधीजींच्या मताशी सगळीकडचे पर्यावरणतज्ज्ञ सहमत होताना दिसतात. उपभोक्ताप्रधान समाज सगळ्या






जगात सर्वव्यापी होऊ लागला आहे व त्याच्या कधी न संपणाऱ्या मागण्या पूर्ण करता करता पृथ्वीवरची जीवनपोषक व्यवस्था झपाट्याने संपुष्टात येत आहे, ही गोष्ट त्यांनी निदर्शनास आणली आहे. पृथ्वी राहण्याच्या दृष्टीने निरुपयोगी होत चालली आहे आणि कुटुंब व समुदाय-जीवन कोलमडून पडते आहे याचा भरभक्कम पुरावाही त्यांनी दिला आहे.

### जमिनीवरचा बलात्कार

त्यांनी या गोष्टीकडेही लक्ष वेधले आहे की, जीवनपद्धती म्हणून उत्क्रांत झालेल्या शेतीत आणि वनीकरणात जमीन व जंगले यांतून संपत्तीचे इतक्या प्रमाणात दोहन होत आहे की, त्यामुळे संस्कृतीलाच धोका निर्माण झाला आहे. गांधी म्हणत, 'पृथ्वी प्रत्येकाची गरज भागवू शकते, हाव नाही.' जोपर्यंत आपण निसर्गचक्राशी सहकार्य करतो तोपर्यंत जमीन सतत नव्याने सुपीक होऊन आपल्यावर अवलंबून असणाऱ्यांना आरोग्य, शक्ती आणि शांती देते. पण जेव्हा हाव वाढते तेव्हा निसर्गाचा समतोल ढळतो आणि सार्वजनिक जैविक ऱ्हास सुरू होतो. रासायनिक खते आणि जंतुनाशके यांचा वापर, दळणवळणाच्या आणि अन्न टिकवण्याच्या आधुनिक सोयी यांमुळे इतर वस्तूंप्रमाणेच जमिनीच्या सुपीकतेचा पैशासाठी विनिमय करण्याचा अनावर लोभ उत्पन्न झाला आहे. लॉर्ड नॉर्थबोर्न यांच्या मते खऱ्या शेतीचे आवश्यक वैशिष्ट्य हे आहे की 'तो धंदा नसतो, ती जीवनपद्धती असते.' श्रीमंत होण्याचे साधन म्हणून जमिनीचा उपयोग रोकड मिळविण्यासाठी केला जातो तेव्हा 'जमिनीवर बलात्कार' होतो. 'मानवी वर्तनातील नीतिमत्तेच्या प्रकाराचा केवळ त्याच्या सामाजिक परिसरावरच नव्हे तर निसर्गावरदेखील निश्चित प्रभाव पडतो.' गांधी विचारात देखील ह्या मुद्द्यावर विशेष भर दिलेला आहे.

### आर्थिक 'विकासा'चा अर्थ

पर्यावरणाचा बळी देऊनच उद्योगीकरण आणि आर्थिक भरभराट होते, हे स्पष्टच आहे. 'इकॉलॉजिस्ट'चे संपादक एडवर्ड गोल्डस्मिथ यांच्या मते 'उत्क्रांतीच्या प्रक्रियेतून निर्माण झालेले सजीवांचे जग, जैविक सृष्टी किंवा खरे जग यांचे अगदी वेगळ्या, कृत्रिम, तंत्रप्रधान सृष्टी किंवा दुय्यम जगात रूपांतर, ही गोष्ट आर्थिक भरभराटीत अनुस्यूत आहे. आर्थिक भरभराटीची ही प्रक्रिया उत्क्रांतीविरोधी आहे. आर्थिक भरभराटीची दुसरी बाजू म्हणजे जैविक सृष्टीचा संकोच.' म्हणून मोठ्या उद्योगांना पर्यावरण चळवळ अनिष्ट मानते.

### खरा भारत खेड्यांत

गांधींच्या स्वप्नातला भारत हा आपल्या समुदायांच्या गरजा भागविणाऱ्या 'प्रजासत्ताक खेड्यांचा संघ' होता. ह्या कल्पनेत नैसर्गिक साधनांचा अतिरिक्त उपयोग न करताही टिकाऊ स्वरूपाच्या विकासाची हमी होती.

खरा भारत खेड्यांत आहे म्हणून त्यांचा विचार राज्याने प्रथम आणि प्रामुख्याने केला पाहिजे, हे सिद्धांत म्हणून अनेकांना मान्य आहे. तरी, जेव्हा खेड्यांत राहण्याचा किंवा खेड्यांच्या जिवावर शहरांना मिळणाऱ्या सवलती रद्द करण्याचा, किंवा साधनवाटपाचा प्रश्न येतो, तेव्हा अत्यंत सद्हेतुप्रेरित बुद्धिवंत आणि अधिकारीही डगमगतात; आणि शब्दच्छलाचा किंवा विकासतत्त्वज्ञानातील तयार गोड सबबींचा आधार घेऊ लागतात. गांधींच्या कल्पनांशी शब्द-कृतीने एकनिष्ठ राहणे सोपे नाही.

गांधीवादी अर्थव्यवस्था म्हणजे आदिम अवस्थेकडे परतणे किंवा राहणीमानाचा दर्जा घसरविणे तर नव्हे? नक्कीच नाही. कारण गांधींनी म्हटले आहे, 'ज्यांना पुरेसे खायला नाही त्यांना भरपूर, ताजा आणि पौष्टिक आहार, जे वस्त्रहीन आहेत त्यांना टिकाऊ कपडे, आणि ज्यांना निवारा नाही त्यांना सुखकर घर मिळणे म्हणजे उच्च राहणीमान.' गांधींच्या विकासपद्धतीने सर्वसामान्य जनतेला 'संस्कृतीची खेळणी' मिळणार नसली तरी तिच्या आवश्यक गरजा मात्र निश्चितच भागणार आहेत. शिवाय, अशा अर्थव्यवस्थेत लोक निसर्गाच्या निकट सान्निध्यात राहतील. त्यामुळे वैष्णवांना वाटते त्याप्रमाणे वृक्षवेली आणि वन्यप्राणी यांसह सर्व जीवसृष्टीबद्दल आत्मीयता वाटेल.

### आधुनिक वसाहतवादाचे स्वरूप

परंतु जागतिक अर्थव्यवस्थेची घडण अशी झाली आहे की केवळ विस्तारानेच ती टिकू शकते. गोल्डस्मिथ यांनी सुचवले आहे त्याप्रमाणे, 'विश्व अधिकोष व आंतरराष्ट्रीय मुद्रानिधी हे मूलतः अर्थव्यवस्था सातत्याने विस्तारत राहावी यासाठीच निर्माण केले गेले आहेत. त्यांचे कार्यच मुळी हे की, त्यांनी तिसऱ्या जगातील देशांना आंतरराष्ट्रीय बाजारपेठ पद्धतीच्या कक्षेत ओढायचे. त्यासाठी आंतरराष्ट्रीय मुद्रानिधीच्या सर्व अटी मान्य करण्याच्या अटीवर त्यांच्या सरकारांना प्रचंड








कर्जे द्यायची. जर या अटी सरकारने मान्य केल्या तर त्यांना आपल्या देशांची दारे तयार पाश्चात्त्य मालासाठी उघडावी लागतात. आयात केलेल्या निरुपयोगी मालाची किंमत चुकती करता यावी म्हणून. परकी चलन मिळवण्यासाठी आपल्या देशातील अन्नधान्य आणि कच्चा माल विकावा वागतो. वसाहतवादाचाही खरा उद्देश हेच साध्य करायचा होता. आज आपण आंतरराष्ट्रीय मुद्रा आणि विश्व अधिकोष यांना त्या देशांकडे तीच धोरणे त्यांनी स्वीकारावीत म्हणून लाच द्यायला पाठवतो, आणि वर, हे सर्व त्यांच्याच हिताचे असल्याची बतावणी करतो.'

### नैतिक तत्त्वांवर भर

गांधींना वाटे, भारताचे उद्योगीकरण मोठ्या प्रमाणावर झाले तर त्यालाही अपरिहार्यपणे शोषणाकडे वळावे लागेल, आणि मग तो 'इतर राष्ट्रांना शाप व जगाला एक संकट' होऊन बसेल. औद्योगिक व्यवस्थेत अति उत्पादनाची प्रवृत्तीच असते. ते म्हणत, 'देव करो नि भारताला पाश्चात्त्यांच्या धर्तीचे उद्योगीकरण करण्याची बुद्धी न होवो. एका चिमुकल्या द्वीपराज्याच्या आर्थिक साम्राज्यशाहीने आज सगळ्या जगाला शृंखलाबद्ध केले आहे. जर ३०३ दशलक्षांच्या (आता ८०० दशलक्ष) एका सबंध राष्ट्राने अशाच पद्धतीने आर्थिक शोषण करायचे ठरवले तर टोळधाडीनंतर व्हावे तसे सगळे जग ते उघडेबोडके करून टाकेल.'

विकासातील नैतिक तत्त्वांवर गांधींनी पुनःपुन्हा जोर दिला. ग्रामीण जनतेवर, विशेषतः गरिबातल्या गरिबावर त्यांनी विकासाचा अग्रक्रम केंद्रित केला होता, जे अत्यंत निम्नस्तरियाला मिळू शकत नाही ते घेण्याचा आपल्याला अधिकार नाही असे ते मानीत. गांधी जसे शिकवीत तसाच आचार करीत. ते अत्यंत साधेपणाने राहात. कारण ते म्हणत त्याप्रमाणे 'भारताचे दारिद्र्य लक्षात घेऊन ज्याने समविभागणीचा आदर्श हा आपल्या जीवनाचाच भाग मानला आहे तो आपल्या गरजा घटवणारच.'

### प्रदूषणाचे संकट

औद्योगिक राष्ट्रे, तसेच तिसऱ्या जगातील देश यांमध्ये झालेल्या प्रचंड उद्योगीकरणामुळे हवा व पाणी यांचे प्रदूषण मोठ्या प्रमाणात झाले आहे; त्यामुळे गरिबांच्या निर्वाहसाधनांना आणि अनेक जीवजातींच्या अस्तित्वाला धोका उत्पन्न झाला आहे. आम्लवर्षेमुळे औद्योगिक जगातील फार मोठे जंगलक्षेत्र उद्ध्वस्त झाले आहे. पृथ्वीचे संरक्षण करणाऱ्या ओझोनस्तरात मोठे भगदाड पडले आहे. मानवी आणि इतर जीवजातींच्या आरोग्याला धोका उत्पन्न झाला आहे. तसेच, त्वचेचा कर्करोग, अंधत्व व इतर रोग यांचा धोकाही वाढला आहे. उद्योगधंद्यांमुळे नद्या, तळी व समुद्रसुद्धा इतका प्रदूषित झाला आहे की अनेक ठिकाणी मासे व इतर जलचर सृष्टी तगवण्याचे त्याचे सामर्थ्य नष्ट झाले आहे. भोपाळ आणि चेर्नोबिल येथील दुर्घटना हे तर जिवंत वास्तव आहे. त्या दुर्घटनांनी केवळ वर्तमान प्रजाच नष्ट झाली असे नव्हे तर भावी पिढ्यांचेही नुकसान झाले आहे.

विविध राष्ट्रांनी विज्ञानाभ्यासाठी दक्षिण ध्रुवावर केलेल्या अतिक्रमणामुळे तो प्रदेशही प्रदूषित झाला असून तेथील निसर्गनिर्मित समतोल ढळण्याचे भयंकर संकट निर्माण झाले आहे. 'ग्रीनपीस' या नियतकालिकानुसार दक्षिण ध्रुवावरील फिनफिशच्या कित्येक जाती अतिरेकी उपयोगामुळे इतक्या मोठ्या प्रमाणावर नष्ट झाल्या आहेत की मूळ संख्येच्या दहा टक्केही आता शिल्लक नाहीत.

औद्योगिक राष्ट्रांना उद्योगधंद्यातील विषारी कचऱ्याचे काय करायचे हे कळेनासे झाल्यामुळे तो जहाजे भरभरून तिसऱ्या जगातील देशांकडे पाठविण्याचा प्रयत्न करीत आहेत. अलीकडच्या एका बातमीप्रमाणे (टाइम्स ऑफ इंडिया, ऑगस्ट २, १९८८) 'गुप्तपणे सोडून दिलेले, १६७ पिंपे विषारी कचरा वाहणारे एक इटालियन जहाज नायजेरियाच्या कोको बंदरात सापडले. नायजेरिअन सूत्रानुसार तो कचरा युरोपीय देशांत तयार झालेला होता व नायजेरियात मागच्या वर्षी सोडून देण्यात आला होता. 'संपन्न' देशांत विषारी कचरा वाढत असल्यामुळे तो अशा रीतीने गुप्तपणे तिसऱ्या जगात टाकून देण्याच्या घटना वाढण्याची शक्यता आहे.

अमेरिकेचे सकल राष्ट्रीय उत्पादन जसे सर्वात जास्त आहे तसे तेथील कचऱ्याचे प्रमाणही सर्वात जास्त आहे. अलीकडच्या एका पाहणीनुसार तिथे १४० दशलक्ष मेट्रिक टन म्हणजे १५०० मालवाहू विमानांएवढा कचरा दरवर्षी तयार होतो. अनेक गावांत तो बंद करून ठेवावा लागला. कारण त्या कचऱ्याचे विष भूमिगत पाण्याच्या साठ्यात झिरपून पाणी, जमीन दूषित झाली; व एकूण अन्नधान्यनिर्मितीचे चक्रही प्रदूषित झाले. अमेरिकेतील ग्राहक संस्था आता पॅकेजेसचा आकार लहान करण्याची आणि कचरा कमी करण्याच्या इतर








अनुक्रमणिका

पद्धती अमलात आणण्याची मागणी करीत आहेत.

'कॉम्रेड रसायनवेत्त्यांनो, आता हा विस्तार काही काळ थांबवा- विश्रांती घ्या आणि आम्हालाही साध्या स्वच्छ हवेत श्वास घेण्याची संधी द्या,' असे आवाहन मॉस्को येथे नुकत्याच भरलेल्या कम्युनिस्ट कॉन्फरन्समध्ये रशियातील श्रेष्ठ पर्यावरणतज्ज्ञ फ्योदर मॉर्गन यांनी केले. त्यांनी असेही म्हटले की आपल्या विकासात पर्यावरण संरक्षणाला सर्वाधिक महत्त्व दिले गेले नाही तर मनुष्यजात जगणार नाही.

अलीकडेच राष्ट्राध्यक्ष रीगन आणि सप्तगटाच्या (ग्रुप ऑफ सेव्हन) नेत्यांनी विविध उत्पादनांतील रसायनांमुळे ओझोनचा नष्ट होणारा थर, रासायनिक खते आणि जंतुनाशके यांमुळे जमीन व पाणी यांचे होणारे विषारीकरण आणि 'हरितगृह परिणाम' (greenhouse effect) यांसंबंधी चर्चा केली. सगळ्यांना ह्या भयानक प्रवृत्ती ताबडतोब थांबल्या पाहिजेत हे मान्य आहे. परंतु त्यांवरचे उपाय सोपे नाहीत. कारण त्यासाठी वेगळा वैश्विक दृष्टिकोण, वर्तमान जीवनपद्धतीचा त्याग, उपभोक्तावादात घट, पोषक विकास आणि निसर्ग-सुसंगत जीवन या गोष्टींची गरज आहे. थोडक्यात, त्यासाठी गांधीवादी विचारसरणीची गरज आहे.

### चुकलेली दिशा

जग चुकीच्या दिशेने चालले आहे हे सिद्ध करायला पुरेसा अभ्यास, अहवाल आणि माहिती गोळा झालेली आहे. पर्यावरण व जीवसृष्टी यांच्या व्यतिरिक्त समाजस्वास्थ्याचाही नाश झालेला आहे. अपघात, गुन्हे, बालगुन्हेगारी, मादक द्रव्ये, अतिरेकी मद्यपान, एडस् यांचे प्रमाण पूर्वीपेक्षा कितीतरी जास्त झाले आहे. लोकांमध्ये याबाबत पुरेशी जागृती आणि समज आलेली आहे; पण दिशा बदलण्याची त्यांची इच्छा असल्याचे मात्र दिसत नाही. कृष्ण चैतन्य यांनी गोल्डस्मिथ यांच्याशी चर्चा करताना या गोष्टीकडे लक्ष वेधले आहे. ते म्हणतात, 'होय, हे सगळे चूक आहे. आपण मागे फिरायलाच हवे. पण आपल्याला तसे करता येईल का?... (प्लुटोनियम, युरेनियम यांसारख्या) मरणधंद्यात काम करून भरपूर पगार मिळवणारे बरेच लोक आपल्या मुलांना आयव्ही लीग कॉलेजमध्ये पाठवीत आहेत; उत्तम सहनिवासांत राहात आहेत आणि राहणीमानाचा उच्च दर्जा राखून आहेत. शांतीकडे (आणि पोषक पर्यावरणाकडे) परतणे म्हणजे केवळ त्या राहणीमानाचा त्यागच नाही तर कदाचित आवश्यक वस्तूंचा अभाव आणि एक दिवसाआड जेवण, असेही होऊ शकेल. त्याला आपली तयारी आहे का?'

गांधी म्हणत त्याप्रमाणे सर्वप्रथम आपण आपल्या भौतिक गरजांवर नियंत्रण ठेवायला शिकले पाहिजे. 'मन चंचल पाखरू आहे. त्याला जितके जास्त मिळेल तितकी त्याची हाव वाढते आणि तरीही ते अतृप्तच असते. आपल्या पूर्वजांना ठाऊक होते की अशा गोष्टींवर मन जडू दिले की आपण गुलाम बनतो आणि आपले नैतिक सत्त्व गमावून बसतो.' अशा संयमासाठी बहुधा सखोल आंतरिक स्थित्यंतराची गरज आहे.

### अहिंसेचे औचित्य

उद्याचे जग अहिंसाधिष्ठित समाजाचे राहील यावर गांधींची निःसंदिग्ध श्रद्धा होती. पश्चिमेतील पर्यावरण चळवळ उद्योगीकरणाच्या जबरदस्त हल्ल्यातून निसर्गाचे संरक्षण करण्यासाठी प्रामुख्याने आहे. ती शस्त्रांच्या राक्षसी संग्रहाविरुद्ध लढा द्यायलाही जोपर्यंत सज्ज होत नाही तोपर्यंत तिला लोकांच्या दृष्टीने खोल अर्थ किंवा औचित्य प्राप्त होणार नाही. अहिंसा हे मूल्य संस्कृतिवैशिष्ट्यांचे केंद्र झाल्याखेरीज निसर्गहिंसाविरोधी पर्यावरण चळवळ चालविणे शक्य नाही. पश्चिमेतील पर्यावरण चळवळ काय किंवा अणुविरोधी चळवळ काय, अहिंसेबद्दल संपूर्ण नैतिक आस्था निर्माण झाल्याशिवाय यशस्वी होऊ शकणार नाहीत.

भारतासाठी, आणि भारताद्वारा जगासाठी, आपल्याला काय हवे आहे याबद्दल गांधींना एक सुसंगत दृष्टी होती. ही सुसंगती बुद्धीला अति शिणवून जाणीवपूर्वक मिळवलेली नव्हती तर वस्तुमात्रांच्या स्वाभाविक संबंधांच्या अनुभूतीवर आधारलेली होती. आदिवासी माणसाला निसर्गातील अंतर्गत संबंध नेहमीच कळला आहे. आता आधुनिक विचारवंतांना व पर्यावरणतज्ज्ञांना देखील तो कळू लागला आहे.

गांधी काळाच्या पुढे होते. आइनस्टाइन यांनी त्यांच्यासंबंधी असे उद्गार काढले होते, 'असाही एक हाडामांसाचा माणूस या पृथ्वीवर होऊन गेला यावर कदाचित पुढच्या पिढ्यांचा विश्वासही बसायचा नाही.'



# आधुनिक विकासप्रक्रियेचे विनाशकारी वळण व पुनर्विचाराची दिशा

**वसंत पळशीकर**

हिंद मजदूर सभेचे पहिले अध्यक्ष कै. रामभाऊ रुईकर यांच्या स्मरणार्थ आयोजित केलेल्या व्याख्यानमालेत एक व्याख्यान देण्यासाठी आपण मला आमंत्रित केलेत हा मला माझा बहुमान वाटतो. माझ्या दृष्टीने ही एक विशेष संधी आहे. समाजपरिवर्तनाच्या क्षेत्रात महाराष्ट्रात, व प्रसंगी महाराष्ट्राच्या बाहेरही, गेल्या बारा-पंधरा वर्षांच्या काळात अनेक केंद्रांवर खेड्यापाड्यांतील कार्यकर्त्यांसोबत, सामान्य स्त्री-पुरुषांसोबत शिबिरांमध्ये सहभागी होण्याची संधी मला मिळाली. अशा प्रत्येक शिबिरातून मला काही ना काही शिकता आले. भारतीय समाज, त्या समाजाच्या परिवर्तनाचे प्रश्न, आणि परिवर्तनाची प्रक्रिया यांच्याविषयी आज माझी जी काही कमीअधिक जाण आहे ती मला बऱ्याच अंशी शिबिरांमधील संवादप्रक्रियेतून प्राप्त झालेली आहे. पण आजवर शहरी कामगारवर्गात काम करणाऱ्या कार्यकर्त्यांशी संवाद करण्याचा योग आला नव्हता. तो योग आज जुळून येत आहे. याचा म्हणून मला विशेष आनंद आहे. आजच्या प्रसंगी माझे व्याख्यान व्हावे असे ठरले आहे. संवादाची प्रक्रिया घडून येण्याच्या दृष्टीने यामुळे स्वाभाविक मर्यादा पडणार याची मला जाणीव आहे. व्याख्यानानंतर प्रश्नोत्तररूपी संवाद काही काळ तरी होईल व आपणा सर्वांकडून मला शिकावयास मिळेल अशी मी आशा बाळगून आहे.

व्याख्यानासाठी निमंत्रित करणाऱ्या पत्रातील काही मजकूर मी वाचून दाखविला म्हणजे मला दिल्या गेलेल्या विषयाची पार्श्वभूमी स्पष्ट होईल. पत्रात असे म्हटले होते की, 'आज जगभर राजकीय, आर्थिक, सामाजिक व तंत्रशास्त्रीय क्षेत्रात फार मोठ्या घडामोडी होत आहेत. या घडामोडींमुळे आंतरराष्ट्रीय सत्ता व संपत्ती यांतील विषमता व त्यावर आधारित शोषण व नववसाहतवाद वाढणार की कमी होणार हा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे. आपल्या देशातही ह्या क्षेत्रात फार मोठ्या प्रमाणावर घडामोडी होत आहेत. तेव्हा या जागतिक व राष्ट्रीय घडामोडींचे यथार्थ व संभाव्य परिणाम जाणून घेणे फार महत्त्वाचे आहे. त्याचबरोबर आपल्या देशाच्या विकासाचा विषयही बराच विवाद्य बनला आहे. राष्ट्रीय विकासाची सध्याची संकल्पना व आकृतीबंध कितपत बरोबर आहेत? त्यांतून खऱ्या अर्थाने विकास होत आहे का? असला तर कोणाचा? सामाजिक न्याय, दारिद्र्य व विषमतानिर्मूलन, पर्यावरणजतन, लोकाधिकार, सत्तेचे विकेंद्रीकरण अशांसारखी राष्ट्रीय उद्दिष्टे सध्याच्या प्रक्रियेतून किती प्रमाणात साध्य होतील? या महत्त्वाच्या विषयाची वेगवेगळ्या अंगांनी निरनिराळ्या वक्त्यांनी मांडणी करावी अशी या व्याख्यानमालेची या वर्षी आखणी केली असल्याबद्दल संयोजकांनी पत्रात लिहिले आहे.

परिवर्तन आणि विकास, पर्यावरणाचे संरक्षण व संवर्धन, लोकशाही समाजवाद अशा नानाविध विषयांवर लेख लिहिण्याचे धाडस मी अनेक वर्षे करीत आलो असल्यामुळे बहुधा संयोजकांनी मला व्याख्यान देण्यास आमंत्रित केले असावे. कारण कोणत्याही विषयाचा पंडिती स्वरूपाचा पद्धतशीर अभ्यास केलेली मी तज्ज्ञ, अधिकारी व्यक्ती नाही. निरीक्षण, अनुभव, काही वाचन आणि थोडेफार चिंतन-मनन हीच असली तर माझी शिदोरी आहे. मी व्याख्याता व आपण सर्व श्रोते अशी आजची औपचारिक रचना असली तरी, मी सर्वार्थाने तुम्हा कार्यकर्त्यांच्या पातळीवरच आहे व त्याच भूमिकेतून तुमच्या विचारार्थ मला जाणवणाऱ्या काही गोष्टी मांडणार आहे. तुमच्या अनुभव-निरीक्षणांमध्ये, वाचन-चिंतनामध्ये माझ्या मांडणीतल्या मुद्द्यांच्या पडताळा तुम्हाला मिळतो का हे तुम्ही जरूर पाहावे. तुमचे प्रश्न मोकळे व टोकदार असतील अशी मी अपेक्षा करतो; कारण त्यांना तुमच्या अनुभव-निरीक्षणांचा आधार असेल.

१.

टेक्नॉलॉजी (तंत्रविज्ञान) च्या क्षेत्रात ज्या घडामोडी, विशेषतः गेल्या दोनशे वर्षांच्या अवधीत घडल्या आहेत त्यांमधूनच आपल्या समोरचे आजचे मुख्य प्रश्न निर्माण झाले आहेत, असे सार्थपणे म्हणता येईल. अर्थात तंत्रविज्ञानाच्या क्षेत्रातील घडामोडी हा स्वयंभू शक्तीचा नियंत्रण न करता येण्यासारखा

अनुक्रमणिका






आविष्कार आहे असे मला अजिबात सुचवायचे नाही. तंत्रवैज्ञानिक शक्तींना एकदा चालना मिळाली की त्यांना स्वतःची एक गती प्राप्त होते. त्या शक्ती सामाजिक, राजकीय, आर्थिक जीवनाच्या एकंदर सर्वच क्षेत्रांना आकार देणाऱ्या शक्ती काही प्रमाणात ठरतात यात काही शंका नाही. पण आज पुष्कळ मोठ्या मोठ्या लोकांच्या बोलण्याचा सूर असा असतो की जणू तंत्रविज्ञान ही जगच्चालक शक्ती आहे. ती अशी काही शक्ती नाही. तंत्रविज्ञान आणि विज्ञान यांची समाजशास्त्रीय चिकित्सा होऊ शकते. तशी चिकित्सा करणे अर्थपूर्णही ठरते व अशा चिकित्सेची आज नितांत गरजपण आहे.

तंत्रविज्ञानाच्या क्षेत्रातील घडामोडींमुळे आजचे मुख्य प्रश्न उपस्थित झाले आहेत असे मग मी का म्हणतो? याचे दुहेरी स्पष्टीकरण देता येईल. सत्ता, संपत्ती व प्रतिष्ठा यांच्या केंद्रीकरणाच्या दृष्टीने अतिशय उपयोगी म्हणून एका विशिष्ट दिशेने तंत्रविज्ञानाच्या 'विकासा'ला सतत चालना देण्यात आलेली आहे हा एक भाग. आणि, आपण मनाने गुलामी पत्करून तंत्रविज्ञानाला आपणावर मुक्तपणे वरचष्मा प्रस्थापित करून दिला आहे हा दुसरा भाग. 'तंत्रवैज्ञानिक प्रगतीसाठी तंत्रवैज्ञानिक दैवत-पूजा बांधण्यासाठी आपले सर्वांचे मानस घडविण्यामागे अंशतः मतलबी हितसंबंधी आहेत. पण प्रामाणिक आंधळी समजूतही आहे. बाकी आपण काहीही करू शकू. पण तंत्रवैज्ञानिक वाटचाल कशी थांबविणार? ते शक्यही नाही व इष्टही नाही, असा युक्तिवाद केला जातो. इष्ट का नाही? तर अशीही धारणा बनलीय की सुख देणाऱ्या वस्तूंची रेलचेल उत्पन्न करणारी ही शक्ती आहे, तिच्याच घोडदौडीला लगाम घातला तर समृद्धी निर्माण कशी होणार?

अगदी स्वयंचलित यंत्रही, रोबो देखील, अंतःप्रेरणेने काम करीत नाही. त्याने केव्हा व कोणते काम कसे करायचे, निवड कोणती व कोणत्या कसोट्यांवर करावयाची वगैरे सर्व काही त्याला आधी भरवावे लागते. ठरवून द्यावे लागते. तंत्रविज्ञान स्वतःच्या गतीने व दिशेने, वळणाने काम करताना दिसते तेव्हाही तो भास असतो हे पक्के ध्यानात घेतले पाहिजे. कर्ताकरविता वेगळाच असतो. अर्थ असा की, तंत्रवैज्ञानिक क्षेत्रातील घडामोडींमधून आपले मुख्य प्रश्न निर्माण झाले असले तरी, अपराधाचे धनी ते नाही. विशिष्ट दिशा, वळण, गती यांची निवड करणाऱ्या मानवी शक्ती यांचीच ती जबाबदारी असते. मानवी शक्ती असा शब्दप्रयोग जाणूनबुजून केला आहे. मोजक्या चार-दोन व्यक्ती वा सत्ताधारी, भांडवलदार असे वर्ग यांनाच तेवढे जबाबदार धरता येत नाही. एकेका कालखंडाच्या, युगाच्या म्हणून काही दृढ बनलेल्या धारणा असतात, या धारणांनी सर्वच प्रभावित असतात. पण तरीही एकंदरीत माणसेच जबाबदार असतात.

तंत्रविज्ञान हे एक साधन आहे. साहजिकच कोणत्या साध्यांच्या पूर्ततेसाठी आजचे प्रगत तंत्रज्ञान प्रामुख्याने विकसित करण्यात आले आहे असा प्रश्न आपणास विचारता येतो व विचारलाही पाहिजे. व्यापार आणि व्यापारवृद्धीसाठी उत्पादनवाढ, युद्ध आणि साम्राज्यविस्तार, आणि निसर्गसृष्टीवर मात करून प्रति-ईश्वर बनण्याची आकांक्षा या प्रमुख तीन प्रेरणा आढळतात. या तीन प्रेरणांच्याही मुळाशी कोणती उद्दिष्टे आहेत असे पाहू गेल्यास सत्ता, संपत्ती व प्रतिष्ठा-कीर्ती ('ग्लोरी' या अर्थाने) यात आपण इतरांपेक्षा वरचढ असावे ही ईर्षा आढळते. ही ईर्षा व्यक्तिगत पातळीवर जशी आढळते तशी ती कुलघराणे, जमात, राष्ट्र या सामूहिक रूपांशीही जोडलेली आढळते.

तशी ही ईर्षा सनातन आहे आणि तरीही तिची आधुनिक स्वभावप्रकृती काही विशेष आहे. स्वार्थ अहंता इत्यादी वृत्ती व विकार माणसाच्या पाचवीलाच पुजलेले आहेत यात शंका नाही. सुख-दुःख, क्लेश-आराम या शब्दांच्या जोड्याच असे सांगतात की स्वभावतः माणसाला सुख, आराम हवासा वाटतो. दुःख, क्लेश हा माणसाचा भोग आहे, जसा मृत्यू हा जन्माला आलेल्या प्रत्येक जीवाचा भोग आहे, अशी माणसाची धारणा आधुनिकपूर्व काळात होती. आपणास असेही आढळते, की हे विश्व निर्माण करणारी शक्ती स्वतःमध्ये पूर्णतया सत्य, शिव व सुंदर असली तरी तिने निर्माण केलेल्या जगात मात्र दुष्टतेचा, कुरूपतेचा, क्रौर्याचा, अशुभाचा अनुभव काही अंशी निसर्गसृष्टीच्या व्यापारांमधूनही येतो. पण याचा प्रत्यय माणसाला स्वतःच्या अंतरंगीही येतो. याचे मूळ वासना-विकारांमध्ये, अहंतेमध्ये, स्वार्थांधतेमध्ये आहे असा त्याला प्रत्यय येतो. पण जगणे आणि वासना यांचा आलेला अन्योन्यसंबंध हाही त्याच्या नित्यअनुभूतीचा भाग आहे. व्यक्तीच्या कामना, वासना, ईर्षा यांचे वास्तव पुसून टाकता येत नाही. पण समाजाची निकोप व टिकाऊ धारणा यांच्या आधारे होऊ शकत नाही. कारण या गोष्ट विघटनकारी शक्ती ठरतात.

स्वार्थ, अहंता यांच्या पलीकडे नेणारी मूल्ये जीवनात महत्त्वाची आहेत असे सांगणाऱ्या धर्माच्या उदयामागे ही पार्श्वभूमी

आहे. आता, आधुनिक युगाची या संदर्भात दोन वैशिष्ट्ये आहेत. एक, स्वार्थसंपादन हीच व्यक्तीची मूळ सर्वस्वी स्वभावप्रकृती असते व तिच्या आधारे समाजाची धारणा होऊ शकते. नीतितत्त्वांची बांधणी करण्यासाठी वेगळा आधार घेण्याची गरज नाही. असे प्रतिपादन हे आधुनिकतेचे एक व्यवच्छेदक गमक आहे. दुष्ट, अशुभ, सैतानी हा काही विश्वाचा, मानवी स्वभावप्रकृतीचा अंगभूत भाग असतो. हे अज्ञानापोटी केले जाणारे प्रतिपादन आहे; माणसाने 'रीझन'चा - म्हणजे बुद्धि-प्रामाण्याच्या कसोटीवर टिकणाऱ्या गोष्टीच तेवढ्या मान्य करावयाच्या या तत्त्वाचा - अंगीकार केला आणि बुद्धिगम्य ज्ञान पूर्णत्वाला नेले तर ज्ञानाच्या प्रकाशाने अज्ञानांधःकार दूर होईल आणि माणूस परिपूर्ण बनू शकेल. आणि परिपूर्ण बनण्याच्या दिशेने माणसाची वाटचाल चालू आहे. विज्ञान हा 'रीझन'च्याच अंगीकाराचा एक आविष्कार आहे. बुद्धीने प्रमाणित झालेले ज्ञान सतत वाढवीत नेऊन, त्या ज्ञानाच्या साहाय्याने, उपयोजनाने मानवी व्यक्तित्त्व व समाजरचना रॅशनल (बुद्धि-प्रामाण्याधिष्ठित) बनवली, म्हणजेच एका अर्थी विज्ञान-तंत्रविज्ञानाधिष्ठित केली तर सारे प्रश्न सुटतील अशी भूमिका आहे.

असे लक्षात येईल की बदल घडवून आणणारी प्रभावी शक्ती म्हणून विज्ञान-तंत्रविज्ञान यांचा उदय-उत्कर्ष ज्या काळात झाला त्याच काळात नेमका स्वार्थ, अहंता, ईर्षा यांच्यावरील अंकुश काढून टाकला गेला. फारतर असे म्हणा की, स्वार्थावर उन्नत स्वार्थाचा, परस्परांच्या स्वार्थाची, हक्कांची योग्य दखल घेऊन स्वतःच्या स्वार्थाला आवश्यक ती मुरड घालून घेण्यास संमती देणाऱ्या 'करारा'चा तेवढा अंकुश ठेवण्यात आला. व्यवहारात याचा परिणाम असा झाला की, त्या त्या वेळी कार्यवाहीत असलेल्या कायद्याच्या चौकटीत राहून किंवा कायद्याच्या कचाट्यात न सापडता किंवा कचाट्यात सापडले असता हुशारीने, वकिली साहाय्याने, पैसे चारून, लागेबांधे वापरून इत्यादी मार्गांनी त्यातून निसटून - म्हणजेच गुन्हेगार म्हणून शिक्कामोर्तब होणार नाही अशी काळजी घेऊन सत्ता, मत्ता व प्रतिष्ठा, कीर्ती यांचा संचय करण्यासाठी व्यक्ती, कुळे-घराणी, राष्ट्रे इत्यादींना मोकळीक मिळाली. इतकेच नव्हे तर अशा स्वार्थसंपादनासाठी चालणाऱ्या तीव्र स्पर्धेतून आपोआपच सगळ्या समाजाचे पाऊल कल्याणाकडे, प्रगतीकडे, विकासाकडे पडणार अशी मांडणीही पुढे आली. त्या मांडणीला आज काही मुरड घातली गेली असली तरी आधुनिक आर्थिक, राजकीय व सामाजिक व्यवस्था याच सिद्धांतावर मुख्यतः उभारलेली आहे.

तंत्रवैज्ञानिक घडामोडीतून आजचे मुख्य प्रश्न का निर्माण झाले आहेत ते आता लक्षात येईल. तंत्रविज्ञानाची प्रभावी शक्ती ही प्राधान्येकरून स्वार्थपरिपोषासाठी वापरली जात आहे आणि स्वार्थपरिपोषणातच विकास आहे अशी धारणा असल्याने तंत्रविज्ञान एका विशिष्ट दिशेने मोकाट सुटल्यासारखे झाले आहे. आधुनिकपूर्व काळातले तंत्रविज्ञान हे तुलनेने फार क्षीण होते. शिवाय त्यावेळी तंत्रविज्ञानावरही धार्मिक बंधने होती. म्हणजे काही प्रकारच्या तंत्रवैज्ञानिक संशोधनांवर व विकासावर बंधने होती. आधुनिक काळात विज्ञान-तंत्रविज्ञान यांच्या संशोधनविकासाचे पद्धतशीर प्रयत्न केले गेले, कारण माणसाच्या परिपूर्णतेच्या दिशेने करावयाच्या प्रयत्नांचाही तो भाग मानला गेला. स्वार्थसाधनेच्या दृष्टीने तंत्रवैज्ञानिक शक्तीचे प्रभावीपण व उपयोग ध्यानात आल्याचाही तो परिणाम आहे.

प्रश्नाचे स्वरूप आता अधिक नेमके लक्षात येईल. तंत्रविज्ञानाच्या शक्तीचे मोठे मान आणि तंत्रविज्ञान ज्यासाठी मुख्यतः वापरले जात आहे ती उद्दिष्टे व त्यामागील प्रेरणा यांमुळे निर्माण झालेले प्रश्न गुणाकाराने अक्राळविक्राळ बनलेले आहेत.

## २.

भारताच्या विशिष्ट संदर्भात प्रश्न कोणते आहेत त्याकडे आता आपण वळू या. प्रथमतः थोडी आधीची पार्श्वभूमी ध्यानात घेऊ. स्वातंत्र्य मिळाले तेव्हा देशाचा आर्थिक विकास साधावयाचा म्हणजे काय व तो साधण्याचा मार्ग कोणता याविषयी कोणती भूमिका स्वीकारली गेली? शेतकीप्रधान भारताचे स्थित्यंतर औद्योगिकदृष्ट्या आधुनिक व प्रगत देशात करावयाचे, कारण देशाची गरिबी दूर करावयाचा तो एकमेव मार्ग होय, अशी भूमिका अंगीकारली गेली. त्याच्या बुडाशी पुढील काही खोलवर रुजलेल्या समजुती होत्या : शेतीवर फार लोकांचा भार हे भारतीयांच्या दारिद्र्याचे मुख्य कारण आहे; भारतात आधुनिक कारखानदारी उद्योगांची वाढ झालेली नाही आणि त्यामुळे भरपूर उत्पादन नाही; मागास तंत्रामुळे व अडाणीपणामुळे शेतीचेही दर एकरी उत्पादन फार कमी आहे.








अनुक्रमणिका

त्यामुळे गेल्या चाळीस-बेचाळीस वर्षांच्या नियोजनबद्ध आर्थिक विकासाचे प्रमुख उद्दिष्ट शेतीचे आधुनिकीकरण व आधुनिक कारखानदारी उद्योगांची उभारणी यांद्वारा उत्पादनवाढ घडवून आणण्याचे राहिले. संपत्ती व आर्थिक सत्ता यांचे केंद्रीकरण होऊ नये, विषमता कमी व्हावी, बेरोजगारीचे उच्चाटन करावे, खेड्यांचा सर्वांगीण विकास व्हावा. शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार व्हावा अशी इतरही उद्दिष्टे होती. जसजशी वर्षे गेली तसतसा काही उद्दिष्टांवरचा भर वाढला. विषमता काही प्रमाणात वाढली तरी चालेल, पण उत्पादनवाढीस अधिक महत्त्व द्यावे असे शेतीच्या क्षेत्रातले बदललेले धोरण राहिले. स्वातंत्र्यपूर्व काळातील वसाहतवादी शोषणाचा एक भाग म्हणून भारतात उद्योगधंद्यांच्या वाढीला उत्तेजन देणारी धोरणे ब्रिटिश सरकारने आखली नाहीत. औद्योगिक उत्पादनांच्या बाबतीत देश स्वावलंबी बनविण्याच्या दृष्टीने अनेकविध प्रकारच्या मालाचे उत्पादन देशात सुरू करणे, देशातील साधनसंपत्तीचा उत्पादक वापर कमाल वाढविण्यासाठी खासगी क्षेत्राला योग्य ती मोकळीक ठेवत असतानाच, शोषण व संपत्तीचे केंद्रीकरण प्रभावीपणे रोखण्यासाठी, सार्वजनिक क्षेत्राचे एकंदर अर्थव्यवस्थेवर प्रभुत्व प्रस्थापित करणे हा औद्योगिक धोरणांचा गाभा राहिला. परदेशी मदतीशिवाय वेगाने उद्योगीकरण साधणे अशक्य होते. परकीय मदत घ्यावी, पण तीही कमीतकमी घ्यावी, उत्पादनवाढीसाठी भांडवल गुंतवणूक करण्यापुरतीच सामान्यतः घ्यावी, लौकरात लौकर परावलंबनातून मुक्त होऊन देशास स्वावलंबी बनवावे हा उद्देश होता. त्यामुळे दैनंदिन उपभोगाच्या वस्तूंच्या आयातीवर कठोर नियंत्रण घालण्याचे धोरण ठरविले गेले. देशाच्या आर्थिक विकासाचे नियोजन करण्याला महत्त्व देण्यात आले.

स्वातंत्र्य मिळाले तेव्हा देश कोठे होता आणि शेती उद्योगधंदे व विविध सेवा यांच्या बाबतीत आज तो कोठे पोचला आहे हे पाहिले तर देशाने मोठा पल्ला गाठला आहे यात कोणास शंका असू नये. आज ऐंशी कोटींच्या घरात लोकसंख्या पोचली आहे. एवढ्या मोठ्या लोकसंख्येचे चांगल्या प्रकारे भरणपोषण होण्याच्या दृष्टीने अन्नधान्याचे उत्पादन पुरेसे होत आहे असे म्हणता येणार नाही. पण दुसऱ्या बाजूला मोठ्या प्रमाणावर भूकबळीही गेल्या चाळीस-बेचाळीस वर्षांमध्ये पडलेले नाहीत हे विसरता कामा नये. अनेक वर्षे मोठ्या प्रमाणावर अन्नधान्याची आयात करण्याची गरज उरलेली नाही. ही कामगिरी लहानसहान नाही. प्रसंगच पडला तर स्वतःच्या हिंमतीवर आपल्या औद्योगिक उत्पादनाच्या गरजा भागविता येतील अशी आपली क्षमता भारताने आज प्राप्त केली आहे असे म्हणता येईल. एवढी मोठी आर्थिक-औद्योगिक घडामोड पार पाडण्यास लागणारे नियोजन करण्याची, ती नियमित व नियंत्रित करण्याची क्षमता असलेली शासकीय व बिगर-शासकीय यंत्रणाही देशात आज उपस्थित आहे.

अनेकधर्मीय समाज, अगणित जाति-जमाती, बहु-भाषिक समाज असलेल्या आपल्या देशात लोकशाही राज्य-पद्धतीच्या अंगीकाराचा स्वाभाविक व अटळ परिणाम फुटीर व विघटनवादी ताणतणावांचा गुणाकार होण्यात झालेला आहे. ब्रिटिश राजवटीत अस्तित्वात आलेली राजकीय एकात्मता ही परकीय एकछत्री अमलाची 'कृपा' होती. स्वातंत्र्य मिळविण्याच्या प्रयत्नात तिला पहिला मोठा तडा जाऊन भारत व पाकिस्तान या दोन राष्ट्रराज्यांची निर्मिती झाली. गेल्या चाळीस-बेचाळीस वर्षांमध्ये तडे जाण्याची प्रक्रिया चालूच आहे. अशाही परिस्थितीत, एकछत्री हुकुमशाही अमलाचा आश्रय न घेता आपण येथवर मजल मारली आहे हे ध्यानात घेतले पाहिजे. माझ्या मते याचे सर्वांत मोठे श्रेय स्वातंत्र्यपूर्व काळातील राष्ट्रसभेचे संघटन, तिची परंपरा आणि तिचे नेतृत्व यांना आहे. 'राष्ट्रसभा' हा शब्द मी जाणूनबुजून वापरला आहे. स्वतंत्र भारतात काँग्रेसला विरोधी म्हणून समाजवादी, प्रजासमाजवादी, कृषक मजदूर प्रजा पार्टी, लोकदल आदी जे अनेक पक्ष निर्माण झाले तेही राष्ट्रसभेचा वारसा घेऊन पुढे चालणारे पक्ष होते. आताआतापर्यंत, काही प्रमाणात आजही त्यांचे नेतृत्व करणारी मंडळी ही राष्ट्रसभेत वाढलेली, तिचे संस्कार अंगी बाणलेली होती वा आहेत. हा व्यापक संदर्भ 'काँग्रेस' या शब्दाच्या वापराने दृष्टिआड होऊ नये म्हणून मी 'राष्ट्रसभा' हा शब्द वापरला आहे.

अनेक परिमाणे असलेले भारतीय सामाजिक, सांस्कृतिक व राजकीय जटील वास्तव ध्यानात घेता शेती व उद्योगधंदे यांच्या क्षेत्रात घडून आलेला कायापालट व साध्य केलेली उत्पादनवाढ या दोन्हींच्या कसोटीवर भारताने बजावलेली कामगिरी माझ्या मते अत्यंत श्रेष्ठ दर्जाची व गौरवास्पद आहे.








३

असे जर आहे तर मग तक्रार कसली? असा प्रश्न विचारला जाईल. तुमच्या असे लक्षात येईल की, अर्थव्यवस्थेचे आधुनिकीकरण, उत्पादनवाढ, संसदीय लोकशाही राज्य-पद्धतीची यशस्वी राबवणूक अशा काही मोजक्या कसोट्याच लावून आपण परीक्षा केली आहे. वास्तविक पाहता वरील तिन्ही गोष्टी ही केवळ साधने वा मार्ग आहेत. हा सर्व खटाटोप कशासाठी होता? ज्या ध्येयांसाठी आपण ही साधने निवडली ती ध्येये कोणती? ती ध्येये गाठण्याच्या दृष्टीने हे साधन-मार्ग कितपत अनुरूप होते? हे प्रश्न आपण विचारले नाहीत. ते आता उपस्थित केले पाहिजेत. 'आपण अवघड म्हणतो अशी बरीच वाटचाल केली पाहिजे. पण वाट आपण चुकीची धरलीय. कारण ही वाट आपल्या ध्येयाप्रत आपणास नेणारी नाही', अशा निष्कर्षाला आपणास यावे लागते.

उदाहरणार्थ, भारतातील सर्व सक्षम प्रौढ स्त्री-पुरुषांना निश्चित व नियमित रोजगार मिळावा, तो खड्डे खणून परत भरण्यासारखा निरर्थक वा शरीरविक्रय वा वेठबिगारीसारखा हीन व अप्रतिष्ठित नसावा, माणसाला साजेसे जीवन जगता येईल अशी रोजी त्यापासून मिळावी आणि निकोप, स्वस्थ आणि प्रसन्न परिसरामध्ये, माणसाला राहता यावे हे नियोजनबद्ध आर्थिक विकासामागील एक मुख्य ध्येय होते असे मी म्हटले तर गैर होणार नाही. पंचवार्षिक योजनांच्या पुस्तकांमध्ये या शब्दांमध्ये ते लिहिलेले आढळेल असे नाही. काही भाग लिखित स्वरूपात आढळेल व काही अध्याहृत व गृहीत होता असे म्हणता येईल. आरंभीच्या वर्षांमध्ये नियोजनकार व राज्यकर्ते यांची धारणा अशी होती की, देश समर्थ व स्वावलंबी बनविण्याच्या दृष्टीने भांडवली गुंतवणुकीवर भर देणे निकडीचे असल्याने, आधुनिक आर्थिक विकासाच्या नमुन्याचा अंगीकार केल्यावर, पहिली १०-१५ वर्षे, बेरोजगारीची समस्या अटळपणे तीव्रतर होईल. पण नंतर अनेकानेक उद्योग व सेवा यांच्या क्षेत्रात पर्याप्त संख्येने रोजगार उपलब्ध होतील. इतकेच नाही तर, उच्च उत्पादकता असलेल्या नव्या प्रगत तंत्रवैज्ञानिक रोजगारांमुळे रोजीपण चांगली मिळेल. समाज म्हणून थोडी कळ सोसण्याचा तेवढा मुद्दा आहे, अशी मांडणी होती.

पण तंत्रविज्ञानाच्या संदर्भातली आपली समज चुकीची होती. नवनवे कारखानदारी उद्योगव्यवसाय उभे राहिले की त्यामध्ये व त्यांच्या अनुषंगाने रोजगार निर्माण होताना दिसतात. रोजगार मिळतो म्हणून तर आज माणसे शहरांमध्ये गर्दी करतात. मात्र सर्वांना रोजगार देणे हे तंत्रवैज्ञानिक घडामोडींचे व कारखानदारांचेपण उद्दिष्ट नसल्याने बेरोजगारीचा प्रश्न या मार्गाने सुटण्यासारखाच नव्हता. ही गोष्ट आज आपल्या ध्यानात येत आहे. उत्पादनवाढही व्हावी व त्याच वेळी सर्वांना रोजगारही प्राप्त व्हावा यासाठी शेती उद्योग, सेवा यांची मांडणी कशी असावी, कोणते तंत्रविज्ञान समुचित होईल हे प्रश्न विचारावयास आता कोठे आपण सुरुवात केली आहे.

असाच दुसरा मुद्दा समतेचा आहे. समता प्रस्थापित करणे हे आधुनिकीकरण, कारखानदारी उद्योगांद्वारे उत्पादनवाढ, विकासाची आधुनिक प्रक्रिया यांचे उद्दिष्ट कधीच नव्हते. समतेचे तत्त्व व मूल्य आधुनिक युगाचे एक पायाभूत तत्त्व आहे हे खरे; पण ती समता वेगळ्या क्षेत्रातली, वेगळ्या आशयाची होती ही गोष्ट आपल्या ध्यानात आली नाही. जन्मजात उच्चनीचतेच्या मध्ययुगीन व्यवस्थेच्या विरोधात समतेचे तत्त्व पुरस्कारलेले होते. राजकीय, आर्थिक व सामाजिक क्षेत्रांमध्ये व्यक्तिगत कर्तृत्वाच्या, हिकमतीच्या जोरावर अनिर्बंधपणे स्वतःचा स्वार्थ व उत्कर्ष साधण्याच्या आड येणारे अडसर दूर करण्यासाठी तेवढा समतेचा पुरस्कार होता. स्पर्धेमध्ये उतरण्याची, इतरांना मागे पाडून पुढे जाण्यासाठी स्पर्धेचा वापर करण्याची समान संधी, कायदा व न्याय या दृष्टीने सगळे समान ही भूमिका व्यवहारात सत्ता, मत्ता व प्रतिष्ठा यांच्या अत्युच्च कोटीच्या विषम वाटपाच्या आड येणारी नसते. तसेच वारशाने गोष्टी मिळत राहतात तोपर्यंत समान संधीचे तत्त्वदेखील फार शबल स्वरूपात व्यवहारात उतरते. कायदा आणि न्याय यांच्या दृष्टीने तत्त्वतः सर्व सारखे असले तरी व्यवहारात किती विषम स्थिती असते याचा अनुभव आपणास हरघडी येतो आहेच.

तात्पर्य असे की, पारंपरिक व्यवस्थेत विषमतेला जेवढी मान्यता होती तेवढीच आधुनिक व्यवस्थेतही आहे. तिच्यावर एक फसवे आवरण तेवढे आहे. आधुनिक विकासाची प्रक्रिया तर केवळ विषमता खपवून घेते असे नाही; ती विषमता उत्पन्न करीत राहणारी, वाढविणारी, भक्कम करणारी प्रक्रिया आहे. जीवघेण्या व अनिर्बंध स्पर्धेवर ती आधारलेली असल्याने ती स्वभावतः निर्घृण आहे. अपयशी माणसांविषयी तिला दयामाया नाही. अपराधी वाटावे, शरमेने मान खाली घालावी लागावी इतका या निर्घृणतेचा साक्षात अनुभव वेगवेगळ्या पातळ्यांवर आजही आपणास येतो. कोंडीत सापडलेल्या








माणसाच्या दुरावस्थेचा पूर्ण फायदा उठविला जातो यासाठी हिकमती केल्या जातात. राजीखुषीने केलेल्या कराराचे सर्व व्यवहारांवर औपचारिक आवरण घातले जात असल्याने ही प्रक्रिया वरकरणी सभ्य, कायदेशीर व वाजवी भासते हे वेगळे. गेल्या चाळीस-बेचाळीस वर्षांमध्ये सत्ता, मत्ता व प्रतिष्ठा यांचे केंद्रीकरण वाढलेले आढळते. विषमता वाढलेली आढळून येते. हाच परिणाम घडून येणे वास्तविक अभिप्रेत होते हे आपल्या लक्षात येत नाही. भारतीय समाज पारंपरिक, मध्ययुगीन, सरंजामदारी वळणाचा व जातिव्यवस्थेवर आधारित असल्या कारणाने हा विकृत परिणाम निष्पन्न झाला असे आपणास वाटते. पण खरी गोष्ट तशी नाही.

आणखी एका अंगाने आपण विचार करू या. भ्रष्टाचार हा आज अपवाद राहिलेला नाही. काळा पैसा 'पांढऱ्या' पैशाइतकाच जवळपास अर्थव्यवस्थेत फिरत असेल अशी शक्यता आहे. चोरट्या मालाची आयात मोठ्या प्रमाणावर होते व त्याची विक्री बऱ्याच राजरोसपणे चालते. हे गंभीर रोग आहेत याविषयी कोणाचे दुमत होणार नाही. हे गंभीर रोग कशामधून उत्पन्न झाले? वैयक्तिक व सार्वजनिक चारित्र्याचा ऱ्हास कशापायी झाला? भारतीय लोकच चारित्र्यहीन, नादान, विश्वासास अपात्र, खोटारडे वगैरे वगैरे आहेत असा निवाडा ब्रिटिश राज्यकर्ते करीत. तो आपणास मान्य आहे का? लोकांच्या निरक्षरतेशी, गावंढळपणाशी, गतानुगतिक तथाकथित दैववादी, अंधश्रद्ध मानसाशी या रोगाच्या फैलावाचा संबंध आपण जोडू शकत नाही; कारण या रोगाचा सर्वात जास्त फैलाव सुशिक्षित, वरिष्ठ शहरी समाजात आहे आणि आधुनिक व्यवस्थेतील त्यांच्या स्थानाशी, व्यवहाराशी व यशाशी त्यांचा संबंध आढळतो. आधुनिक आर्थिक विकासप्रक्रियेमागच्या स्वार्थप्रेरणेशी, स्पर्धेशी, पैशाच्या पूजेशी, पैशाने विकत घेता येणाऱ्या सुखोपभोगांना मोठे मूल्य प्राप्त होण्याशी तर याचा साक्षात व अंगभूत संबंध नाही? असा प्रश्न उपस्थित करण्याचे आपल्या मनात येत नाही. सर्वच देशांमध्ये घडलेल्या आधुनिक आर्थिक विकास प्रक्रियेची पंडिती चर्चा सामान्यतः हे पैलू विचारात न घेता केली जाते. अन्याय, शोषण, वसाहतवाद यांची चर्चा करणारे लोक हे पैलू विचारात घेतात. पण तेही बहुतेक वेळा अन्याय, शोषण, अमानुष क्रौर्य, भ्रष्टाचार, काळाबाजार, चोरी इत्यादी गोष्टींचा संबंध खाजगी मालमत्तेवर आधारित भांडवलशाहीशी आणि साम्राज्यवादाशी लावतात. आधुनिक आर्थिक विकासाच्या प्रक्रियेच्या अंगभूत स्वभावप्रकृतीशी त्यांचा संबंध जोडीत नाहीत. मी असे म्हणण्याचे धाडस करतो की, आधुनिक आर्थिक विकासाची प्रक्रिया स्वाभाविकपणे वरील साऱ्या अनिष्ट गोष्टींचा फैलाव वाढविणारी प्रक्रिया आहे. पुढे जाऊन मला असे म्हणावेसे वाटते की, ज्या साऱ्या गोष्टी चारित्र्याच्या ऱ्हासाचा भाग आपण समजतो, चारित्र्यऱ्हासाला कारणीभूत होतात असे म्हणतो; त्यांच्याच आधारे आर्थिक विकासाची प्रक्रिया अधिक गतिमान बनते. आणि म्हणून, खरे तर, या सर्व गोष्टींचे स्वागतच ही प्रक्रिया करते. थोडक्यात, आधुनिक विकासाची प्रक्रिया ही 'स्वार्थसाधना हीच नीती' असे म्हणणारी प्रक्रिया आहे.

व्यवहारात इतक्या नागव्या स्वरुपात तिचे दर्शन आपणास होत नाही. याची कारणे अशी : (१) धर्म ज्या नीतीचा पुरस्कार करतो त्याचा प्रभाव अद्यापही लोकांच्या व्यवहारावर शिल्लक आहे. त्याचा एक प्रकारे आर्थिक व्यवहारांवर लगाम बसतो. (२) स्वार्थ साधनेचे तत्त्व ही अद्यापही राज्यव्यवहाराची व कायदेकानूंची, न्यायाची बैठक बनलेली नाही. (३) आर्थिक विकासप्रक्रियेच्या अगदी डोळ्यावर येणाऱ्या, बटबटीत परिणामांना आवर घालण्याची आवश्यकता प्रथम पासून वरिष्ठ वर्गाच्या अनेकांना वाटत राहिली आहे. आणि (४) समता, न्याय, प्रेम व सामुहिकता या मूल्यावर समाजाची व आर्थिक व्यवहारांची उभारणी करावी या विचाराने कार्य करणाऱ्या चळवळींच्या दबावामुळे आर्थिक विकासप्रक्रियेवर निर्बंध घातले गेले आहेत. आर्थिक विकासाच्या प्रक्रियेच्या अनैतिक परिणामांना मुरड घालणारी कारणे भारतात मात्र आजच्या घडीला फार क्षीण असल्याचे अनुभवाला येत आहे. म्हणजेच ही प्रक्रिया उत्तरोत्तर उघड्या नागड्या स्वरूपात आपल्यासमोर येत आहे.

एक शेवटचा मुद्दा मी मांडणार आहे. आधुनिक विकासप्रक्रियेचे एक मुख्य लक्ष उत्पादन सतत वाढवित नेणे हे आहे. उत्पादन सतत कशासाठी वाढवीत राह्यचे? जितके जास्त उत्पादन तितके सुखोपभोगासाठी उपलब्ध वस्तूंचे वैपुल्य अधिक, असे या प्रश्नाचे उत्तर दिले जाईल. उपभोगासाठी जितक्या वस्तू जास्त उपलब्ध असतात तेवढे सुख खरोखरच जास्त मिळते का? उपभोग वाढल्याने जर माणसाला समाधान, कृतार्थता व शांती यांचा अनुभव येत नसेल, त्याची अतृप्ती व लालसा उलट वाढतच असेल तर जी काही भावना होते तिला उद्देशून सुख हा शब्द तरी का वापरावा असा प्रश्न पडतो. हा

मुद्दा देखील तूर्त बाजूला ठेवू. पण असे सतत उत्पादन वाढवत नेण्यासाठी पृथ्वीच्या पृष्ठभागावरील व पोटातील, जमिनीवरील व समुद्रातील, समुद्राच्या तळाशी असलेले व तळाखालील सगळीकडचे सर्व साधनस्रोत वाढत्या प्रमाणावर वापरात आणणे क्रमप्राप्त आहे. यामुळे पृथ्वी उजाड बनत आहे. पृथ्वी उजाड बनून जीवनाची धारणा करण्याची तिची क्षमता संपुष्टात येण्याचा धोका समोर दिसत असला तरी या विकासप्रक्रियेला, त्याच विनाशाच्या दिशेने पुढे जात राहण्याशिवाय अन्य काही करता येणार नाही. कारण उत्पादनवाढीचे चक्र जर फिरावयाचे थांबले तर ही प्रक्रिया कोसळली म्हणून समजावे.

आधुनिक विकासप्रक्रिया ही एक अशी प्रक्रिया आहे की, जी सुखीसमाधानी, शांत व कृतार्थ जीवनातून सुखसमाधानाने, प्रसन्न मनाने निवृत्ती ही गोष्ट अशक्यप्राय करून टाकते. ती सतत उत्पादनवाढीच्या मागे तर लागलेली असतेच; पण त्याला पोषक असे कायम अतृप्त व लालची मन पण घडविते. याचा प्रत्यय आपणास जगाच्या पातळीवर येतो तसा भारतातही. व्यापारी बेरकीपणाने, वसाहतवादी दबावाने वा प्रलोभने दाखवून इतर देशांची साधनसंपत्ती स्वतःच्या फायद्यासाठी हस्तगत करण्याचा लोभ चांगल्यापैकी सधन असलेल्या देशांनाही आवरत नाही. त्यांच्या देशातली श्रमशक्ती व बौद्धिक शक्ती विकत घेणे महाग म्हणून तिसऱ्या जगातील स्वस्त श्रमशक्ती व बौद्धिक शक्ती यांचा उपयोग करून घेण्याकडे त्यांचे लक्ष असते. भारतातही येथील सधन वर्गांचे वागणे काही वेगळे आढळत नाही.

ह्या सगळ्याचा अटळ परिणाम म्हणून तंत्रवैज्ञानिक प्रगती, उत्पादनवाढ, सधनता, आधुनिकता यांच्या जोडीला हातात हात घालून जीवन व पर्यावरण वैराण, असंस्कृत, क्रूर-हिंस्त्र, लोभी व विध्वंसक बनत चालल्याचे आढळते. अतिसंहारक शस्त्रास्त्रांची निर्मिती, सर्वनाशकारी महायुद्धाचे सतत कायम असलेले सावट हे त्याचे प्रतीक आहे. भारतात उत्तरोत्तर वाढत्या प्रमाणात दैनंदिन जीवन बेपर्वा, बेबंद, हिंस्र, लोभी, कृपण, असंस्कृत बनत चालल्याचा अनुभव येतो.

४.

माणसाचे माणूसपण जोपासण्याच्या परमोच्च श्रेयाच्या कसोटीवर व अखेरीस कोणतीही गोष्ट स्वीकारावयाची की तिचा अव्हेर करावयाचा याचा निवाडा करावयास हवा. कार्ल मार्क्स व महात्मा गांधी या दोन महापुरुषांचे चिंतन औद्योगिक क्रांती व तीमधून आरंभ होत असलेली आर्थिक विकासाची प्रक्रिया यांच्या संदर्भातच घडले. त्यांच्या काळातील भांडवली विकासप्रक्रियेने माणसाचे खच्चीकरण होताना पाहून मार्क्सचा अनावर झालेला सात्त्विक संताप 'कम्युनिस्ट मॅनिफेस्टो' व 'कॅपिटल' या त्याच्या दोन ग्रंथांमध्ये आपणास अनुभवायास मिळतो. मात्र वैज्ञानिक संशोधनाद्वारे आकारास आलेल्या तंत्रवैज्ञानिक शक्तींचे मार्क्सला अप्रूप वाटले. काबाडकष्टाचे व दारिद्र्याचे ओझे उतरवून टाकून 'काव्यशास्त्रविनोदाने' नटलेले पण त्याच वेळी माणुसकीने ओतप्रोत जीवन प्रत्येक माणसाच्या आवाक्यात आणण्याचे, माणसाला मुक्त करण्याचे सामर्थ्य तंत्रवैज्ञानिक शक्तींमध्येच आहे आणि त्या आता प्रकट झाल्या अशी त्याची धारणा होती. नफेखोर शोषणामधून का होईना पण भांडवलसंचय करून, त्या भांडवलाची पुन्हा उत्पादनवाढीसाठी गुंतवणूक करून तंत्रवैज्ञानिक शक्तींना विकसित केल्याचे, त्यांचा असा विलोभनीय आविष्कार घडवून आणल्याचे श्रेय मार्क्सने मुक्त हस्ताने भांडवलदारवर्गास दिले आहे. पण ही व्यवस्था स्वभावतः अमानुष आहे हेही त्याने जाणले. नफेखोर, शोषक भांडवलदारांच्या पकडीमधून तंत्र-वैज्ञानिक शक्तींची सोडवणूक करून मानवमात्राच्या कल्याणार्थ त्या कधी व कशा राबवल्या जातील ही त्याची चिंता होती.

मार्क्सला संतप्त बंडखोर व निष्ठावंत बनविणारी अंतःप्रेरणा मूलतः नैसर्गिक होती. त्याच्या कल्पनेतील आदर्श समाजातील व्यक्तीच्या दैनंदिन जीवनाचे त्याने रेखाटलेले चित्र असे दाखवते की वस्तुवैपुल्यामधून मिळणाऱ्या शरीर सुखोपभोगांची रेलचेल हे त्याच्या लेखी समृद्ध जीवनाचे लक्षण नव्हते. मार्क्सच्या मांडणीमधील एक खोच सामान्यपणे ध्यानात आलेली नाही असे माझे निरीक्षण आहे. १८५० च्या आसपास औद्योगिक क्रांतीने जो टप्पा गाठला होता व त्या वेळी तंत्रवैज्ञानिक शक्तींच्या विकासाची जी पातळी होती तिने काबाडकष्ट न करता सर्वांना खाऊनपिऊन सुखी करण्याइतके उत्पादन हस्तगत करण्याची कुवत मानवाच्या हाती दिली आहे अशी मार्क्स व एंगल्स यांची धारणा आढळते. कुवत प्राप्त झाली असूनही श्रमिकांचे शोषण कमी होत नाही याचे कारण युगकार्य संपत आलेली भांडवली अर्थव्यवस्था असा निष्कर्ष त्यांनी काढला. सांगण्याचा मुद्दा असा की, वस्तूचे उत्पादन अमर्याद वाढवीत

न्यावे, त्यापोटी पृथ्वी उजाड बनवावी हे मार्क्सला अभिप्रेत नव्हते. रसास्वाद घेत जगलेले सुखी जीवन आणि वस्तुवैपुल्याच्या गराड्यात जगलेले अतृप्त जीवन यांत मार्क्स भेद करीत होता हे स्पष्ट आहे.

आधुनिक पाश्चिमात्त्य संस्कृती, आधुनिक आर्थिक विकास यांच्यावर महात्मा गांधींनी १९०९ साली 'हिंदस्वराज्य' या छोटेखानी पुस्तिकेत सरळसरळ हल्ला चढवलेला आपणास पाहावयास मिळतो. औद्योगिक क्रांतीनंतरच्या भांडवली अर्थ-व्यवस्थेचे दोन नमुने त्यांनी फार जवळून पाहिले, अनुभवले होते. बॅरिस्टर होण्यासाठी १८८८ ते १८९१ च्या दरम्यान त्यांचं लंडनमध्ये वास्तव्य होते. तेव्हाची तेथील स्थिती त्यांनी बारकाईने पाहिली. पुढे दक्षिण आफ्रिकेत औद्योगिक क्रांतीने जन्मास घातलेल्या संस्कृतीचे अधिक नागडे रूप त्यांनी अनुभवले. इंग्लंडच्या इतिहासातील साम्राज्यवादी युगाचा तो ऐन 'माध्यान्ह-काळ' होता हे ध्यानात घेतले पाहिजे. उत्पादनात सतत वाढ करण्यावर उभारलेल्या 'गरजांच्या अमर्याद विस्तारा'चे तत्त्व पुरस्कारणाऱ्या आणि वस्तूंच्या उपभोगातून मिळणाऱ्या सुखालाच परमोच्च ध्येय मानणाऱ्या आधुनिक पाश्चिमात्त्य संस्कृतीने जीवनाचे आध्यात्मिक परिमाण पूर्णतया नाकारले आहे असे त्यांना आढळले. तंत्रवैज्ञानिक शक्तींच्या उच्च उत्पादकतेने त्यांना भुरळ पाडली नाही. गांधींची जाण मार्क्सपेक्षा अधिक खोलवर, मुळाशी जाणारी होती. देहधारणेबरोबरच येणाऱ्या भुका आणि सहजप्रवृत्ती, वासना या जगण्यासाठी, वंशसातत्या-साठी आवश्यक असतात हे खरे; पण वासनेचा अतिरेक झाला की तिचे विकारामध्ये रूपांतर होते, आणि विकार हे माणसातील माणूसपणाचे शत्रू होत. स्वार्थ व अहंता या माणसाच्या पाचवीला पुजलेल्या गोष्टी आहेत. विकारांवर पोसला जाणारा स्वार्थ व अहंता, आणि स्वार्थ व अहंतेतून आणखी पोसले जाणारे विकार यांमधूनच जीवनातील अशुभ, दुष्टावा, कुरूपता या गोष्टी निर्माण होतात. विकारांचा परिपोष करण्यात, त्यांचा उपभोग घेण्यात, स्वार्थ आणि अहंतेची साधना करण्यात जीवनाचे श्रेय आहे या धारणेवर आधारित आधुनिक पाश्चात्त्य समाजव्यवस्था व संस्कृती (सिव्हिलायझेशन) सैतानी आहे, असत्यावर आधारलेली आहे असे महात्मा गांधींनी म्हटले. नव्याने उत्कर्ष पावलेल्या तंत्रवैज्ञानिक शक्तींची निर्मिती विकारवशता निर्माण करणारे उपभोग सतत वाढवीत राहण्याच्या हेतूने झालेली असल्याने या तंत्रवैज्ञानिकशक्ती व त्यांच्या साहाय्याने होणारे उत्पादन यांचे गांधींना अप्रूप वाटले नाही.

कोणते तंत्रविज्ञान चांगले, औद्योगिक रचना कोणती इष्ट, अर्थव्यवस्था कोणती श्रेयस्कर? माणसाचे व्यक्तित्व सुसंस्कृत व उन्नत होण्यास सर्वांत अधिक अनुकूल व अनुरूप असे समाजजीवन निर्माण करण्यास साहाय्यभूत होईल ते तंत्रविज्ञान चांगले, ती औद्योगिक रचना इष्ट, ती अर्थव्यवस्था श्रेयस्कर असे उत्तर आपण दिले पाहिजे असे मला वाटते.

सुसंस्कृत व उन्नत व्यक्तित्व कशास म्हणावे, आणि अशी व्यक्तित्वाच्या निर्मितीमध्ये ऐषआरामी जीवनाचे काही स्थान असते का, या दोन प्रश्नांचेही उत्तर आपणास द्यावे लादेल. सत्य शिव या परिमाणांचा जर अभाव असला, किंवा या दोन मूल्यांपासून जर फारकत घेतली असती तर बुद्धिमान, कलासक्त, वैज्ञानिक अशी विशेषणे ज्यांना लावता येतील अशी माणसे अमानुष क्रौर्य प्रकट करू शकतात. हिटलरच्या नाझी जर्मन राजवटीत लाखो ज्यूंचे शिरकाण करणारी अनेकानेक अधिकारी मंडळी 'काव्यशास्त्रविनोदा'च्या कसोटीवर, वैज्ञानिक-तेच्या कसोटीवर, प्रगल्भ, आदबशीर, शालीन रीतीरिवाजांच्या कसोटीवर उच्च कोटींची सुसंस्कृत माणसे ठरली असती, सर्व-भूतहितरत बुद्धी, आत्मौपम्य बुद्धी यांचा विकास ज्या प्रमाणात माणसाच्या व्यक्तित्वात व समाजाच्या जीवनात आढळतो त्या प्रमाणात ती व्यक्ती व समाज सुसंस्कृत व उन्नत म्हणावा असेच महात्मा गांधींप्रमाणेच आपलेही उत्तर असायला हवे असे मला वाटते. ऐषआरामी जीवन या आशयाच्या विकासाला नेहमीच प्रतिकूल राहिले आहे. दारिद्र्याने गांजलेल्या, भुकेलेल्या व काबाडकष्टाच्या ओझ्याने वाकलेल्या माणसाला, त्याची ती अवस्था कायम राहूनही, सुसंस्कृत व उन्नत व्यक्तित्व प्राप्त होऊ शकते का? याचे उत्तर निखालसपणे असे दिले पाहिजे की, त्याच्या गरजांची पूर्तता निश्चितपणे पर्याप्त प्रमाणात व्हायला हवी व अखेर त्यासाठी व्यक्तीला ओझ्याने वाकून जाण्याइतके काबाडकष्टी जीवन जगायला लागता कामा नये. अशी परिस्थिती समाजातल्या सर्व माणसांसाठी उत्पन्न करण्यात तंत्रविज्ञानाच्या साहाय्याने उत्पादन पुरेशा प्रमाणात निघत राहण्यास महत्त्व आहे. पण यापेक्षा अधिक महत्त्व उत्पादन-वाढीलाही नाही वा तंत्रविज्ञानालाही नाही.

शरीराला व मनाला आराम देणाऱ्या, सुखविणाऱ्या, उत्तेजित करणाऱ्या, उल्हसित करणाऱ्या अनेकानेक गोष्टींचा जास्तीतजास्त प्रमाणात व वेळा, एकानंतर एक उपभोग








घेण्यामधून व्यक्तित्व सुसंस्कृत व प्रगल्भ बनते अशी समज आज आधुनिककालीन माणसांच्या मनात फार दृढ झालेली आढळते. आपल्यासमोर उच्च जीवनमानाचे आदर्श नमुने म्हणून राजेरजवाडे, धनिक, सत्ताधीश यांच्या भोगविलासी जीवनाचे नमुने सामान्यतः राहिले आहेत. माणसे म्हणून या व्यक्ती सुसंस्कृत व उन्नत होत्या का, त्यांच्या सुसंस्कृत उपभोगी जीवनाची मदार शोषण, दडपणूक, हिंसा, क्रौर्य ही नव्हती का हे प्रश्न विचारण्यासारखे आहेत. समता, न्याय, शोषणमुक्ती ही मूल्ये मानणाऱ्या आपण मंडळींनी तरी किमानपक्षी उच्च जीवनमानाचे हे आदर्श नमुने नाहीत हे मनोमन स्वीकारले पाहिजे. व्यक्तीचे स्वतःशी, इतरांशी व निसर्गसृष्टीशी - म्हणजेच या सर्व चराचर सृष्टीत ओतप्रोत असलेल्या त्याच एका चैतन्यतत्त्वाशी - सम्यक संबंध प्रस्थापित होणे ही सुसंस्कृत व उन्नत असण्याची कसोटी आहे. स्वार्थ व अहंभाव यांना योग्य त्या पायरीवर रोखून ठेवल्याखेरीज त्या दिशेने पहिले पाऊलदेखील पडू शकत नाही. साधुसंतांचे व महात्म्यांचे व्यक्तित्व व जीवन हेच आपले आदर्श नमुने असायला हवेत. त्यांच्या शिकवणुकीच्या प्रकाशात आपली व्यक्तिगत व सामाजिक वाटचाल व्हायला हवी.

जगातल्या सधन देशांची बरोबरी आपण केली पाहिजे, एकविसाव्या शतकात लौकर 'पोचले' पाहिजे, उच्चतम व अत्याधुनिक तंत्रविज्ञान जास्तीतजास्त वापरले पाहिजे, अनेकानेक वस्तूंची दरडोई खपत वाढली पाहिजे, उत्पादन दरवर्षी अमुक इतक्या टक्क्यांनी वाढले पाहिजे. अशांसारख्या लक्ष्यांची मानगुटीवरची पकड जर गळून पडली तर भारताचे खरे व निकडीचे प्रश्न सोडविण्यासाठी आपण मोकळे होऊ. बऱ्याच प्रमाणात अवडंबराची गरज उरणार नाही.

५

सुसंस्कृत व उन्नत व्यक्तित्व जोपासले जाण्यासाठी अनुकूल समाजव्यवस्थेची जडणघडण करावयाची असे ध्येय एकदा स्वीकारले आणि सुसंस्कृत असण्याची व्याख्या साधुसंतांच्या शिकवणुकीच्या अंगाने केली की आर्थिक विकासाविषयीचा सारा दृष्टिकोणच बदलतो. भौतिक सधनतेवर भर राहात नाही. वस्तुवैपुल्याची निर्मिती हे अर्थव्यवस्थेचे लक्ष्य राहात नाही. माणसामाणसांमधील संबंधांवर, माणसाच्या भोवतालच्या नैसर्गिक व सामाजिक परिसरावर भर दिला जातो. वस्तू या उपयोगासाठी असतात आणि त्यांच्या उपयोगातून माणसाचे व्यक्तित्व घडत असते. मार्क्सच्या परिभाषेत मुद्दा मांडावयाचा झाला तर, वस्तूंची निर्मिती करत असतानाही बाजारातल्या खरेदी-विक्रीच्या व्यवहारात वस्तूला येणारी किंमत महत्त्वाची ठरत नाही. कारण वस्तू ही केवळ विक्रय-वस्तू नसते हे जाणलेले असते. उपयोगी वस्तूच्या देवाणघेवाणीतून माणसांमध्ये ऋणानुबंध निर्माण व्हायला हवेत, हे लक्ष्य बनते. वस्तूमध्ये माणसाचा अंश उतरलेला असतो. वस्तू ही तिच्या निर्मात्याची ओळख असते. निर्मितीच्या प्रक्रियेद्वारा माणूस निसर्गसृष्टीशी, इतरांशी व स्वतःशी अशा रीतीने जोडला जावा की सगळ्यांची व्यक्तित्वे अधिक उन्नत, संपन्न व सुसंस्कृत बनावीत.

यंत्राद्वारे मोठ्या प्रमाणावर उत्पादन करावे, ते बाजारात स्वस्तामध्ये उपलब्ध व्हावे, वस्तूच्या निर्मात्याची व निर्मात्या समूहाची ओळख पुसली जाईल इतके उत्पादन व्यक्ती/समूहनिरपेक्ष असावे ही गंभीर त्रुटी मानली जाईल. अनेकानेक वस्तू या सामूहिक निर्मिती असतील. पण त्या निर्मात्यांच्या नावे ओळखल्या जाऊ शकतील. इतके कारखान्याचे आकारमान लहान ठेवणे महत्त्वाचे मानले जाईल.

स्वस्त/महाग, श्रमशक्ती/श्रम, मजुरी/वेतन हे शब्द आर्थिक व्यवहारामागे असलेल्या माणसाचा विसर पाडणारे शब्द आहेत. आधुनिक अर्थशास्त्र माणसाचा विचार श्रमशक्ती, बौद्धिक शक्ती, कौशल्य, ज्ञान या रूपांतील एक उत्पादन-घटक म्हणून करते व त्यात भूषण मानते. तर आर्थिक व्यवहार त्याच वेळी व्यक्तिविकासात्मक, सामाजिक, नैतिक व अध्यात्मिक व्यवहार असतात ही नवी बैठक असेल.

नैसर्गिक शेतीपद्धती यशस्वीपणे विकसित करणारे जपानी शेतकरी-साधुपुरुष मासानोषु फुकुओका असे म्हणतात की, आदर्श समाजव्यवस्थेत समाजातील सर्व माणसे काही काळ शेतीवरील साधे नैसर्गिक जीवन जगतील. शेती हा शब्द व्यापक अर्थाने घ्यावयाचा आहे. निसर्गाच्या कुशीत राहून, निसर्गाशी तादात्म्य पावून जगावे ही प्रत्येक माणसाची गरज आहे. गांधी, टॉलस्टॉय, थोरो, रवींद्रनाथ ठाकूर अशा महापुरुषांनीही त्यांच्या पद्धतीने हीच गोष्ट सांगितलेली आढळते. लहान गावसमुदायामध्ये माणूस नामवंत राहतो; म्हणजे सर्वजण त्याला ओळखतात, त्याच्याशी जवळिकीच्या, आत्मीयतेच्या नात्याने जोडलेले राहतात. जातपात व स्पृश्यास्पृश्यता असूनही पूर्वी गावात माणसे अशी नामवंत व अनुबंधित असत. शहरदेखील किती मोठे असावे? माणसे बिनचेहऱ्याची, अनामिक










बनू नयेत इतपत शहराचे आकारमान असावे. शहरात राहात असतानाही निसर्गाशी सहजी तादात्म्य पावता येईल इतकी निसर्गसृष्टी शहराच्या जवळपास असावी. सहज फिरता फिरता शहरातून उठून निसर्गात जाता यावे.

तंत्रविज्ञानाची निवड करण्याची, उत्पादनाची व्यवस्था लावण्याची, समाजाचे संघटन करण्याची शेजारधर्म, भातृभाव, सामूहिकता, ऋणानुबंध, परस्परांचे पोषण ही सूत्रे बनतात. स्वावलंबन, हस्तोद्योग, स्वदेशी, विकेंद्रीकरण, ग्रामस्वराज्य या सर्व गोष्टी त्यांतून स्वाभाविकपणे निष्पन्न होतात.

राष्ट्र-राज्य (नेशन-स्टेट) ही रचना या तत्त्वांवर आधारलेल्या समाजाच्या निर्मितीच्या मार्गातला मोठा अडसर ठरते. कारण राष्ट्र-राज्याची बैठकच मुळात विषमतेचा परिपोष करणारी, सत्ता-मत्ता-प्रतिष्ठा यांच्या केंद्रीकरणाची पुष्टी करणारी आणि जगात हिंस्र स्पर्धा वाढविणारी आहे. पण आजच्या घडीचे ते वास्तव आहे. हे वास्तव न नाकारता, त्याचा ताण झेलत, त्याने पडणाऱ्या मर्यादांनी मुरड घालून घेत विकासाची एक वेगळी वाट आपण चोखाळायला हवी.

६

माझ्या मताप्रमाणे आजच्या घडीला भारताच्या निकोप आर्थिक विकासाच्या संदर्भात तीन समस्या मध्यवर्ती महत्त्वाच्या आहेत : १) नैतिक पर्यावरणाची जीवनधारणक्षमता उच्चतर पातळीवर वेगाने नेणे व ती निरंतर उच्च पातळीवर राहील अशी त्याची व्यवस्था करणे. २) अद्यापही ७० टक्के लोक ज्या लाखो खेड्यामध्ये राहतात त्या खेड्यांमध्ये राहूनच लोकांना निश्चितपणे रोजगार मिळेल आणि खाऊनपिऊन सुखी जीवन जगण्याइतके उत्पन्न मिळेल अशी शेती, वनसंवर्धन व उद्योगव्यवसाय यांची रचना करणे. खेड्यांच्या ज्या गरजा तेथल्या तेथे भागू शकत नाहीत अशी गरजांच्या पूर्ततेच्या दृष्टीने पेठा, लहान शहरे यांची अशी रचना करणे ज्यामुळे महानगरे व मोठी शहरे यांना आलेली सूज उतरेल. आणि ३) केंद्रीभूत उद्योगधंदे, सेवा, व्यापार, अन्य संस्था यांच्यातील नीरक्षीरविवेक करून अर्थव्यवस्थेवर ताण निर्माण करणारा अनावश्यक, अनिष्ट भाग विघटित होईल याची नियोजनपूर्वक व्यवस्था करणे.

आर्थिक विकासाच्या प्रक्रियेला वेगळे वळण देण्याच्या योजनेत खेडेगावास मध्यवर्ती महत्त्व आहे. 'खेडे' हा शब्द उच्चारला की खेड्यांची आजची अवस्था, तेथील राजकीय व सामाजिक जीवन, जातपात या गोष्टी डोळ्यांपुढे येतात. असे गृहीत धरले जाते की, आहे या स्थितीतील खेड्यांची पुष्टी करण्याचाच विचार मांडला जात आहे. भारतासारख्या प्राचीन समाजाच्या बाबतीत 'पाटीवरील गिचमिड' प्रथम पुसून, पाटी कोरी करून घेऊन मग नव्याने सगळा मजकूर लिहिण्याचे स्वप्न पाहता येत नाही. खेडे म्हणत असताना, काही शतकांपासून एका जागी राहत असलेल्या कुटुंबांचा समुदाय गृहीतच धरावा लागतो. या समुदायाची बरीच मोडतोड अलीकडच्या काळात झाली असली तरी गावकी म्हणून त्यांचे अस्तित्व शिल्लक आहे. खेड्यांच्या व्यवस्थेची पुनर्रचना करण्याच्या दृष्टीने खेड्याचे हे सामर्थ्यस्थळ आहे. या पुनर्रचनेच्या गाभ्याशी दोन योजना असतील. एक त्या गावच्या सीमांमध्ये येणाऱ्या शेतजमीन, जंगल, ओसाड पडीक जमीन मिळून बनणाऱ्या शिवाराच्या पर्यावरणीय विकासाची योजना आणि सूर्यप्रकाश व पाणी यांची जमिनीशी सांगड घालून गावासाठी पर्याप्त प्रमाणात अन्नधान्याचे व लाकूड, जळण, चारा आदी स्वरूपात 'बायो मास' (Bio Mass) चे उत्पादन करण्याची योजना. पशुधनाची जोपासना या दोन्ही योजनांत समाविष्ट असेल. या योजना राबवावयाच्या तर गावाची सामाजिक व राजकीय पुनर्रचनाही करावी लागेल. जातपात, स्पृश्यास्पृश्यता यांचे उच्चाटन, ग्रामसभेद्वारा गावातील प्रौढ स्त्री-पुरुषांचा सहभाग, निर्णयाची सामूहिक प्रक्रिया, सार्वजनिक हिशोब व ऑडिट या अंगाने ही पुनर्रचना योग्य नेतृत्व पुढे आल्यास गावात होऊ शकेल ही आपल्या अनुभवाची गोष्ट आहे. खेडेगावांच्या नव्याने उभारणी करण्याच्या संदर्भात, गावातील सर्वांना गावातच नियमित अर्थपूर्ण रोजगार वरील दोन योजना राबवून दिला जाऊ शकेल अशी सर्वत्र शक्यता नाही. गावात अन्य औद्योगिक उत्पादनेही केली जावी लागतील. खेड्यांच्या बांधणीच्या वरील उद्दिष्टांच्या पूर्ततेच्या दृष्टीने उपयोगी असणारे, सार्वत्रिक चालविता येणारे उद्योग (व औद्योगिक उत्पादने) शहरांमधून हटवून (विकेंद्रित करून, समुचित तंत्रज्ञानाचा अंगीकार करून) खेड्यांमध्ये वा खेड्यांच्या आसपास स्थलांतरित करण्याची योजना आखून ती पार पाडावी लागेल. अनेकानेक औद्योगिक उत्पादने खेड्यांतील लोकांना रोजगार पुरविण्याच्या दृष्टीने 'राखीव' म्हणून संरक्षित ठेवावी लागतील.

या पुनर्मांडणीसाठी काही साधनस्रोत खेड्याकडे

पद्धतशीरपणे वळवावे लागतील. सार्वत्रिक वापरात असलेल्या कापड-चोपड, भांडीकुंडी, घरगुती वापरातील इतर वस्तू, सायकलीसारखी वाहने, शेतीची औजारे, जवळच्या अंतरात वाहतूक करणारी बैलगाडीसारखी साधने इत्यादी वस्तूंचे उत्पादन सर्वत्र स्थानिक बाजारपेठेसाठी लहान प्रमाणावर छोट्या छोट्या कारखान्यांमध्ये करावयाचे झाले तर जमिनीची खातेफोड करतात तशी मोठ्या कारखान्यांची वा उद्योगांच्या समूहांची 'खातेफोड' करावी लागेल. काही उद्योगांच्या बाबतीत नव्या समुचित तंत्रविज्ञानाचा शोध घ्यावा लागेल. पण अशी पुनर्रचना करणे तंत्रवैज्ञानिकदृष्ट्या इतके अवघड नाही. याला विरोध मोठ्या उद्योगसमूहांचा व बड्या मंडळींचा होईल, संघटित बड्या उद्योगसमूहांमधील कामगारवर्गाचाही आरंभाला विरोध होण्याची शक्यता आहे. पण आज शहरांमध्ये कारखान्यांमध्ये कुशल कामगार म्हणून काम करणाऱ्यांपैकी अनेकांना लहान प्रमाणावरील स्थानिक उद्योजक बनण्याची संधी उपलब्ध होईल ही गोष्ट लक्षात आली तर या पुनर्मांडणीला त्यांना अनुकूल करून घेता येईल.

माणसांच्या हातांना काम देण्यासाठी कोणतीच कामे आपल्या डोळ्यासमोर नाहीत असे दिसत नाही. देशातील सर्व ओसाड, पडीक जमिनीवर जंगले वाढवावयाची. गवते, झुडपे व झाडे या स्वरूपात बायोमॅसचे उत्पादन वाढवायचे व त्याचे रूपांतर करावयाचे असे ठरविले. पावसाचे पाणी जास्तीतजास्त मुरवावयाचे, काळजीपूर्वक जागोजाग साठवावयाचे व कुशलतेने वापरायचे ठरविले तरी मोठ्या प्रमाणावर मनुष्यबळाला उपयोगी काम आहे. अडचण तिहेरी दिसते. १) विकासाच्या संदर्भात ही कामे छाप पाडणारी, नेत्रदीपक नाहीत. त्यामुळे अशी योजना राबविण्याचे आकर्षण वाटत नाही. २) रोजगार उद्योग-धंद्यांमध्येच मिळणार व तोही अत्याधुनिक मोठ्या, शहरी उद्योगधंद्यांमध्ये अशी पक्की धारणा नियोजनकार व विकासवादी अर्थशास्त्रज्ञांची, राज्यकर्त्यांची झालेली आहे. ३) खेडोपाडी अशी योजना राबवावयाची तर निष्ठावान, कार्यक्षम, चोख व समंजस कार्यकर्त्यांची मोठी यंत्रणा लागेल. ती गावागावांतून उपस्थित असावी लागेल. आजची शासकीय यंत्रणा व तिचे मानस यासाठी अनुकूल नाही व सक्षमही नाही.

विकासाचा हा मार्ग निवडण्यासाठी आणखी एक अडचण ध्यानात येते. या मार्गाने जावयाचे ठरविल्यास गावोगावच्या कोट्यवधी लोकांच्या प्राथमिक गरजांची पूर्तता करण्यास अग्रक्रम द्यावा लागेल. अन्नधान्य, साधे कापडचोपड, गावातील घरे, लोकांना लागणारे इतर घरगुती सामान, औजारे, बैलगाड्या इत्यादी गोष्टींचे उत्पादन करून त्याचे बरेचसे समान वाटप करण्याचे बंधन घालावे लागेल. कारण रोजगार मिळालेली ही माणसे या गोष्टींची मागणी करणार. शेती व औद्योगिक क्षेत्रांत कोणत्या गोष्टींचे उत्पादन करायचे हे ठरविताना या लोकांच्या गरजांची दखल घेतली जात नाही. आज अशी स्थिती आहे की समाजातील वरच्या पाच-दहा टक्के लोकांच्या हाती फार मोठ्या प्रमाणात क्रयशक्ती गोळा झालेली आहे आणि त्यांचे चोचले पुरविण्यासाठी अनेकविध उत्पादने बाजारात येत आहेत. देशाजवळ जी साधनसंपत्ती आहे, भांडवल आहे, जे कुशल व प्रशिक्षित मनुष्यबळ आहे ते अशी उत्पादने काढण्यासाठी खर्ची पडत आहे. परदेशी कर्जाच्या बोज्याखाली पार कंबरडे मोडण्याची पाळीदेखील यातूनच ओढवली आहे.

खेड्यांना मध्यवर्ती ठेवून निसर्गव्यवस्थेची जीवन-धारणक्षमता वाढविणे, सर्व प्रौढ सक्षम स्त्री-पुरुषांना अर्थपूर्ण रोजगार देणे, त्यांचे जीवनमान उंचावणे, ते ज्या परिसरात राहतात तो परिसर निकोप, शुद्ध व प्रसन्न बनविणे अशा अनेकानेक गोष्टी एकाच एकात्म कार्यक्रमाच्या आधारे करणे एरवी शक्यतेच्या कोटीतले आहे.

महात्मा गांधी म्हणत, की 'वन स्टेप इज इनफ फॉर मी' - योग्य दिशेने एक पाऊल टाकता येत असेल तर पुरे आहे. पुढची वाट मग स्पष्ट होत जाईल किंवा इंग्रजीत एक म्हण आहे, 'टेक केअर ऑफ द पेनीज, पाउंड्स वुईल टेक केअर ऑफ देमसेल्व्हज्.' खेड्यांची योग्य पुनर्बांधणी आपण केली आणि रोजगार, उत्पन्न व परिसर या दृष्टींनी खेडी आकर्षक ठिकाणे बनवली तर इतर विभागांचीही योग्य फेरमांडणी करणे सहजी शक्य होईल.



अविद्यया मृत्युं तीर्त्वा
विद्ययाऽमृतमश्नुते।
- ईशावास्य

निरोधाने मृत्यू तरून
विकासाचे अमृत गाठतात.







अनुक्रमणिका

# पर्यावरणाचा ऱ्हास घडविणारा जनहितविरोधी विकासाचा नमुना

माधव गाडगीळ (अनुवाद : रत्नाकर हातेकर)

आपल्या देशातील स्वयंसेवी क्षेत्रात काम करणाऱ्या कार्यकर्त्यांमध्ये आजवर ज्या विकासाच्या मार्गांचा आपण पाठपुरावा करत आलेलो आहोत त्याच्या इष्टा-निष्टतेविषयी शंका व्यक्त होऊ लागली आहे; इतकेच नव्हे तर पर्यायी विकासमार्गाचा शोध ते घेऊ पाहताहेत ही घटना खचितच उत्साहवर्धक आहे. विकासाची प्रक्रिया सुरू असताना पर्यावरणाशी संबंधित असे जे परिणाम घडून येतात ते या संदर्भात अत्यंत महत्त्वाचे ठरतात.

## विकासाचा अर्थ

एखाद्या व्यवस्थेची अधिक वांछनीय व अधिक प्रगल्भ अशा अवस्थेकडे वाटचाल होत राहणे हे विकासात अभिप्रेत असते. आपला विषय लक्षात घेता निरनिराळ्या गरजा भागविण्यासाठी पर्यावरणातील संसाधनांचा समाजाकडून होणारा वापर हा कशा पद्धतीने होतो ह्याचा विचार करणे येथे उचित ठरेल. केवळ उदरनिर्वाहासाठी नव्हे तर चांगल्या प्रकारे जगण्यासाठीदेखील मानवाला अनेक गोष्टींची आवश्यकता असते. ह्या आवश्यकतांची पूर्तता करण्याच्या प्रयत्नातून निर्माण होणाऱ्या टाकाऊ पदार्थांचा निचरा करण्याचे काम तो पर्यावरणा-वरच सोपवतो. व्यक्ती काय किंवा समाज काय, उच्च जीवनमानाच्या आकर्षणाने संसाधनांचा जास्तीतजास्त वापर कसा करता येईल ह्या खटपटीत आहेत. त्यामुळे टाकाऊ पदार्थांचा निचरा करून घेण्याच्या पर्यावरणाच्या क्षमतेवर वाढत्या प्रमाणात ताण पडतो आहे. तथाकथित विकसित देश सर्व प्रकारच्या संसाधनांचा कितीतरी प्रचंड प्रमाणात वापर करीत आहेत. आणि तितक्याच प्रमाणात टाकाऊ पदार्थांची निर्मिती करीत आहेत. उदाहरणार्थ, अमेरिकन मनुष्य दिवसाकाठी सरासरीने ३००० कॅलरीज इतके अन्न घेतो. तर भारतीय मनुष्याला दिवसाकाठी सरासरीने १६०० कॅलरीज इतके अन्न मिळते. विजेच्या वापराबाबत असणारी तफावत तर खूपच अधिक आहे. भारतीयांच्या तुलनेत अमेरिकन मनुष्य शंभरपट अधिक वीज वापरतो. ह्या पद्धतीने सर्व प्रकारच्या संसाधनांचा दरडोई वापर वाढत जाणे व विशेषकरून ज्या संसाधनांचा समावेश बाजारपेठेच्या यंत्रणेत होतो त्यांचा वापर वाढणे म्हणजेच विकास असे समीकरणच तयार होते.

ह्या समीकरणाची तपासणी अनेक अंगांनी होणे आवश्यक आहे. सध्या अन्नाचा दरडोई उपभोग १६०० कॅलरीज असताना, लोकसंख्येपैकी १० टक्क्यांना ३००० कॅलरीज व ९० टक्क्यांना १४४५ कॅलरीज अशी वाटणी झाली असल्याचे गृहीत धरूया. अशा स्थितीत दरडोई उपभोग २००० कॅलरीज पर्यंत वाढविण्याचे ठरवल्यास दोन शक्यता असू शकतात. एक म्हणजे १० टक्के लोकांचा दरडोई अन्न-उपभोग ३००० कॅलरीजपर्यंत रोखून धरणे व ९० टक्क्यांचा उपभोग १८८९ कॅलरीजपर्यंत वाढविणे. किंवा दुसरी शक्यता अशी की ९० टक्क्यांचा उपभोग पूर्वीप्रमाणेच १४४५ कॅलरीज कायम ठेवणे व उरलेल्या १० टक्क्यांचा उपभोग ७००० कॅलरीजपर्यंत वाढविणे. अर्थात कोणालाही दिवसाकाठी ७००० कॅलरीज इतके अन्न भक्षण करणे खरोखरच शक्य नसल्याने ह्या अन्नापैकी बरेच अन्न कचराकुंडीत टाकले जाईल हे उघडच आहे. सांगायचे तात्पर्य हे की संसाधनांच्या वापराबाबत मोठी विषमता असेल तर सरासरी उपभोगाच्या आकडेवारीने प्रत्यक्षातील परिस्थितीची कल्पना येत नाही. उलट त्या परिस्थितीचे विकृत चित्र निर्माण होऊ शकते. तेव्हा संसाधनांच्या वाटपाचाही विचार मनाशी बाळगला पाहिजे. विकास हा समतापूर्ण पद्धतीने होतोच असे नाही. खरे तर अनेकदा विकास होतो म्हणजे संसाधनांचा एकूण उपभोग वाढण्याऐवजी एखाद्या विवक्षित विभागाकडून दुसऱ्या एखाद्या विभागाकडे त्याचे स्थलांतर घडते इतकेच.

## विकासाची चिरस्थायिता

विकासाच्या प्रयत्नांपायी ज्या गतीने संसाधनांचा वापर वाढतो त्या गतीने पुनर्निर्मितीक्षम नसलेल्या संसाधनांचा पुरवठा संपुष्टात येतो. उदा. दगडी कोळसा वा मँगनीज. पुनर्निर्मितीक्षम संसाधनांच्या रूपाने असणारा भांडवलस्वरूपी साठा संपेल की नाही ही गोष्ट त्या संसाधनांचा वापर वार्षिक

अनुक्रमणिका








उत्पादनाच्या पातळीच्या आत राखला जातो की नाही आणि संसाधनांची पुनर्निर्मितीक्षमता जतन केली जात आहे की नाही, यावर अवलंबून राहील. भूगर्भात असणारे जलप्रवाह व माशांचा भांडवलस्वरूपी साठा हे त्यांचे उदाहरण म्हणून सांगता येईल. शिवाय विकासाच्या ओघात डी.डी.टी. किंवा पारद-संयुगासारख्या पदार्थांची निर्मिती इतक्या मोठ्या प्रमाणावर होणे शक्य असते की त्यांचा निचरा करून घेण्याची निसर्गाच्या ठिकाणी असणारी क्षमता त्या मानाने अपुरी पडावी. अर्थातच पुनर्निर्मितीक्षमता नसलेल्या संसाधनांचा साठा कमी होत जाणे अपरिहार्यच आहे. आपल्यासमोर पर्याय असतात ते दोनच. एक तर अशा संसाधनांचा वापर अधिक कार्यक्षमतेने करणे किंवा दुसरा म्हणजे एका प्रकारचे संसाधन संपुष्टात आल्यावर त्या जागी दुसऱ्याचा वापर करू लागणे. जसे अमेरिकेत पेट्रोलियमच्या किमती वाढल्यानंतर खासगी मोटारींची इंधनकार्यक्षमता लिटरला ४ कि.मी. पासून २० कि.मी. पर्यंत वाढविण्यात आली तर ब्राझिलमध्ये अल्कोहोलचा इंधन म्हणून वापर होऊ लागला. पुनर्निर्मितीक्षम नसलेल्या संसाधनांचा वापर दीर्घकाळ टिकवायचा असला तर त्यांच्या वापराच्या वेगाशी सुसंगत रीतीने तंत्रज्ञानातील सुधारांचा विकास व्हावा लागेल. दुसऱ्या बाजूने ज्यांची पुनर्निर्मिती निसर्गचक्रानुसार होत असते असा, शेतजमिनीतील अन्नद्रव्ये, भूगर्भातील पाणी, माशांचा साठा किंवा वृक्षांपासून मिळणारे एकूण जैव पदार्थ ह्यांचा वापर जोपर्यंत त्यांच्या नैसर्गिक वार्षिक भरीच्या प्रमाणापेक्षा अधिक होत नाही तोपर्यंत अव्याहतपणे वापर करता येतो. वृक्षवनस्पती, मासे या सजिवांचे नियतकालिक पुनरुत्पादन होत असते. किंवा भूजलसाठ्यात दरवर्षीच्या पावसातले पाणी झिरपून भर पडत असते. पुनरुत्पादन वा नव्याने पडणारी भर यांचे प्रमाण ध्यानात घेऊन संसाधन म्हणून त्यांचा वापर त्या प्रमाणाच्या मर्यादेत राखला जाणे इष्ट व आवश्यक असते. मुद्दलास हात न लावता व्याजाची रक्कम तेवढी वापरीत राहिले तर व्याज अव्याहत मिळू शकते. मूळ भांडवली साठा अक्षय राखून व्याजस्वरूपी जी भर/वाढ होते तिची पातळी/प्रमाण शोधून त्या प्रमाणातच पुनर्निर्मितीक्षम संसाधनांचा वापर करण्यास अशा संसाधनांच्या व्यवस्थापनात महत्त्व आहे. परंतु आधुनिक काळातील अनुभव असा की अशा प्रकारे संसाधनांचे दोहन कसे करावे याबाबतच्या धारणा अतिबाळबोध आहेत. पाईन वृक्षांच्या जंगलांचे निरंतर दोहन करण्याची आदर्श रीत म्हणून पाईन वृक्षांची लागवड टप्प्याटप्प्याने प्लॉट्समध्ये करून, एकेका प्लॉटमधील समान वयाची सर्व झाडे दर काही वर्षांनी तोडावीत असा उपाय करण्यात आला. पाळी जर नीट ठरवली तर जंगलही कायम राहील व दोहनही भरपूर करता येईल अशी धारणा. अलीकडील काळात युरोपमधील जंगले नष्ट होण्याचे कारण आम्लवर्षाव हे सांगितले जात असे; परंतु पर्यावरणाच्या वृक्षनिर्मितीच्या अंगभूत क्षमतेहून अधिक वृक्षांची तोड वर्षानुवर्षे होत राहणे हे यामागचे खरे कारण असल्याचे लक्षात येत आहे. आम्लवर्षाव हे देखील एक कारण आहेच. आता आम्लवर्षावाबाबत सांगायचे झाल्यास, औद्योगिक राष्ट्रांत ज्या पद्धतीने ऊर्जेचा वारेमाप वापर होतो त्यामध्ये ह्याचे मूळ सापडते. ऊर्जेच्या अत्याधिक वापरामुळे सल्फर-डाय-ऑक्साइडचे प्रमाण इतके वाढते की ते वृक्ष आणि गोड्या पाण्यातील जीवांना मारक ठरते.

## संसाधनांच्या वापराचे केंद्रीकरण

संसाधनांच्या साठ्याकडे एकंदर गोळाबेरीज पद्धतीने पाहिले जाते. उदाहरणार्थ, भारताची जळाऊ सरपणाची गरज भागविण्याइतका लाकूडफाटा, काट्याकुट्या यांची उपलब्धता पुरेशी आहे किंवा नाही असा विचार केला जातो. विकासाचा दरडोई पद्धतीने विचार करण्यात जो दोष आहे तोच ह्या विचारपद्धतीतदेखील आढळतो. भारताची एकूण जळाऊ सरपणाची गरज भागविण्यासाठी जी जंगलतोड होते ती देशातील एकूण जंगलांच्या नियतकालिक पुनरुत्पादनक्षमतेचा विचार करता कदाचित इष्ट पातळीच्या आत असेलही. परंतु प्रत्येक ठिकाणची परिस्थिती सारखीच असेल असे नाही. काही ठिकाणी जंगलतोड ही वार्षिक वृक्षवाढीची मर्यादा ओलांडूनही होत असणे शक्य आहे. अशा प्रकारे संसाधनांच्या वापराबाबत स्थानपरत्वे जे असंतुलन आढळते तेच पर्यावरणाच्या ऱ्हासाच्या सर्व प्रश्नांच्या मुळाशी असल्याचे दिसते व याकडे आजपर्यंत दुर्लक्ष झालेले आहे.

भारतीय उपखंडात विकासाच्या प्रक्रियेमधून दारिद्र्याच्या महासागरात समृद्धीची काही बेटे निर्माण झालेली आहेत. आपल्या ह्या उपखंडातील पर्यावरणातील असमतोलाच्या कारणांचा मागोवा घेतला तर असे दिसते की एकांगी पद्धतीने विकास करण्याचे धोरण ह्याला मुख्यतः कारणीभूत आहे. याचा अर्थ असा की एकूण लोकसंख्येला संसाधनांचा अधिक








लाभ कसा होईल याऐवजी, संसाधनांचा प्रवाह समृद्धीच्या बेटांकडे वळविणे ही आजवरची रीत राहिली. असे केल्याने दारिद्र्यात खितपत असलेल्या विभागाकडील संसाधने संपुष्टात तर येतातच, परंतु त्या विभागांना संपन्नतेच्या बेटांतील मंडळींसाठीचा टाकाऊ पदार्थांचा उकिरडा असे स्वरूप प्राप्त होते.

जागतिक संदर्भात अर्थातच भारत देश समृद्धीच्या बेटांमध्ये समाविष्ट नसून या बेटांना वेढणाऱ्या दारिद्र्याच्या महासागरातील एक सागर आहे. जगातील सारी संसाधने जगातल्या वेचक समृद्धीच्या बेटांकडे खेचली जात आहेत. व तेथे निर्माण होणारे टाकाऊ पदार्थ या सागरांमध्ये टाकले जात आहेत.

ह्याची काही देशांतली उदाहरणे बघू. बंगलोर हे अतिशय वेगाने वाढणाऱ्या महानगरांपैकी एक असल्याने घरबांधणीसाठी ह्या शहराला प्रचंड संख्येने विटांची गरज असते. विटा तयार करण्यासाठी वस्त्रगाळ मातीची व त्या भाजण्यासाठी जळणाची आवश्यकता असते. बंगलोर शहराच्या शंभर किलोमीटर परिघातील तळ्यांमधील गाळ पूर्वी शेतकरी खत म्हणून त्यांच्या जमिनींमध्ये टाकत असत. आता हा गाळ विटा तयार करण्यासाठी वापरला जातो. विटा भाजण्यासाठी आवश्यक असणारे जळण वडाची व पिंपळाची झाडे तोडून मिळविले जाते. ही झाडे पवित्र मानून त्यांचे रक्षण परंपरेनें आतापर्यंत झालेले होते. ह्या झाडांनी पांथस्थांना सावली दिली, जनावरांना खायला पाला दिला व आपल्या फळांनी पक्षी-जीवनाचे पोषण केले. गावकरी ह्या झाडांच्या काटक्या आणि लहान झुडपे ह्यांच्याद्वारे आपली जळणाची गरज अजूनही भागवतात. वीटभट्ट्यांमध्ये जाळण्यासाठी मात्र वडाची, पिंपळाची झाडे तोडली जात आहेत. महाराष्ट्राच्या पश्चिम किनारपट्टीतील सुप्रसिद्ध हापूस व इतर आंब्यांची निर्यात बंगलोर व भारतातील इतर शहरांना तसेच परदेशांना करण्यासाठी ह्या किनारपट्टीतील वडाची पिंपळाची झाडे नष्ट होत आहेत. तद्वतच हिमालयाच्या पश्चिम विभागातील पाईन व सेडरसारख्या झाडांची तोड खोऱ्यांमधून शहरांना सफरचंद निर्यात करण्यासाठी केली जात आहे.

शहरी विभागांना ज्याप्रमाणे पुरवठ्याचा सतत वाहता ओघ लागतो त्याचप्रमाणे वीज, नैसर्गिक वायू, पेट्रोलियम, केरोसीन व या सर्वांपेक्षा कितीतरी अधिक मात्रेत जळाऊ लाकूड या स्वरूपातील ऊर्जेचा सतत ओघ शहराकडे जात असतो. उदा. बंगलोर शहराला लागणारी बहुतांश वीज ही शरावती नदीवरील विद्युतप्रकल्पापासून मिळते. ह्या प्रकल्पामुळे स्थानिक वातावरणावर अनेक प्रकारचे दुष्परिणाम झालेले आहेत. ह्या दुष्परिणामांचे मूळ नियोजनाचा अभाव आणि ज्यांच्या जमिनी धरणाच्या पाण्याखाली गेल्या त्यांना पुरेशी नुकसानभरपाई न मिळणे ह्यांत सापडते. पुनर्वसन न झालेल्या धरणग्रस्तांनी जंगल तोडून तेथे वस्ती केली. काही लोकांनी तर धरणाच्या पाणलोट क्षेत्रातही वस्ती केली. ह्या प्रक्रियेचे वर्णन करावयाचे झाल्यास शहरी विभागांना ऊर्जेचा पुरवठा करत असताना दुसरीकडे तो पुरवठा ज्या भू-विभागाच्या आधारे केला जातो तेथील पर्यावरणाचा नाश होऊ देणे व ही नाशाची प्रक्रिया तेथेच बंदिस्त करणे, तिचा संसर्ग शहराला लागू न देणे असे करता येईल.

भारतातून औद्योगिक किंवा तेलसंपन्न राष्ट्रांकडे भौतिक संसाधनांचा ओघ वाहतो. पश्चिम किनाऱ्यावर झिंग्यांची निर्यात मोठ्या प्रमाणावर केली जाते. झिंग्यांची दरवर्षी जितक्या प्रमाणात पैदास होते त्यापेक्षा अधिक प्रमाणात झिंगे पकडून निर्यात केले जातात. शिवाय त्यांची पैदास ज्या सागरतळाशी होते तो सागरतळ मोठमोठ्या मच्छीमारी बोटींनी जणू खरवडून काढला जातो. परिणामी आर्थिक पैदाशीचे प्रमाणही कमी होणे स्वाभाविकपणे घडते. नद्यांच्या मुखाजवळील क्षेत्रात बांध घालून समुद्राचे खारे पाणी थोपवून धरले जाते, झिंगे पकडणे सोयीचे जावे म्हणून. पण त्यामुळे किनारपट्टीवरील विहिरींचे पाणी खारवले जाते. भारतातून जपानला मोठ्या प्रमाणावर लोखंड व मँगनीज खनिज स्वरूपात निर्यात केले जाते. इराणला लोखंडाची निर्यात करण्याच्या हेतूने कर्नाटकात कुद्रेमुख येथे मोठा प्रकल्प सुरू करण्यात आला. त्यातून आर्थिक लाभ तर झाला नाहीच, परंतु पर्यावरणाचे मात्र नुकसान झाले. या प्रकल्पामुळे भद्र तलावातील पाण्याचे क्षारीकरण झाले, मंगलोर बंदरातील प्रदूषण वाढले व आजपर्यंत ते जंगल सुरक्षित राहिले होते त्यात मोठ्या प्रमाणावर जंगलतोड झाली.

### टाकाऊ पदार्थांचे उकिरडे

नेमकेपणाने सांगावयाचे झाल्यास मनुष्य त्याच्या विविध कार्यकलापांसाठी अक्षरशः जिनसांचे किंवा ऊर्जेचे सेवन करतो असे नाही. तर तो उपयुक्त पदार्थ किंवा ऊर्जा यांचा

उपभोग घेतो व त्यांचे परिवर्तन कमी उपयुक्त अशा रूपांमध्ये करतो. पुष्कळदा तर ही परिवर्तित रूपे अत्यंत हानिकारक असलेल्या टाकाऊ अशा पदार्थांची असतात. उपयुक्त संसाधने ही विकासाच्या केंद्राकडे अविकसित विभागातून प्रवाहित होतात, तर टाकाऊ पदार्थ मात्र विकासाच्या केंद्राकडून अविकसित विभागाकडे लोटले जातात. बंगलोर शहराकडे धान्य, भाजीपाला, मासे व फळे ह्यांचा ओघ वाहतो तर बंगलोर शहराचे सर्व सांडपाणी उपनद्यांद्वारे कावेरीच्या पात्रात जाते. शेतीतील उत्पादनाची उच्च पातळी कायम राखण्यासाठी जमिनीतील कमी झालेला कस पोषणद्रव्यांच्या पुरवठ्याने भरून काढावा लागतो. त्यासाठी जमिनीला जी अन्नद्रव्ये लागतात त्यांचे उत्पादन आज उर्वरकांच्या कारखान्यांत होते. आपल्या देशातील अनेक भागांत ह्या कारखान्यांतील टाकाऊ पदार्थ नद्यांमध्ये किंवा समुद्रात सोडले जातात. गोव्यातील झुआरी अ‍ॅग्रो-केमिकल्सचा खत-कारखाना हा बंगलोर शहराला तसा सर्वांत जवळचा. ह्या कारखान्याचे सांडपाणी समुद्रात सोडल्याने मासेमारीवर त्याचा वाईट परिणाम झाल्याची आशंका व्यक्त करण्यात आली होती व त्यामुळे काही काळ हा कारखाना बंद ठेवावा लागला होता. मगच सांडपाणी शुद्ध करण्याची योग्य ती व्यवस्था केली गेली ही गोष्ट येथे नमूद करण्यासारखी आहे. त्याचप्रमाणे प्रगत औद्योगिक देश देखील शक्य असेल तेव्हा त्यांच्या देशातील टाकाऊ पदार्थ अन्य ठिकाणी नेऊन सोडण्याचा प्रयत्न करतात. ह्याचे सर्वात ठळक उदाहरण म्हणजे किरणोत्सर्गी आण्विक टाकाऊ पदार्थांचे होय. अमेरिकेतील कोणतेही राज्य आता त्यांचा स्वीकार करायला तयार नाही. त्यामुळे चीनसारख्या देशांनी त्यांच्या मांचुरियाच्या वाळवंटी प्रदेशासारख्या एखाद्या प्रदेशात हा टाकाऊ पदार्थ पैसे घेऊन टाकण्याचे मान्य करावे म्हणून हालचाली सुरू आहेत. तसेच विषारी टाकाऊ पदार्थांनी भरलेली जहाजे तिसऱ्या जगातील देशांनजीकच्या सागरात असे पदार्थ नेहमीच टाकत असतात असा बोलवा आहे.

### लाभधारकांनाच अर्थसाहाय्याची बक्षिसी

समाजातील वरिष्ठ सत्तावान वर्गांकडे संसाधनांचा ओघ वळविला जातो व त्यांनी बाहेर टाकलेल्या टाकाऊ पदार्थांचा प्रवाह अंतर्भागातील दरिद्री जनविभागांकडे गोळा होतो; इतकेच नाही तर या लाभधारकांना वर अर्थसहाय्याची (सबसिडी) बक्षिसी पण दिली जावी हे ओघानेच येते. उदा. बंगलोर शहराला होणारा पाणीपुरवठा हा ३० किलोमीटर अंतरावरील कावेरी नदीचे पाणी २०० मीटर्सपर्यंत वर उचलून केला जातो. हे करण्यासाठी जो विजेचा खर्च येतो त्याच्या १/१० इतकी किंमत बंगलोरवासीयांना त्या पाण्यासाठी मोजावी लागते. त्यातच ह्यासाठी पुरविली जाणारी वीज ही सवलतीच्या दराने म्हणजे युनिटला ६५ पैसेप्रमाणे दिली जाते. जर योग्य दराने विजेचा खर्च हिशेबात घेतला तर ही सवलत १:२५ या प्रमाणात असल्याचे दिसून येईल. ह्याच्या जोडीला पंपिंग स्टेशन, जलवाहिका, जलशुद्धीकरण संयंत्र, त्याची देखभाल, ती करणाऱ्या कर्मचाऱ्यांचे वेतन इ. विचारात घेतले तर ही सवलत १:५० या प्रमाणाइतकी प्रत्यक्षात निघेल. बंगलोरमध्ये अनेक वेळा चर्चेच्या ओघात ग्रामीण भागातील वीजपंपांना सवलतीच्या दराने वीजपुरवठा कसा होतो आणि ग्रामीण भागातील लोकांना जळाऊ लाकूड सवलतीच्या दराने कसे पुरविले जाते ह्याचा उल्लेख होत असतो. परंतु वरीलप्रमाणे बंगलोरवासियांना पाणी किती सवलतीच्या दराने मिळते ह्याचा उल्लेखही कधी होताना दिसत नाही.

वनाधारित उद्योगधंद्यांना वनांपासून मिळणाऱ्या कच्च्या मालावरील सवलत तर ह्याहून कितीतरी अधिक असते. ग्रामीण भागातील लोकांना बांबूचे अनेक उपयोग असतात. घरे बांधण्यासाठी, सुपे-टोपल्या बनविण्यासाठी, शेतीची छोटीमोठी अवजारे बनविण्यासाठी, त्याचप्रमाणे बांबूचे कोवळे कोंब अन्न म्हणून व उन्हाळ्यात गुरांना चारा म्हणून बांबूचा उपयोग होतो. १८६० सालापासून उत्तरकन्नड जिल्ह्यातील लोकांकडून प्रतिटन बांबूसाठी ५ रु. वसूल करण्याला वनविभागाने सुरुवात केली. नंतरच्या काळात पिकांमधून तण काढून टाकावे त्या पद्धतीने बांबू जंगलांमधून नष्ट करण्याचे प्रयत्न झाले. या हेतूने भद्रावतीच्या विश्वेश्वरैय्या पोलाद कारखान्याला जळण म्हणून बांबू विनामूल्य देण्यात येऊ लागला. १९६० पर्यंत बांबूचा बाजारभाव ३००० रु. प्रतिटनच्या आसपास झाला. त्या वेळी वेस्ट कोस्ट पेपरमिलला मात्र हाच बांबू प्रतिटन ३ रु. भावाने विकला जात असे. म्हणजे हजारपट सवलतीच्या दराने हा बांबू कारखान्याला विकला जात होता. आजमितीला बांबूचा बाजारभाव टनाला ६००० रु. हून अधिक असताना तो कारखान्यांना मात्र ३०० ते ६०० रु. प्रतिटनाप्रमाणे विकला जातो.








शहरी-औद्योगिक विभागाला अशा प्रकारे सवलतीच्या दराने संसाधनांचा वापर करायला मिळत असतानाच त्या विभागाला वातावरणाचे व पाण्याचे प्रदूषण करून संपूर्ण समाजाला त्याचे दुष्परिणाम भोगायला लावण्याची अनुमतीच दिल्यासारखी परिस्थिती आहे. हरिहर पॉलिफायबर्स या कारखान्यामुळे तुंगभद्रा नदीच्या पाण्याचे जे प्रदूषण होते त्याविरुद्ध शेतकऱ्यांनी व मच्छीमारांनी आवाज उठविला. आता ह्या प्रश्नाची सरळ सोडवणूक करायची असेल तर ह्या कारखान्याच्या व कारखान्यातील कर्मचाऱ्यांच्या वसाहतीच्या वरच्या अंगाला नदीच्या पात्रात कारखान्याने आपले सांडपाणी सोडावे अशी सक्ती करावयास हवी. म्हणजे पात्राच्या त्या भागातील पाणीच कारखान्याला व कर्मचाऱ्यांना घ्यावे लागणार असल्याने आपोआपच कारखान्याला सांडपाण्याचे शुद्धीकरण करून मगच ते पाणी नदीत सोडण्याची उपाययोजना करण्याची सद्‌बुद्धी होईल; एरवी नाही. परंतु ह्या साध्यासरळ उपाययोजनेचा विचारही कधी गंभीरपणे झाला नाही.

ह्याचा स्वाभाविक परिणाम असा होतो की सवलती तेवढ्या पदरात पाडून घ्यावयाच्या, भोगायला लावायच्या. ह्या सोयीमुळे त्यापासून लाभान्वित होणाऱ्यांना अधिकाधिक संसाधने स्वतःपाशी गोळा करता येतात. त्यातूनच स्वतःचा राजकीय व आर्थिक प्रभाव वाढवत नेऊन पुन्हा अधिक सवलती पदरात पाडून घेता येतात.

### संसाधनांचा उधळमाधळ वापर करण्यास प्रोत्साहन

'ज्यांच्या हाती सत्ता आहे त्यांच्यावर संसाधनांचा वापर काळजीपूर्वक करण्याची सक्ती तर नाहीच; पण त्यांना हेतुपूर्वक ह्या संसाधनांचा उधळमाधळ पद्धतीने वापर करण्याचा मोह व्हावा अशी स्थिती आहे. बंगलोरचा पाणीपुरवठा हे त्याचे पुनः एक उदाहरण आहे. पाण्याची साठवणूक पर्याप्त नसतानाही पावसाळ्यात व हिवाळ्यात अतिरिक्त पाणीपुरवठा केला जातो व त्यामुळे नंतरच्या उन्हाळ्याच्या दिवसांत पाण्याची समस्या गंभीर रूप धारण करते. मग सरकारकडून शहरात विंधनविहिरी काढण्यास सुरुवात होते. विंधनविहिरी काढण्याचा व्यवसाय हा पाण्याचे व्यवस्थापन बघणाऱ्यांच्या फायद्याचा असतो. त्यामुळे ज्या वेळी भरपूर पाणी उपलब्ध होते त्या काळात त्याची उधळपट्टी होऊ देण्यात त्यांचे कोणतेही नुकसान नसते.

### संसाधने क्रमशः संपुष्टात येणे

अशा प्रकारे समाजाची रचनाच अशी झाली आहे की, संसाधनांचा वापर कशा रीतीने व्हावा यावर ज्यांचा निर्णायक प्रभाव असतो, त्यांचे संसाधनांचा सांभाळ होण्याच्या दृष्टीने वापर न झाल्यामुळे नुकसान तर होत नाहीच; उलट त्यापासून त्यांचा बहुधा फायदाच होतो. ह्याचा परिणाम व्हायचा तोच होतो. संसाधनांचा वापर ती संसाधने संपुष्टात येतील अशा पद्धतीनेच होतो. ह्याची लक्षणे आपल्या देशात प्रत्येक क्षेत्रात आढळून येतात. आता कोणतीही गरज भागवायची असेल तर ती अनेक प्रकारांनी व अनेक प्रकारची संसाधने वापरून भागविता येते हे उघड आहे. संसाधनांच्या वापरासाठी किती पैसा मोजावा लागणार आहे एवढा एकच निकष मानला तर सर्वात जवळचे अथवा सोईचे अथवा वरकरणी स्वस्त असे संसाधन पूर्णपणे वापरून टाकण्याकडे अर्थातच कल होईल. किती पैसा मोजावा लागतो यापेक्षा संसाधनांचा चिरस्थायी वापर करावा लागतो ही मर्यादा जर मानली तर केवळ कोणते साधन सोईचे, जवळचे व स्वस्तात उपलब्ध आहे ही एकच कसोटी पुरेशी ठरणार नाही. परंतु संसाधनांचा चिरस्थायी वापर करण्याचे कोणतेही दडपण आज नसल्याने समाजातील वरीष्ठवर्ग त्या त्या वेळची आपली सोय तेवढी पाहात असतात. उदाहरणार्थ, अर्कावती ही नदी बंगलोरवासियांसाठी कावेरीपेक्षा कमी अंतरावर असल्याने तोवर अर्कावतीचे पाणी पुरेसे आहे तोपर्यंत कावेरीपेक्षा अर्कावतीचेच पाणी वापरणे अधिक आकर्षक वाटते. किंवा प्लायवुडचे उदाहरण घ्यायचे झाले तर आंब्याची मोठाली झाडे प्लायवूडमध्ये कमी खर्चात रूपांतरित होऊ शकतात; मग निलगिरीच्या बारीक बुंध्यापासूनही प्लायवूड तयार करण्याचे तंत्रज्ञान उपलब्ध असूनही आंब्याचाच वापर प्लायवूडसाठी करणे फायद्याचे असते. जर संसाधनांचा सांभाळ करीत करीत त्यांचा वापर करण्याची दृष्टीच नसेल तर ती संसाधने संपुष्टात येण्याचाही एक विशिष्ट क्रम असतो. संकुचित आर्थिक दृष्टीने ज्यांचा वापर आधी केला जातो व ती साधने एकदा संपुष्टात आली की मगच त्याहून कमी लाभधारक साधनांकडे मोर्चा वळवला जातो.

असा प्रकार आपणाला सर्वत्रच आढळतो. भारतातील अनेक भागांत जमिनीखाली असणाऱ्या पाण्याच्या साठ्यात जी काही भर पडत असेल त्यापेक्षा अधिक पाण्याचा उपसा सर्रास केला जातो. त्यामुळे पाण्याची पातळी खाली जाते



अनुक्रमणिका

आहे. यावर उपाय म्हणून सर्वसाधारणपणे विहिरी अधिक खोल खणणे आणि खोल विंधनविहिरी घेणे हीच उपाययोजना केली जाते. त्यामुळे पुढेपुढे कमीकमी जमीनधारकांना पाणी मिळू लागले. ज्या विभागांमध्ये सघनपद्धतीने शेती केली जाते तेथे जमिनीत निसर्गतःच असलेल्या अन्नद्रव्याचा जास्त वापर तर होतो; परंतु त्यांची भरपाई होत नाही. जमिनीतील अन्नद्रव्ये संपुष्टात येण्याचाही एक विशिष्ट क्रम लक्षात येतो. तो असा : नत्र-स्फुरद-बोरन-मॉलिब्डेनम-वगैरे

वनाधारित उद्योगांमध्ये तर अशा प्रकारच्या क्रमिक पद्धतीने होणाऱ्या संसाधनांची क्षती ठळकपणे लक्षात येते. कर्नाटकच्या उत्तर कन्नड जिल्ह्यातील प्लायवूड उद्योगाचेच उदाहरण घ्यायचे तर असे दिसते की सुरुवातीला जेथे सहज पोचता येई अशा पानगळीच्या जंगलातील ३९ प्रकारच्या झाडांची तोड प्लायवूडसाठी केली जात असे. पुढे पुढे झाडांच्या प्रकारांत भर पडून त्यांची संख्या ६१ झाली. पश्चिम घाटातील दुर्गम अशा जंगलातून ती तोडून आणावी लागू लागली. त्याचबरोबर कमी घेर असलेल्या झाडांचीही निवड नंतर नंतर करावी लागली. तरीही लाकूड अपुरे पडू लागल्याने आता प्लायवूडउद्योगाने आपला मोर्चा अंदमान-निकोबार बेटांकडे वळविला आहे. आणि तेथेही पूर्वीच्याच क्रमाची पुनरावृत्ती होत आहे. अखेर, प्लायवूड उद्योगाला जास्त खर्चिक तंत्राचा वापर करून निलगिरीच्या झाडापासून प्लायवूड तयार करावे लागलेच. परंतु जोपर्यंत फाजील स्वस्त दराने नैसर्गिक लाकूड त्यासाठी उपलब्ध आहे तोपर्यंत हे नवे तंत्रज्ञान वापरले जाणार नाही.

### जैविक विविधतेचा ऱ्हास

उपरोक्त पद्धतीने संसाधनांचा वापर होण्यामुळे घडून येणाऱ्या परिणामांचा विचार चार ढोबळ प्रकारांमध्ये करता येण्यासारखा आहे. पहिल्या प्रकारात जीवशास्त्रीय विविधता नष्ट होणे हा परिणाम येतो. संकुचित आर्थिक दृष्टीने जास्त लाभदायक ठरू शकणाऱ्या संसाधनांचा वापर करण्यावरच लक्ष केंद्रित झाल्याने हा परिणाम घडून येतो. उदा. ब्रिटिशांना भारतीय द्वीपकल्पातील जंगलामधील फक्त सागवानी लाकडामध्ये रस होता. सुरवातीच्या काळात जहाजे बांधण्यासाठी त्यांना सागवानी लाकूड तेवढे हवे होते. अनेकानेक जातींचे वृक्ष, वेली, इतर वनस्पती असलेल्या जंगलांचे रूपांतर क्रमशः एका सागाच्या झाडाच्या जंगलामध्ये करणे हे वनखात्याने आपले व्यवस्थापकीय उद्दिष्ट बनविले. यापोटी अतिपावसाच्या व डोंगरउतारावरील जमिनीवर देखील सागवानाची लागवड करण्याचे अयशस्वी प्रयोग केले. ह्या उलट स्थानिक आदिवासी व गावकरी त्यांच्या अनेक प्रकारच्या गरजांसाठी विविध जातींच्या झाडांवर अवलंबून होते. त्यामुळे ज्या वेळी अशा बहुविध वृक्ष असलेल्या वनांचे रूपांतर एकजातीय सागवानी वनांमध्ये होऊ लागले त्यावेळी त्यांनी ह्याला विरोध केला. आम्ही केलेल्या उत्तर कन्नड जिल्ह्याच्या अभ्यासात असे आढळून आले की, स्थानिक गावकरी निरनिराळ्या ६५ जातींच्या झाडांचा उपयोग वेगवेगळ्या विवक्षित कारणांसाठी करतात. विशिष्ट कामासाठी विशिष्ट जातीचेच लाकूड त्यांना हवे असते. काही जातींच्या झाडांचा उपयोग केवळ जळण म्हणून तर काहींचा वापर वेगवेगळ्या ऋतूंमध्ये जनावरांसाठी चारा म्हणून केला जातो काहींच्या पानांचा वापर खतासाठी केला जातो कर काहींचा पिकावरील कीड मारण्यासाठी वापर केला जातो; काही विशिष्ट प्रकारच्या लाकडाचा वापर बैलगाडीचे चाक तयार करण्यासाठी केला जातो तर काहींचा वापर लाकूड मऊ असल्याने शोभिवंत वस्तू ह्यातून कोरून काढण्यासाठी केला जातो. पण १९५० पर्यंत केवळ व्यापारी दृष्टीने झपाटलेल्या वनविभागाच्या मनात सागवान जातीच्या झाडापेक्षा इतर प्रकारच्या झाडांचा विचारही नव्हता. त्यानंतर निलगिरीच्या झाडांची लागवड करण्याचा विचार होऊ लागला. या धोरणामुळे झाडाच्या अनेक जातीच्या जाती, त्यांना मागणी नाही असे गृहीत धरून उद्योगांना मुक्तपणे तोडण्यासाठी बहाल केल्या. उदा. शेकडो रुपये किमतीचे 'अपीमिडी' लोणचे घालता येईल इतक्या कैऱ्या दरवर्षी देणारी जंगली आंब्याची महाकाय झाडे प्लायवूड तयार करण्यासाठी सर्रास तोडली गेली; तेही सबंध झाडाची किंमत शंभर रुपयापेक्षाही कमी आकारून. जी जंगले परंपरेने पवित्र मानली गेल्याने टिकून होती त्यांतूनही लाकूड तोडण्याला वनविभागाने प्रारंभ केला. (इतरत्र अशा प्रकारची जंगले संपुष्टात येऊ लागलेलीच होती) अशा प्रकारच्या पवित्र जंगलातील लाकूड तोडण्याला निमित्त हवे म्हणून त्यांतील झाडांची वर्गवारी 'अतिपक्व' म्हणून तोडण्यायोग्य अशी करून ती झाडे तोडण्यात आली.

आपल्या कृषिविकासात देखील मुख्य भर अधिक उत्पन्न देणाऱ्या संकरित जातींच्या धान्याची पैदास वाढविण्यावरच








आहे. ज्या विविध जातींची पैदास हे शेतकरी जमिनीच्या मगदुराप्रमाणे करीत असत, त्यांची जागा आता ह्या वेचक संकरित जातींनी घेतल्यामुळे कमालीचे अनुवंशिक वैविध्य नष्ट झाले आहे. अनुवंशिक विविधता हे वास्तविक फार मोठें सामर्थ्यस्थळ आपल्या शेतीचे म्हणावयास हवे. त्यावरच कुठाराघात झालेला आहे. शिवाय संमिश्र पीक म्हणून घेतली जाणारी डाळी व इतर पिकेही प्रसारातून कमी होत आहेत. ह्याचा परिणाम असा झालेला आहे की गहू, ज्वारी, भुईमूग, निलगिरी अशा काही थोडक्याच पिकांची एकपिकी पद्धतीने लागवड वाढत आहे. गाजरगवत व बुंदार जातींच्या वनस्पतींनी कमी पावसाच्या प्रदेशातील कितीतरी मोठी पडजमीन व्यापून टाकलेली आढळते. पाणथळ जमिनींवर 'बेशरम' नावाची दाट झुडपे वाढताहेत तर तळ्यांमध्ये जलपर्णी ही वनस्पती माजून जलचरजीवन घुसमटून जात आहे.

### पुनर्निर्मितीक्षम संसाधनांची क्षती

विविधता नष्ट होण्याव्यतिरिक्त नैसर्गिक जैविक पदार्थांचे उत्पादन संसाधनांच्या अतिवापरामुळे विलक्षण वेगाने कमी होत आहे. प्लायवूड उद्योगाला प्रिय असलेली महाकाय झाडे पश्चिम घाटाच्या उतारावरील जंगलातून नष्ट होत आहेत. हिमालयाच्या पायथ्याच्या डोंगराळ प्रदेशातील स्थानिक शेतकऱ्यांना सांझ जातीच्या ओक वृक्षाचा अनेकविध उपयोग होतो. पण व्यापारी लाकूड म्हणून त्यांची किंमत वनखात्याच्या लेखी नगण्य असल्याने त्यांची अशीच बेसुमार तोड होत आहे. सागरकिनाऱ्याजवळील मच्छीमारीचे प्रमाण अतिशय वाढल्याने त्या व्यवसायावर त्याचे दुष्परिणाम दिसून येऊ लागले आहेत. शेतजमिनीचा पोत व नैसर्गिक सुपीकता नष्ट होत आहे. जमिनीखालील जलसाठ्यांची पातळी अधिक खोलवर जात आहे.

### शहरांमध्ये कचरा, टाकाऊ पदार्थांची वाढती रास

ज्या परिसरातून होणाऱ्या नैसर्गिक संसाधनांच्या पुरवठ्यावर नागरी केंद्राचे जीवन अवलंबून असते, तेथील नैसर्गिक साधनांचा पायाच उखडून टाकला जात आहे. तर नागरी केंद्रात मात्र बाहेरून येणाऱ्या सर्व पदार्थांच्या वापरामधून तयार होणाऱ्या टाकाऊ वस्तूंच्या मुळे एक प्रकारे शहरे गुदमरू लागली आहेत. ह्यात सांडपाण्यापासून ते मोटारीमधून निघणाऱ्या धुरापर्यंत सर्व गोष्टींचा समावेश होतो. ह्या गोष्टी शहरांमध्ये साठत जात असल्या तरी त्यांची वाढ रोखण्याबाबत किंवा त्यांपासून मानवी आरोग्यावर होणाऱ्या दुष्परिणामाबाबत काही परिणामकारक उपाययोजना होताना दिसत नाहीत.

### जीवावरणाचे प्रदूषण

याखेरीज इतर सर्व प्रकारच्या विषारी पदार्थांची निर्मिती एक तर जंतुनाशकांसारख्या मुख्य उत्पादनाच्या रूपाने किंवा औद्योगिक टाकाऊ पदार्थांसारख्या (Industrial Effluents) उप-उत्पादनाच्या रूपाने करीत आहोत. आजवर ह्या विषारी पदार्थांची विल्हेवाट लावण्याच्या दृष्टीने फारच थोडे प्रयत्न झाले आहेत. भारतीय मातांच्या स्तनांतील दुधात डी.डी.टी. चे प्रमाण सुरक्षितमर्यादेपेक्षा कितीतरी अधिक असल्याचे सांगितले जाते.

### संसाधनांचा समुचित वापर

आपल्यापुढील आपत्ती आहे ती अशी की, संसाधनांचा शहाणपणाने व त्यांचा सांभाळ होण्याच्या पद्धतीने होणारा वापर हा येथील अभिजन वर्गाच्या दृष्टीने ताबडतोब फायद्याचा नसल्याने तसा तो होण्याची शक्यता नाही. तरीदेखील तसा वापर होणे हे येथील जनतेच्या दीर्घकालीन हिताचे आहे असे निश्चितपणे म्हणावयास हवे, आणि ह्याचे कारण असे की, आपल्या जनतेचे कल्याण हे स्थानिक पर्यावरणाच्या स्वास्थ्याशी घनिष्टतेने निगडित आहे. विहिरींच्या पाण्याची पातळी खाली गेली तर जनतेला त्याचे दुष्परिणाम भोगावे लागतात किंवा परिसरात जळणासाठी लाकूडफाटा मिळेनासा झाला तरीदेखील त्यांना हाल सहन करावे लागतात. त्यांच्यासाठी उपलब्ध असलेल्या जलस्रोतांचे प्रदूषण झाले तर त्यांच्या जनावरांना पिण्याला पाणी मिळू शकत नाही किंवा अधेमधे प्रोटीनयुक्त असा मत्स्याहार घेणेही त्यांना शक्य होत नाही. कळकाची (बांबूची) बेटे लुप्त झाली की त्यांना बांधकामासाठी बांबू मिळेनासा होतो. श्रीमंत शेतकऱ्यांप्रमाणे त्यांना खोल अशा विंधनविहिरीही काढता येत नाहीत किंवा त्यांच्याप्रमाणे त्यांना अन्न शिजवण्यासाठी गोबर गॅसही मिळू शकत नाही. शहरवासीयांप्रमाणे त्यांना नळांद्वारे गाळलेले पाणीही मिळू शकत नाही किंवा सिमेंट कॉंक्रीटची घरेही बांधता येत नाहीत. नजीकच्या भविष्यकाळात हे त्यांचे अवलंबित्व असेच कायम

राहणार असल्याने आपल्या देशातील नैसर्गिक साधनांचे दोहन काळजीपूर्वक होण्यासाठी अत्यंत महत्त्वाची अशी प्रेरणा तेथूनच यावयास हवी. विकासविषयक धोरणावर ज्यावेळी आपल्या सामान्य जनांच्या दीर्घकालीन हितसंबंधांचा निर्णायक प्रभाव निर्माण होईल त्याच वेळी समाजाचा रोख साधनांचा चिरस्थायी स्वरूपात उपयोग करण्याच्या दिशेने वळू लागेल. हे घडावे अशी अपेक्षा आपल्यासारख्या लोकशाही व समताधिष्ठित मूल्य मानणाऱ्या राज्यात बाळगता येते. ही अपेक्षा वस्तुस्थितीत कशी उतरेल हाच खरा प्रश्न आहे.

### नव्या विकासधारणेकडे

ज्यामुळे एकाच वेळी पुढील चार उद्दिष्टे साध्य होतील अशा विकासनीतीची आज आपल्याला गरज आहे, ती उद्दिष्टे अशी :

अ. स्थानिकसमुदायांना त्यांचे भवितव्य ठरविण्याचे अधिकार संपादन करून देणे.

ब. सामाजिक क्षमता वाढविणे.

क. आर्थिक दृष्टीने कार्यक्षम बनणे.

ड. पर्यावरणाच्या दृष्टीने चिरस्थायी विकासनीती अवलंबणे.

आमचा असा विश्वास आहे की, चारही उद्दिष्टे एकमेकांशी सुसंगत अशीच असून ज्यांचे कल्याण स्थानिक संसाधनांचे संरक्षण होण्याशी निगडित आहे अशा सामान्य जनतेच्या दीर्घकालीन हितसंबंधांची हमी ह्या चतुर्विध उद्दिष्ट-पूर्ततेतून मिळू शकेल. तसेच त्यातून पर्यावरणाचे उत्तम प्रकारे व्यवस्थापनदेखील साध्य होऊ शकेल. ह्या ढोबळ अशा तत्त्वाची परिणती विवक्षित कृतींमध्ये कशी करायची हा आपल्यापुढील प्रश्न आहे.

### पूर्ण किंमत मोजावी लागावी

अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे आपण सर्व प्रकारचे खुल्या अथवा प्रछन्न रूपातील अर्थसाहाय्य (सबसिडी) बंद केले पाहिजे; कारण या साहाय्यामुळे दीर्घ दृष्टीच्या अभावी, संसाधनांचा विनाश घडवून आणण्याच्या पद्धतीने त्यांना वापर होण्याला प्रोत्साहन मिळते. शिवाय वर म्हटल्याप्रमाणे ह्या सवलती खरे म्हणजे ज्यांना ह्या सवलतींची वास्तविकपणे गरजही नाही अशा शहरी-औद्योगिक विभागाला भरपूर प्रमाणात दिल्या जाताहेत. शहरी औद्योगिक विभागाला मिळणाऱ्या सवलतींचा दुसरा एक प्रकार म्हणजे शहरी व ग्रामीण भागांसाठी असणारी वेतनाची दुहेरी प्रमाणपद्धती. अर्थात ह्या वादाच्या खोल पाण्यात उतरणे ह्या टिपणाच्या कक्षेत बसणारे नसल्याने हा मुद्दा तूर्त तेथेच सोडलेला बरा.

### एकूण नैसर्गिक उत्पादनात वृद्धी

केवळ पैशाच्या रूपात मिळणाऱ्या उत्पन्नावर - व म्हणून ज्या वस्तू खरेदीविक्रीच्या व्यवहारात येतात त्यांच्यावरच - आपले सर्व लक्ष केंद्रित झाल्याने, ग्रामीण जनतेच्या दृष्टीने अत्यधिक महत्त्वाच्या परंतु ज्यांचा समावेश क्रय-विक्रयाच्या व्यवहारात होत नाही अशा संसाधनांची आपण हेळसांड करतो. ह्याच्याच जोडीला ग्रामीण जनतेजवळ असणारी क्रयशक्ती उत्तरोत्तर कमी कमी होत जाते. आर्थिक विकास म्हणजे ग्रामीण जनतेपासून त्यांच्या पर्यावरणातील संसाधने हिरावून घेणे व त्यांचा ओघ शहरी बाजारव्यवस्थेकडे वळविणे असे समीकरणच तयार होत आहे. तेव्हा अशा प्रकारच्या विनाशकारी विकास-नीतीचा त्याग करून आपले लक्ष ग्रामीण भागातील भूमी व जलसंपत्तीची नैसर्गिक उत्पादकता वाढवून, त्याद्वारे स्थानिक लोकांना रोजगार पुरविणे व त्यांच्या उपभोगासाठी संसाधने निर्माण करणे ह्यावर केंद्रित केले पाहिजे. ह्या मार्गाने स्थानिक जनतेच्या किमान गरजांची पूर्तता झाल्यावरच शिल्लक उरणाऱ्या संसाधनांची शहरांकडे निर्यात करण्याचा विचार मनात आणला पाहिजे. त्यासाठी सध्या 'एकूण राष्ट्रीय उत्पन्न' (ग्रॉस नॅशनल प्रॉडक्ट) वाढविण्याच्या संकल्पनेची जागा 'एकूण नैसर्गिक उत्पन्न' (ग्रॉस नॅचरल प्रॉडक्ट) वाढविण्याच्या संकल्पनेने घ्यावी लागेल.

### सत्तेचे विकेंद्रीकरण

येथे आपल्याला अभिप्रेत असलेल्या विकास धोरणाच्या अनुषंगाने विचार करावयाचा झाल्यास त्यासाठी स्थानिक लोकांच्या जीवनाला स्पर्श करणाऱ्या सर्व बाबींमध्ये त्यांचा परिणामकारक रीतीने होणारा सहभाग आवश्यक ठरतो. आणि ते साध्य होण्यासाठी जिल्ह्याला, मंडळांना व ग्राम-समुदायांना खऱ्या अर्थाने निर्णय घेण्याचे व त्यांची अंमलबजावणी करण्याचे अधिकार त्यांचे त्यांना देऊन त्यांचे बळ वाढविले पाहिजे. कर्नाटक व पश्चिम बंगाल ह्या राज्यांनी मंडल-पंचायतींचा






जो प्रयोग करून पाहिला, त्याच्याकडे ह्या दृष्टीने एक नमुना म्हणून पाहता येणे शक्य आहे.

### गावसमुदायाधिष्ठित व्यवस्थापन

पूर्वी आपल्याकडे ज्यावर सर्व गावाची मालकी असायची अशा संसाधनांचे व्यवस्थापन गावकरी सामुदायिक पद्धतीने करीत. ती पद्धती पुनः रूढ करणे हा आपली नैसर्गिक संसाधने शहाणपणाने वापरली जाण्याच्या दृष्टीने एक महत्त्वाचा उपाय ठरू शकतो. ब्रिटिशपूर्व काळात आपल्याकडे ही पद्धती होती. ब्रिटिशांनी सामुदायिक नियंत्रणाचे तत्त्वच नाकारून ही व्यवस्था नष्ट केली. संसाधनांवरील अधिकार काढून घेऊन काही विशेष हक्क तेवढे त्यांनी मान्य केले. पूर्वी पाणी व जमीन ह्यांचे व्यवस्थापन ग्रामसमुदाय उत्तम प्रकारे करीत असे; परंतु ब्रिटिशांनी जमीन व पाण्याचे व्यवस्थापन करण्याचा अधिकार नाकारल्याने ही संसाधने 'नो मॅन्स लँड' प्रमाणे ठरली. मग सर्वांनी त्यांचा जमेल तसा दुरुपयोग केला. असे असले तरी, अजूनही काही दुर्गम डोंगरी भागातील जंगलांचे वनपंचायतींद्वारे होणारे सुयोग्य व्यवस्थापन अथवा लहान तळ्यातील पाणी सामुदायिक पद्धतीने वाटून घेण्याची पद्धत सानुदायिक मालकीच्या संसाधनांचा वापर कसा करावा ह्याची उदाहरणे म्हणून दाखविता येण्याइतपत टिकून आहेत. आजमितीला गरज कशाची असेल तर बदललेल्या परिस्थितीच्या संदर्भात पूर्वीची सामाजिक उतरंड व वाढत्या लोकसंख्येचा रेटा नष्ट करून योग्य स्वरूपात स्थानिक संसाधनांच्या सामूहिक व्यवस्थापन पद्धतीचे पुनरुज्जीवन करण्याची. संसाधनांचा वापर व त्यावरील नियंत्रण ह्यांच्यात पुन्हा संबंध प्रस्थापित करणे ह्याला कळीचे महत्त्व आहे.

शेवटी सांगायचे तर, निसर्गाची जोपासना करण्याची आपली परंपरा आहेच, तिचा सांधा आधुनिक काळी होत असलेल्या तत्संबंधी प्रयत्नांशी जोडणे व संपूर्ण देशात अशा प्रकारच्या संरक्षित निसर्गसृष्टीची क्षेत्रे (कॉन्झर्वेशन एरियाज) जाळे तयार करणे ह्या दृष्टीने आपण खटपट केली पाहिजे. उदा. सामुदायिक मालकीची जंगले किंवा कुरणे असतील तर त्यांचा काही भाग (५ टक्के हे प्रमाण सुचविता येईल) नैसर्गिक पद्धतीने त्यांची वाढ होण्यासाठी म्हणून राखून ठेवता येईल. अशा पद्धतीने पवित्रजंगले राखण्याची आपली परंपरा देखील आहेच. त्याच धर्तीवर हे करता येईल. त्याचप्रमाणे जलौघाच्या लांबीपैकी काही लांबीचा प्रवाह, काही तळी, व सरोवरे अशा प्रकारे राखून ठेवता येतील. आपले अंतिम उद्दिष्ट हे देशाच्या एकूण पृष्ठभागापैकी ५ टक्के पृष्ठभाग हा अशा प्रकारच्या नैसर्गिक वाढीसाठी संरक्षित ठेवणे हे असावयास हवे. परंतु सध्या ज्याप्रमाणे प्रचंड भूपट्टे राष्ट्रीय उद्यानांच्या नावाखाली राखून ठेवले जातात, त्यामधून लोकांची हकालपट्टी होते व त्यांना त्यापासून दूर ठेवले जाते त्याप्रमाणे हे होता कामा नये. तर सर्व लोकांना जेथे प्रवेश असेल अशा नैसर्गिक सजीव समुदायांच्या रूपाने त्यांचा विकास झाला पाहिजे. परंतु ह्याचा अर्थ राष्ट्रीय उद्याने नष्ट करावीत असा मात्र होऊ नये. राष्ट्रीय उद्यानेही असावीत, पण त्यांच्या व्यवस्थापनाला स्थानिक विभागातील पर्यावरणाचा विकास करण्याच्या प्रयत्नांची प्रभावी पद्धतीने जोड देण्यात यावी इतकेच.






ईशावास्यमिदम् सर्व
यत्किंच जगत्यां जगत्
तेन त्यक्तेन भुंजीथाः
मा गृधः कस्यस्विद् धनम् ।।
- ईशावास्य

जगात जे काही जीवन आहे, ते हे सर्व ईश्वराने वसविलेले आहे. म्हणून त्याच्या नावाने त्यागून, तू यथा-प्राप्त भोगीत जा. कोणाच्याही धनाविषयी वासना राखू नकोस.

ग्रंथपरिचय

# गोरगरीब व स्त्रिया यांच्या मुळावर येणारी आधुनिक (कु)विकासाची प्रक्रिया

### वंदना शिवं (समीक्षण : वसंत पळशीकर)

स्त्रियांना मुक्त व्हायचे असेल तर प्रचलित विकासाच्या अजगरी विळख्यातून जगाची सोडवणूक करण्याचे काम सर्वप्रथम करावयास हवे; हे काम करावयाचे तर मानवजातीच्या प्रदीर्घ इतिहासात स्त्रियांनी ज्या मूल्यांची जोपासणूक सातत्याने केली त्या मूल्यांचे अधिष्ठान समाज जीवनास व संस्कृतीस प्राप्त व्हावयास हवे हे वंदना शिव यांचे मध्यवर्ती प्रतिपादन आहे. 'स्टेईंग अलाइव्ह' या पुस्तकाचा विषय 'स्त्रिया, पर्यावरणीय असंतुलन आणि अस्तित्व टिकविण्याचेच भारतात उभे ठाकलेले आव्हान' हा आहे. या पुस्तकात अतिशय उत्कटतेने त्यांनी आपले म्हणणे मांडले आहे. त्यांच्या लेखी हा केवळ थंड डोक्याने व अलिप्तपणे बौद्धिक चर्चा करण्याचा विषय नाही. देशभरच्या अगणित स्त्रियांच्या जीवनमरणाचा प्रश्न आहे.

'आजचे जग हे पुरुषांचे जग आहे; त्यांनी आकार दिलेले आणि त्यांच्या तंत्राने चालणारे, याबद्दल कोणाचे दुमत होऊ नये. स्त्रियांची दडपणूक करण्याचा हेतू बाळगून आपापसांत संगनमत करून पुरुषवर्गाने स्वतःच्या नियंत्रणाखालील जग निर्माण केले असा पुष्कळदा स्त्रीवादी (फेमिनिस्ट) लेखिकांच्या प्रतिपादनाचा रोख असतो. तो मान्य होण्यात अनेक अडचणी आहेत. घराबाहेरचे जग ही पुरुषांची जबाबदारी असावी. त्यांनी त्याची व्यवस्था लावावी, नियंत्रण करावे हा निर्णय जेत्या समाजातल्या स्त्रियांचाही राहिला असेल, त्यात त्यांना स्वतःची सुरक्षा व सोय आढळली असेल ही शक्यता अधिक आहे. राज्याचा विस्तार व राज्याचे संरक्षण करण्यासाठी केल्या जाणाऱ्या व कराव्या लागणाऱ्या लढाया, जित जमातींमधील स्त्रीपुरुषांच्या श्रमाचा वापर करून करावयाची उत्पादनाची व अन्य कामे आणि दूरदूरवर जाऊन, धोका पत्करून व जोखीम उचलून करावयाची व्यापारी देवाणघेवाण या कामांची व्यवस्था पाहण्याचे काम पुरुषांवर टाकण्यात सोय व सुरक्षा दोन्ही वाटण्याची ती भौतिक अवस्था होती. या क्षेत्रांमध्ये स्पर्धा, वर्चस्व, सत्ता (हिंस्र) बळ, या गोष्टींना, तत्त्वांना संघटक तत्त्वे, व्यवहाराची अधिष्ठात्री मूल्ये व ध्येये म्हणून महत्त्व प्राप्त झाले. जीवनव्यवहारांच्या या क्षेत्रांचा व्याप वाढला. त्यांचे महत्त्व व वजन ('वेटेज' या अर्थाने) वाढले. त्याबरोबर पुरुषीपणाशी, पुरुषी कर्तृत्वाशी या तत्त्वांची सांगड कायमची बसल्यासारखी झाली. मग त्याच्या विरोधात स्त्रीची, 'प्रकृती' ची प्रतिमा तयार झाली.

स्त्री व पुरुष यांच्यातील भेद एका जैविक कार्यापुरता आहे की तो त्यापेक्षा खोलवर जाऊन पोचणारा पिंडप्रकृतीभेद आहे, आणि जीवनात ते ज्या भिन्न भूमिका पार पाडीत आले त्यांना या पिंडभेदाचा वास्तविक आधार आहे? हा गुंता संपूर्ण समाधानकारक स्वरूपात व काटेकोरपणे कधी उकलला जाऊ शकेल असे दिसत नाही. बघणाऱ्याची दृष्टी, समज व भूमिका यांनुसार उत्तर दिले जाईल असे दिसते.

पण प्रदीर्घ इतिहासाच्या ओघात व्यवहारात व सांस्कृतिक-बौद्धिक पातळीवर काही रीतीभाती, तत्त्वे, मूल्ये व उद्दिष्टे पुरुषीपणाशी आत्मसात झालेली आहेत तर काही स्त्रीत्वाशी, ही गोष्ट स्वीकारण्यात काही अडचण येऊ नये. या आधारे पुरुषप्रवृत्ती विरुद्ध स्त्रीप्रवृत्ती असा भेद करून मांडणी करणे, चर्चा करणे निश्चितपणे अर्थवाही व उपकारक आहे. स्त्री स्वभावतःच अशी-अशी आहे, स्त्री म्हणजे सृष्टीच्या व्यवहारातील ही-ही तत्त्वे अशी वंदना शिव यांनी केलेली मांडणी काटेकोर तात्त्विक तपासणीत टिकणारी नसली, ती अतिउत्साही, पक्षपाती व भोंगळ आहे असे दाखवून देता येणे शक्य असले, तरी व्यावहारिक-सांस्कृतिक पातळीवर स्त्रीवादी चळवळीला व्यापक अधिष्ठान प्राप्त करून देण्याच्या दृष्टीने ती विशेष उपयोगाची आहे. स्त्रीवादी चळवळ एकाच वेळी स्त्रियांच्या मुक्तीची चळवळ आणि समाजाच्या आमूलाग्र पुनर्रचनेची चळवळ म्हणून यामुळे बांधली जाईल. पुरुषांच्या विरोधात स्त्रियांसाठी अनेकानेक गोष्टी बरोबरीने पदरात








पाहून घेण्यासाठी चाललेली चळवळ अशी तिची मर्यादा न राहता, स्त्रीत्वाच्या आधारे पुरुषांना बरोबर घेऊन सगळ्याच गोष्टींची नव्याने मांडणी करायला निघालेली चळवळ हे स्वरूप तिला प्राप्त होईल.

२

'वुईमेन इन नेचर' या प्रकरणात वंदना शिव यांनी स्त्रीतत्त्वाची त्यांची मांडणी केली आहे. भारतीय तत्त्वज्ञान व संस्कृती यांचा त्यासाठी त्यांनी आधार घेतला आहे. त्यांची मांडणी किती साधार आहे ही गोष्ट तपासून पाहण्यास वेगळ्या प्रकारचा अधिकार हवा. येथे त्यांची मांडणी समजून घेणे हाच मुख्य भाग आहे.

सृजन व संहार, संघटन व विघटन असा अखंड द्वंद्वात्मक व्यवहार सृष्टीत चाललेला आढळतो. या दोन्ही परस्परविरोधी तत्त्वांच्याही अतीत असलेल्या, दोन्ही तत्त्वांना जन्म देणाऱ्या मूळ एकच आदितत्त्वाच्या लीलेमधूनच अपार वैविध्याने नटलेल्या जीवसृष्टीचा उद्‌गम व उत्कर्ष झालेला आहे. त्या लिहितात, (भारतीय परंपरेनुसार) 'जड आणि सचेतन, दोन्ही स्वरूपांतील निसर्ग हा शक्तितत्त्वाचा आविष्कार आहे. शक्ती हे विश्वातले सर्जक स्त्रीतत्त्व आहे. पुरुषतत्त्वाशी संयोग पावून प्रकृती सृष्टीची निर्मिती करते.

पुरुष-प्रकृती या जोडीतल्या 'प्रकृती'शी स्त्रीची एकरूपता प्रतिपादणे, गृहीत धरणे वंदना शिव यांच्याकडून स्वाभाविकपणे घडते. त्या लिहितात,

'भारतीय स्त्रिया या निसर्गसृष्टीच्या अंगभूत भाग आहेत. कल्पनेतही व व्यवहारातही. एका पातळीवर स्त्रीतत्त्वच समूर्त प्रतीकस्वरूपात निसर्गात अभिव्यक्त झाले आहे अशी कल्पना आहे. दुसऱ्या पातळीवर जीव जन्माला घालणे व जीवांचे संगोपन करणे हे स्त्रियांच्या ठायी असलेल्या स्त्रीतत्त्वामळे घडते.'

क्रियाशील, शक्तिमान, उत्पादक आदिशक्तीचे स्त्री हे रूप ठरते. मुक्त, उत्स्फूर्त, नवनवोन्मेषशालिनी ऊर्जा म्हणजे स्त्री. विपुल जीवनाची निर्मिती, संगोपन व संवर्धन करणारी.

या विचारव्यूहातली पुरुष ही संकल्पना खरे तर हाडामांसाच्या पुरुषाशी वास्तविक काही संबंध नसलेली एक संकल्पना आहे. 'पुरुष' तत्त्वाच्या संयोगाने 'प्रकृती' निसर्गसृष्टी प्रसवते. पण 'संयोगाच्या आवश्यकते'ची गरज मानली की स्वतःहून प्रकृती क्रियाशील बनू शकत नाही असा निष्कर्षही काढता येतो, व मग पुरुषतत्त्व हे क्रियाशील, आक्रमक तर प्रकृती ही 'कर्मणि' (पॅसिव्ह), सोशीक ठरविता येते. या मांडणीतून घोटाळे निर्माण होऊ शकतात. तसे ते निर्माण झालेले आपण अनुभवत आहोतही. या घोटाळ्यामधून बाहेर पडण्यासाठी अखेरीस पुरुष-प्रवृत्ती या पद्धतीने विचार करणे, सृष्टीतल्या सृजनाच्या घडामोडी समजावून घेणे बहुधा सोडून द्यावे लागेल.

पण वंदना शिव यांचा रोख आपण समजू शकतो. पुरुषसत्ताक समाजाने व संस्कृतीने खोलवर रुजविलेल्या धारणा उखडून काढण्यासाठी एक हत्यार म्हणून या स्त्रीतत्त्वाची उकल या पद्धतीने करीत आहेत. यासाठी त्यांना पुरुषांच्या विरोधात स्त्रीचे वेगळेपण ठसवायचे आहे. मग त्या चटकन पाश्चिमात्त्य आधुनिक समाज न संस्कृती यांच्याकडे वळतात आणि पुरुषांनी निर्माण केलेल्या जगात प्रस्थापित झालेली, वरचढ व प्रतिष्ठित असलेली तत्त्वे, मूल्ये पुरुषी (मॅस्क्यूलिन) म्हणून विरोधात उभी करतात. जिंकून घेणे, ताबा प्रस्थापित करणे, सत्ता गाजविणे, राबवून घेणे अशा पायाभूत व्यवहारांद्वारे विषमता, शोषण व बळजोरी यांवर आधारित समाज व संस्कृती याला पर्याय म्हणून स्त्रीतत्त्वाचे महत्त्व व वेगळेपण प्रतिपादतात, ते अधिक खरे, मूलभूत, मध्यवर्ती असून सृष्टीशी तिचे संवादित्व आहे असे सांगतात. स्त्री - प्रकृती - निसर्गसृष्टी हे समीकरण मनात वागवून त्या लिहितात,

'प्रकृती (निसर्ग) म्हणजे मूर्त स्वरूपातले स्त्रीतत्त्व. स्त्रीतत्त्वाच्या आविष्कारातून त्या तत्त्वाची पुढील वैशिष्ट्ये ठसतात. १) सर्जकता, क्रियाशीलता, उत्पादकता; २) रूप व आशय यांची विविधता; ३) सर्व गोष्टींचा अन्योन्यसंबंध व जैव अनुबंध, यात मानवही समाविष्ट; ४) मानवी व नैसर्गिक यांच्यातली सलगता; आणि ५) निसर्गसृष्टीत जीवनाचे पावित्र्य.'

मानवी समाजाची पुरुषसत्ताक पद्धतीने झालेली बांधणी ही पुष्कळ प्राचीन आहे. तरीही ही गोष्ट खरी की रेनेसांसच्या काळानंतरच्या आधुनिक कालखंडात प्रथम पाश्चिमात्त्य युरोपिय देशांमध्ये व आज जगभर समाज व संस्कृतीची केली गेलेली 'प्रगत', 'प्रबुद्ध', 'विज्ञानपूत' (प्रोग्रेसिव्ह, एनलायटन्ड, सायंटिफिक) बांधणी वर उद्धृत केलेल्या पाच वैशिष्ट्यांपैकी चार वैशिष्ट्ये अव्हेरणारी आहे; नव्हे, पायाभूत अर्थाने अव्हेर करूनच उभारण्यात आलेली आहे. सर्जकता, क्रियाशीलता व उत्पादकता यांचा आधुनिक काळात प्रकर्षाने

आढळ होतो; किंबहुना, पूर्वीच्या सर्व कालखंडांशी तुलना करता कमालीची सर्जकता, क्रियाशीलता व उत्पादकता हे आधुनिकतेचे एक व्यवच्छेदक गुणवैशिष्ट्य आहे असे म्हणता येईल

वंदना शिव यांनाही ही गोष्ट अमान्य होणार नाही. पण त्यांना अभिप्रेत असलेली सर्जकता, क्रियाशीलता व उत्पादकता उरलेल्या चार वैशिष्ट्यांशी एकात्म असलेली अशी आहे तर आधुनिक समाज व संस्कृतीचे हे वैशिष्ट्य या चार वैशिष्ट्यांना अव्हेरण्यावर, त्यांना पायदळी तुडवण्यावर जोपासलेले आहे. त्या असे म्हणतील तर ते सार्थ आहे. इथेच त्यांचे प्रतिपादन 'विकासा'च्या, समृद्धीच्या, वैज्ञानिक-तंत्रवैज्ञानिक प्रगतीच्या विषयांशी अर्थपूर्ण रीत्या भिडते.

३

'माणूस हा सर्व गोष्टींचा मानदंड आहे' (मॅन इज द मेझर ऑफ ऑल थिंग्ज) ही धारणा समाज व संस्कृती यांच्या आधुनिककालीन पुनर्रचनेच्या गाभ्याशी आहे असे म्हणता येईल. म्हणजे, जग जरी ईश्वराने निर्माण केले असले तरी ते माणसासाठी आहे, आणि पृथ्वीवरील सर्व लौकिक व्यवहार माणसाला केंद्र मानून, मानवी हेतूंच्या पूर्ततेसाठी संघटित करावयाचे आहेत, अशी धारणा आहे. माणूस आणि सृष्टी यांतील ही विभागणी पूर्ण, टोकाची आहे. वंदना शिव लिहितात,

'माणूस आणि निसर्ग यांच्यामध्ये द्वैत कल्पिलेले असल्याने निसर्गाला अंकित करण्याची गोष्ट आधुनिक भूमिकेशी सुसंगत ठरते. नव्या आधुनिक विचारव्यूहानुसार निसर्ग १) जड व कर्मणि (पॅसिव्ह) आहे; २) सर्वत्र सारखा, एकछाप व यांत्रिक आहे; ३) त्याचे अलग अलग तुकडे पाडता येतात कारण तो मुळात अशा वेगवेगळ्या, अलग घटकांचाच बनलेला आहे; ४) मानवापासून सर्वस्वी भिन्न आहे; आणि ५) मानव ही निर्विवाद श्रेष्ठतर निर्मिती असून मानवाने निसर्गावर प्रभुत्व प्रस्थापित करावे, निसर्गाचे दोहन करावे हीच योजना आहे.' त्या पुढे म्हणतात,

'द्वैत हे सत्य मानल्यावर निसर्ग व लोक यांच्यावर प्रभुत्व प्रस्थापित करणे या गोष्टीलाही सत्याचा दर्जा प्राप्त होतो. ज्ञानप्रक्रियेच्या दृष्टीने, तुकडे पाडणे, एकेरी पद्धतीने सुटा सुटा विचार करणे यात त्याची परिणती होते. एकात्म निसर्ग अशी मोडतोड करून जाणून घेण्याच्या पद्धतीतून ज्ञान व व्यवहार या पातळ्यांवर खरीखुरी हिंस्रता उद्भवते.'

माणूस, मानव हे शब्द वापरीत असताना वास्तविक पाहता गौरवर्णीय पुरुष (व्हाइट मेल) असाच अर्थ आधुनिक-कालीन पाश्चिमात्त्य मांडणीत अभिप्रेत होता असे म्हटले तर ते अधिक युक्त होईल असे वंदना शिव यांचे म्हणणे बऱ्याच अंशी खरे आहे. गेल्या चार-पाचशे वर्षांमध्ये जगात ज्या घडामोडी घडल्या त्या काही मूठभर गौरवर्णीय पुरुषी समाजाचे वर्चस्व जगावर प्रस्थापित करणाऱ्या अत्यंत आक्रमक, क्रियाशील व उत्पादक घडामोडी आहेत असे म्हणता येते. जग पादाक्रांत करण्यासाठी, जगभरचे धन लुटून आणण्यासाठी, जगभरच्या गौरवर्णीय पुरुषी समाजाने पराक्रम गाजविला. हा पराक्रम गाजविण्यासाठी या समाजाने वैज्ञानिक संशोधनाला व तंत्रविज्ञानाला हाताशी धरले.

विज्ञान व वैज्ञानिक संशोधन यांचे अर्थही या आपल्या महत्त्वाकांक्षी प्रकल्पाच्या चौकटीत त्याने त्या काळात लावले. विज्ञानाच्या आधारे निसर्गावर जय मिळविण्याची, स्वतःच्या 'मानवी' (म्हणजे गौरवर्णीय पुरुषी समाजाच्या स्वार्थी) उद्दिष्टांसाठी निसर्गाला वाकविण्याची, राबवून घेण्याची भाषा केली. तंत्रवैज्ञानिक सामर्थ्याचा या पुरुषी समाजाच्या ठायी इतका गर्व उत्पन्न झाला की नैसर्गिक सृष्टीच्या जागी हवी तेथे, हवी त्या रूपात संपूर्ण कृत्रिम 'मानवी' सृष्टी उभी करण्याचे सर्वोच्च ध्येय त्याने डोळ्यासमोर ठेवले. निसर्गसृष्टीतल्या उणिवा, कमतरता भरून काढून, मर्यादा ओलांडून एक आदर्श परिपूर्ण माणूस समाज व सृष्टी उत्पन्न करण्याचा प्रकल्प हाती घेतला.

या प्रकल्पाच्या पूर्ततेच्या ओघात जे जे घडले त्यालाच उद्देशून प्रगती, प्रबोधन समृद्धी, विकास, वाढ, ज्ञानवृद्धी असे वेगवेगळे शब्द वापरले गेले आहेत. पण या नाण्याचे खरे स्वरूप कळावयाचे असले तर त्याची दुसरी बाजू नीट डोळ्या-समोर आणली पाहिजे. साम्राज्यवादी - वसाहतवादी वर्चस्व व शोषण; स्त्रियांची जाणीवपूर्वक व पद्धतशीर दडपणूक, बेदखली कोंडी ; अनेकानेक समाजांना 'रानटी' ठरवून त्यांचा नायनाट; विनाशकारी महायुद्धे व शस्त्रास्त्रस्पर्धा; हिंसेचे व गुन्हेगारीचे सार्वत्रिक थैमान, पर्यावरणीय असंतुलन व आजचे जागतिक संकट इत्यादी प्रकार हे तथाकथित विधायक फलितांसाठी अनिवार्य व आवश्यक म्हणून केले गेले. या साऱ्या अन्याय्य, वाईट गोष्टी अपघात नव्हेत; ती प्रगती, प्रबोधन, समृद्धी,





विकास, वाढ, ज्ञानवृद्धी यांची साक्षात साधने आहेत हे वंदना शिव यांचे प्रतिपादन आहे.

छट्, हे असे कसे असेल, असा प्रश्न (तथाकथित) लाभ पदरात पडलेल्या/पडणाऱ्या, विशेषतः शिकल्यासवरलेल्या माणसाला पडला तर नवल नाही. अशा प्रश्नकर्त्याने त्यांच्या पुस्तकातील 'सायन्स, नेचर अँड जेंडर' हे प्रकरण अवश्य वाचण्यासारखे आहे. विज्ञान, वैज्ञानिक संशोधन, तंत्रविज्ञान या तरी विशुद्ध गोष्टी आहेत अशी आपली समजूत असते. प्रस्थापित समाजातले सत्ताधारी यांचा स्वार्थी गैरवापर करतात ही समस्या आहे असे प्रथमदर्शनी वाटते.

निसर्गसृष्टीबद्दलची, निसर्ग व मानव यांच्यातील संबंधांविषयीची धारणा आणि विज्ञान, वैज्ञानिक संशोधन यांचा मुळातून संबंध असतो. ईश्वरनिर्मित असली तरी, निसर्गसृष्टी जड, अचेतन, घड्याळासारखी यांत्रिक नियमांनुसार चालणारी रचना असून माणूस तेवढा बुद्धीची देणगी लाभलेला सचेतन आहे असे एकदा मानले की मग त्या परिप्रेक्ष्यात वैज्ञानिक संशोधन चालते, आणि या संशोधनामधून जे हस्तगत होते तेच तेवढे विज्ञान ठरते. वैज्ञानिक संशोधन पद्धतीही या धारणेला अनुरूप अशी स्वीकारली जाते व तीच एकमेव पद्धती मानली जाते. 'अवैज्ञानिक', आंधळी वेडगळ समजूत, गूढगुंजन या शब्दांच्या व्याख्याही या आधारे केल्या जातात.

आधुनिक विज्ञानाच्या संस्थापक-प्रवर्तक मंडळींची अशी धारणा होती की विज्ञान व वैज्ञानिक संशोधन हा पुरुषांचा प्रांत आहे. निसर्गसृष्टीशी बळजोरी करूनच वैज्ञानिक रहस्ये हस्तगत करावयाची कल्पना त्यांनी केली. निसर्गसृष्टीचे समीकरण स्त्रीशी घातले. पुरुषी हस्तक्षेपच आवश्यक मानला. वंदना शिव यांनी या म्हणण्याला आधारभूत अशा अनेक अभ्यासांचे दाखले पुस्तकात दिले आहेत. इतकेच नव्हे तर ते स्त्रीविरोधी मानस घडविणारे, स्त्रियांच्या दडपणुकीला एक नवे समर्थन प्राप्त करून देणारे पुरुषी कर्तृत्वाचे दालन ठरले.

संघटित स्वरूपात व संस्थात्मक चौकटीत आधुनिक विज्ञानाचा उत्कर्ष हा केवळ विशुद्ध जिज्ञासापूर्तीच्या पोटी केला गेला नाही. बलोपासनेचा एक व्यावहारिक, उपयुक्ततावादी प्रकल्प म्हणूनच त्याला राजाश्रय दिला गेला, ही गोष्ट नजरेस आणून देऊन त्या असे म्हणतात, 'आधुनिक विज्ञान हा पुरुषांनी जाणीवपूर्वक जन्माला आणलेला पुरुषसत्ताक उपक्रम होता.' जग पादाक्रांत करण्याच्या, जगभरचे धन लुटण्याच्या, निसर्ग, अनेकानेक समाज व स्वतःच्या समाजातील श्रमिक जनसामान्य यांना राबवून घेण्याच्या महत्त्वाकांक्षी प्रकल्पाला वैज्ञानिक संशोधनातून आकारास येणाऱ्या, तंत्रवैज्ञानिक शक्तीचा उपयोग करण्याची प्रथमपासूनच कल्पना होती. 'विज्ञानाचे पुरुषी उद्दिष्ट निसर्गाला दास बनविण्याच्या रीती शोधून काढण्याचे होते. निसर्गावर मानवाचे साम्राज्य प्रस्थापित करण्याचे उद्दिष्ट साध्य करण्यात निसर्गाला वेठीला धरण्याची महत्त्वाकांक्षा' होती.'

विज्ञान-तंत्रज्ञानातील प्रगती हा जगावर निसर्गसृष्टी, जगातील 'मागास' लोकसमूह यांच्यावर स्वामित्व प्रस्थापित करण्याचा परवानाच जणू ठरला. यामधून जी भौतिक 'प्रगती' साधली, 'विकास' घडून आला, जी 'समृद्धी' प्राप्त झाली आणि हे सर्व घडत असताना जी जागतिक व्यवस्था व संस्कृती आकारास येत गेली ती स्त्रियांच्याही दडपणुकीला, त्यांना निःसत्व बनविण्याला कारणीभूत ठरली आहे. स्त्रीचे खच्चीकरण करणे, जीवनाच्या अनेक अंगांमधून तिची उचलबांगडी करणे आणि पोरांना जन्म देणे, त्यांचा सांभाळ करणे एवढ्यापुरतेच तिला राबवून घेणे हा 'मॉडर्न सायन्स प्रॉजेक्ट'चा एक आद्य हेतू होता, किंवा किमान त्या प्रकल्पाच्या मूळ आराखड्यात ही गोष्ट अनुस्यूतच होती, असे वंदना शिव यांचे प्रतिपादन आहे. आद्य हेतूचा आरोप समाधानकारकपणे सिद्ध होत नाही. पण स्त्रीचे अस्तित्व व कार्य हे सीमांत (मार्जिनल) ठरविण्याकडे आधुनिक काळाची वाटचाल झालेली आहे व ही परिणती आधुनिक विज्ञानवादी भूमिकेत व व्यवहारात मूलतःच अंगभूत आहे असे म्हणण्यास पुरेशी जागा आहे.

राज्यव्यवहार व प्रशासन या क्षेत्रांचा अधिकार स्त्रियांनी स्वतःची सुरक्षा व सोय म्हणून पुरुषांच्या हाती देण्यातून पुरुषसत्ताक समाज व संस्कृती आकारास आल्यानंतरही प्रदीर्घ काळपर्यंत, म्हणजे कदाचित हजारो वर्षे, जीवनव्यवहाराची अनेक क्षेत्रे ही स्त्रियांच्या कर्तृत्वाची व सहभागाची स्वायत्त क्षेत्रे म्हणून टिकून राहिली. भरण-पोषण, शिक्षण, आरोग्य, उत्पादन अशा अनेक क्षेत्रांमध्ये स्त्री-पुरुष एकत्र कामे करीत व स्त्रियांचा स्त्रीविशिष्ट महत्त्वाचा सहभाग आवश्यक, अनिवार्य मानला गेला होता. इतकेच नाही तर अमूक-तमूक कार्ये स्त्रियांशिवाय पार पडू शकत नाहीत कारण त्यांच्यासाठी लागणारी विशेष गुणसंपदा व क्षमता निसर्गतः फक्त स्त्रियांच्याच ठायी आहे ही धारणाही होती. स्त्री बंधनात होती, तिला गौणत्व

होते, शोषणावर आधारित विषम समाजव्यवस्थेत तळागाळातील स्त्रिया या उतरंडीच्या सर्वांत खालच्या पायरीवर असल्याने त्यांची विशेष दडपणूक, लैंगिक शोषण होत आले आहे. या गोष्टींवर पांघरूण घालण्याचा येथे प्रयत्न नाही. पण स्त्रीत्व, स्त्रीची विशेष क्षमता, गुणसंपदा, तिची म्हणून काही कार्ये व त्यांचे महत्त्व यांना मान्यता असल्याने स्त्री वर्तळाच्या मध्यभागी तरीही कायम राहिली.

आधुनिक विज्ञानवादी भूमिकेत स्त्रीला वगळ असे स्थान केवळ दोनच अंगांनी शिल्लक राहते. पुरुषांच्या रंजनासाठी, संभोगसुखासाठी आवश्यक व इष्ट उपभोग्य वस्तू म्हणून आणि पुनरुत्पादनाचे क्षेत्र म्हणून. बुद्धिप्रामाण्यवादी तंत्रविज्ञानाधिष्ठित व जीवनव्यवहारात स्त्रीची एरवी गरज नाही. पुरुषी जगात ती खरे तर एक अडगळच आहे. आपण अडगळ नसून मौल्यवान साधन आहोत असे दाखवायचे असेल तर स्त्रियांना आग्रहपूर्वक पुरुषी बनून पुरुषांची बरोबरी करावी लागते. स्त्रीत्वाची अप्रतिष्ठा करावी लागते.

आधुनिक विज्ञान व तंत्रविज्ञान यावर आधारित विकास घडवून आणण्याचा प्रकल्प हा म्हणून मूलतः स्त्रियांच्या मुळावर येणारा प्रकल्प आहे. वंदना शिव म्हणतात,

'प्रबोधन युग (एज ऑफ एनलायटनमेंट), आणि या युगाने प्रसवलेला प्रगतीचा सिद्धांत आधुनिक वैज्ञानिक ज्ञान आणि आर्थिक विकास या दोन गोष्टींच्या माहात्म्यावर, पावित्र्यावर अधिष्ठित आहे. निसर्गावरील मानवाचे प्रभुत्व व वर्चस्व ही गोष्ट स्त्रियांवरील प्रभुत्वाच्या आणि वर्चस्वाच्या नव्या घाटांशी संबंधित आहे. विज्ञान आणि विकास या दोन्हींमधून समान सहभाग देणाऱ्या साथी म्हणून त्यांचा अधिकार नाकारलेला आहे... वेगळ्या परंतु समान ही मान्यता विकास देत नाही. तंत्रविद्यासंपन्न पाश्चिमात्त्य पुरुष हा वर्ग, संस्कृती आणि लिंग यांचे मोल करण्याचा एकमेव मान्यताप्राप्त मानदंड आहे. 'तंत्रविद्यासंपन्न पाश्चिमात्त्य पुरुष' ही कोटी आयडिऑलॉजिकल निर्मिती आहे; सहेतुकपणे इतरांना वगळणारी आहे. पाश्चात्त्य पुरुषप्रधान संकल्पनांच्या आधारे - (विज्ञानवादी व विकासवादी विचारव्यूह) स्त्रिया, सर्व अ-पश्चिमी जनसमूह आणि निसर्ग यांच्यावर विशिष्ट भूमिकांचे व निवाड्यांचे आरोपण करतो. ज्या अर्थी 'तंत्रविद्या-संपन्न पाश्चात्त्य पुरुषा'ची भूमिका आणि बळ प्रकट करीत नाहीत त्या अर्थी स्त्रिया, अपश्चिमी जनसमूह व निसर्गदेखील यांच्यात मूलभूत व अंगभूत 'कमतरता' असून त्यांचा 'विकास' घडवून आणण्याची गरज आहे असा निवाडा केला गेला आहे...

हा विचारव्यूह पुरुषत्त्व व स्त्रीतत्त्व यांच्या समान सहभागावर अधिष्ठित एकत्वाचा भंग करतो आणि स्त्रीत्व उणे केलेल्या पुरुषाला स्त्रिया व निसर्ग यांच्यापेक्षा वरचढ स्थान देतो, या दोहोंपासून पुरुष वेगळा वाटतो... क्रियाशीलता, उत्पादकता, सर्जकता या स्त्रीतत्त्वाशी निगडित असलेल्या क्षमता या त्यांच्यापासून हिरावून घेतल्या जातात आणि त्या केवळ पुरुषांच्या ठायी आढळणारी गुणसंपदा वा क्षमता आहेत असा सिद्धांत मांडला जातो.

४

आधुनिक विज्ञान-तंत्रज्ञान आणि विकास यांचा निसर्गावर कोणता आघात झालेला आहे आणि त्याचे स्पष्टीकरण कशात मिळते? वंदना शिव लिहितात, 'युरोपात घडून आलेल्या वैज्ञानिक क्रांतीने पृथिवीमाता या स्थानापासून निसर्गसृष्टीला पदच्युत केले. केवळ एक जड संयंत्र आणि कच्च्या मालाचे कोठार एवढीच मान्यता दिली. तिचा कसाही वापर करून घेण्याच्या आड येणारे नैतिक व ज्ञानप्रक्रियासंबद्ध निर्बंध मग सगळे दूर झाले.'

आधुनिक विज्ञानवादी भूमिका निसर्गसृष्टीला अप्रगत व मागास ठरविण्यापर्यंतही जाते. नैसर्गिक अवस्थेत आढळणाऱ्या गोष्टींची वैज्ञानिक पुनर्रचना केल्यास आपण एक उन्नत, समृद्ध रचना साकार करू शकतो अशी धारणा बनली. त्यातून नैसर्गिक - अवैज्ञानिक, मानवी - वैज्ञानिक अशी समीकरणेही आधुनिक मानसात रुजली. निसर्गात आढळणाऱ्या जंगलापेक्षा विशिष्ट जातींच्या झाडांची लागवड करून निर्माण केलेले 'जंगल' अधिक प्रगत व शास्त्रपूत ठरते. पाऊसपाणी, हवामान यांच्या मानानुसार एखाद्या टापूत कुरणे स्वाभाविक रीत्या विकसित झाली असली तरी कृत्रिम उपाय योजून तेथेही मोठ्या प्रमाणावर शेती करणे प्रगत मानले जाते. अशी अनेकानेक उदाहरणे दिली जाऊ शकतील.

ज्याला आपण विकासाची आधुनिक प्रक्रिया म्हणतो तिचे एक रूप त्या त्या क्षेत्रातील स्थानविशिष्ट निसर्गव्यवस्था (इकोसिस्टिम्स) धाब्यावर बसवून, हवी तशी मोडतोड करून, सर्वस्वी कृत्रिम मानवी व्यवस्था उभी करणे असे उत्तरोत्तर राहिले आहे. समृद्धीसाठी माणसाला सजीव निसर्गसृष्टीची






गरज नाही; किंबहुना सजीव निसर्गसृष्टी हा अडसरच आहे, असे सुचविणारे पुढील उद्‌गार वंदना शिव यांनी उद्धृत केले आहेत.

तात्पर्य असे की, नैसर्गिक साधनस्रोतांवाचून जगाचे काही अडणार नाही. साधनस्त्रोत संपुष्टात येणे वा आटणे ही एक घटना असेल, ती कोणत्याही अर्थाने संकटपरंपरा असणार नाही.'

१९८७ साली अर्थशास्त्राचे नोबेल पारितोषिक मिळालेल्या रॉबर्ट सोलो यांचे हे उद्‌गार आहेत.

आधुनिक काळातील पाश्चात्त्य गौरवर्णीय पुरुषाची ही खास धारणा आहे की मानवी (म्हणजे वास्तविक आक्रमक पुरुषी) हस्तक्षेपाखेरीज व कर्तृत्वाखेरीज कोणतेच धन वा संपत्ती निर्माण होत नाही. निसर्ग जड, निष्क्रिय आहे. ते एक कोठार आहे कच्च्या मालाचे. आक्रमक तंत्रवैज्ञानिक हस्तक्षेप आणि समृद्धी हवी असेल तर तंत्रवैज्ञानिक शक्तीनिशी जास्त आक्रमक हस्तक्षेप, बळजोरी करून निसर्गाला अधिक उत्पादक बनावयाला भाग पाडायला हवे. पुरुषार्थ व बळजोरी यांची पुरुषवर्गाच्या मनात बसलेली सांगड प्राचीन आहे. स्त्रीसुख बळजबरीने लुटून घेणे हे पुरुषार्थाचे गमक मानले गेले आहे. निसर्गसृष्टीची स्त्री म्हणून कल्पना आधुनिक विज्ञानाच्या संस्थापक-प्रवर्तकांमध्ये आढळते. हे ध्यानात घेण्यासारखे आहे.

स्त्रीवरील बलात्कार पुरुषाला विकृत आनंद देतो. विकास व समृद्धी यांच्या नावे निसर्गावर बलात्कार करण्यामधूनही पुरुषी जगाला, निसर्गावर मात केल्याचे, निसर्गाला अंकित केल्याचे, निसर्गावर मालकी प्रस्थापित केल्याचे असेच विकृत समाधान मिळत असल्याचे दिसते. आधुनिक विज्ञानाचे एक आद्य प्रवर्तक फ्रान्सिस बेकन यांचे उद्‌गार वंदना शिव यांनी उद्धृत केले आहेत. त्या लिहितात,

'वैज्ञानिक ज्ञान आणि त्या ज्ञानाच्या आधारे लावलेले यांत्रिक शोध 'निसर्गाच्या प्रवाहाला सौम्यसे मार्गदर्शन करण्यापुरते, वळण देण्यापुरते प्रभाव टाकत नाहीत; निसर्गसृष्टीला जिंकून घेऊन तिला दासी बनविण्याचे बळ त्यांत आहे. निसर्गसृष्टीला मुळातून हादरवून टाकणारे हे बळ आहे.' साहजिकच पाश्चात्त्य धर्तीचा विकासाचा प्रकल्प हा, वंदना शिव म्हणतात, 'स्त्रिया व निसर्ग दोन्हींवर वर्चस्व प्रस्थापित करणारा, त्यांच्यावर बलात्कार करून त्यांना अंकित करणारा, त्यांचा विध्वंस करून त्यांचे सर्वस्व लुटणारा, आणि त्यांना निकालात काढून अनावश्यक ठरविणारा' आहे.

या पार्श्वभूमीवर वंदना शिव यांचे पुढील विधान महत्त्वाचे ठरते.

'निसर्गसृष्टीत आढळणाऱ्या जीवनाचे शोषण करून, त्याला हवे तसे वापरून घेऊन त्याचा विनाश करून पैसा व नफा कमाविता येईल यात शंका नाही. पण अशा व्यवहारांच्या आधारे उभारलेली व्यवस्था सृष्टीची जीवनधारणक्षमता प्रकट करू शकत नाही की जीवनाचा स्रोत ठरू शकत नाही. एका बाजूला जगातला भांडवलसंचय वाढतो आणि जीवन व भरणपोषणाच्या जागी नगद पैसा व नफा यांची प्रतिष्ठापना करणारी 'विकास' प्रक्रिया विस्तार पावत आहे, सघन बनत आहे; पण त्याचवेळी दुसऱ्या बाजूला निसर्गाची जीवनसंवर्धक व पोषक क्षमता ऱ्हास पावून पृथ्वीवरचे जीवन अधिकाधिक संकटात सापडत आहे.

विकासाची आधुनिक प्रक्रिया निसर्गसृष्टीमधून 'कच्चा माल' उपसताना अटळपणे जीवनाची निर्मिती करण्याच्या संबंधांच्या नाजूक व गुंतागुंतीच्या जाळ्याची मोडतोड करीत असते. परिणामी निसर्गसृष्टीची जीवन-धारणक्षमता खच्ची होत राहते. नैसर्गिक सजीवसृष्टी (बायोस्फिअर) पूर्णपणे नष्ट झाली तरी तंत्रविज्ञानाच्या आधारे माणूस त्याला हवे ते सर्व अन्य मार्गाने उत्पादन करून घेईल ही गोष्ट तत्त्वतः शक्य मानली तरी ती इष्ट व हितावह मानावयाची की अनिष्ट व भयावह मानावयाची, हा प्रश्न शिल्लक राहील. वंदना शिव म्हणतात त्याप्रमाणे, निसर्गाची गरज नाही येथवर ही गोष्ट थांबत नाही. आजचा प्रत्यक्ष व्यवहार पाहिला तर जगभरच्या अनेक आदिवासी लोकसमूहांचा वंशविच्छेद याच भूमिकेतून विकासाच्या नावे चाललेला आपणास पाहावयास मिळत आहेच. अशा कृत्रिम जगात स्त्रिया तरी पुरुषांना कशासाठी हव्या असतील? पुनरुत्पादनासाठी बायोटेक्नॉलॉजी व जेनेटिक इंजिनिअरिंगचे शास्त्र विकसित केल्यावर केवळ मोजक्या संख्येने स्त्रियांची गरज राहील. पुरुषांना खेळणी म्हणून ज्या स्त्रिया लागतील त्यांची निर्मितीही शास्त्रशुद्ध रीत्या केली जाईल. प्रत्येक स्त्रीचा मातृत्वाचा स्वायत्त अधिकार आजच धोक्यात आलेला आहे हे आपण पाहात आहोतच.

निसर्ग व नैसर्गिक यांना वगळून, बाद ठरवून, प्रगती विकास, संपत्ती, उत्पादन, समृद्धी, ज्ञान-विज्ञान, तंत्रविज्ञान यांच्या व्याख्या केल्या जाण्यामधून ज्या विशिष्ट स्वरूपाचा

पुरुषार्थ प्रकट होत आहे त्याची अंगभूत स्वभावप्रकृती विध्वसक आहे. म्हणून विकासाची आधुनिक प्रक्रिया ही वास्तविक कुविकासाची, विनाशाची प्रक्रिया आहे असाच वंदना शिव यांचा निष्कर्ष आहे.

५

रोझा लुक्झेंबर्ग या सुप्रसिद्ध कम्युनिस्ट क्रांतिकारक बाईंचे एक निरीक्षण वंदना शिव यांनी नोंदवले आहे. त्या लिहितात,

...रोझा लुक्झेंबर्गनी ही गोष्ट निदर्शनास आणली की विकास साध्य करण्यासाठी साम्राज्यसत्तांना जगभर ठिकठिकाणी त्यांचे वासाहतिक प्रभुत्व प्रस्थापित करणे आवश्यक ठरले. हे प्रभुत्व प्रस्थापित करताना स्थानिक 'नैसर्गिक अर्थव्यवस्था' उद्ध्वस्त करणेही त्यांना आवश्यक ठरले. भांडवली विकास करावयाचा असेल तर अन्य प्रदेशांच्या अर्थव्यवस्था ताब्यात घेणे ही कायमचीच गरज असते असे त्यांचे प्रतिपादन आहे. वसाहतींमधील साधनस्रोत लुटून नेण्यासाठी उपलब्ध नसतील तर औद्योगिक विकासासाठी आवश्यक तो भांडवलसंचय करणे या अर्थाने 'विकास' शक्य होण्यासाठी एका विशिष्ट प्रकारच्या संपत्तीचे सतत वाढत्या प्रमाणावर पुनरुत्पादन होत राहिले पाहिजे ही केवळ निकड असत नाही. याच प्रक्रियेची दुसरी बाजू म्हणून दारिद्र्याचेही पुनरुत्पादन सतत होत राहावे लागते.'

रोझा लुक्झेंबर्ग यांनी वापरलेला 'नॅचरल इकॉनॉमी' हा शब्दप्रयोग महत्त्वाचा आहे. शतकानुशतके चिरस्थायी स्वरूपात कार्य करणाऱ्या व त्या त्या स्थानिक समाजांचे भरणपोषण करणाऱ्या, स्थानिक निसर्गसृष्टीशी संवादित्व साधणाऱ्या अर्थव्यवस्थांची मोडतोड विकासाची आधुनिक प्रक्रिया तिच्या स्वतःच्या अस्तित्वाच्या नियमानुसार करीत राहते.

त्या त्या स्थानिक अर्थव्यवस्थांना धक्का न लावता, त्यांची पुष्टी व संवर्धन करीत विकास का साधला जात नाही? उत्पादनप्रक्रियेचे केंद्रीकरण व भांडवलीकरण हे लोकांच्या गरजा अधिक चांगल्या रीतीने भागविण्यासाठी केले गेले का? तर, नाही; नफेखोरी ही मध्यवर्ती चालक प्रेरणा होती. उत्पादक शक्ती व उत्पादनाचे संबंध (फोर्सेस ऑफ प्रॉडक्शन व रिलेशन्स ऑफ प्रॉडक्शन) या दोन्ही गोष्टी या मूलचालक प्रेरणेला अनुरूप विकसित केल्या गेल्या. जागोजागच्या विकेंद्रित, स्वाश्रयी व स्वायत्त उत्पादनव्यवस्था मोडून अशा सर्व ठिकाणचा 'कच्चा माल' व 'श्रमशक्ती' ओरबाडून स्वतःच्या हाती केंद्रित करून स्वतःच्या नफेखोरीचे प्रमाण वाढविणे हा या नव्या व्यवस्थेचा नियमच म्हणता येईल. निसर्गव्यवस्थेचे संघटन उत्पादनाची कमालपातळी गाठण्याच्या दिशेने सतत उत्क्रांत होत असते आणि माणसाची भूमिका फार तर साहाय्यकाची असते; सर्व पायाभूत धन निसर्ग स्वतःच सतत निर्माण करत असतो. पण नव्या व्यवस्थेत हे ज्ञान अव्हेरले गेले आणि 'कच्च्या मालाचे कोठार' या पातळीवर निसर्गाला आणून ठेवले गेले. स्त्रीपुरुषांनाही 'श्रमशक्ती'च्या जड पातळीवर आणून ठेवले गेले.

'कॅपिटॅलिस्ट ग्रोथ' हे वरील उताऱ्यातील शब्द पाश्चिमात्त्य भांडवलशाही देशामधील अर्थव्यवस्थांनाच तेवढे लागू पडतात असे नाही. सोविएत रशियाच्या धर्तीवर जेथे आर्थिक विकास साधण्याची गोष्ट घडली तेथे नेमके तेच परिणाम घडून आले. सोविएत रशियानेही वसाहतवादी शोषण काही कमी केले नाही. कारण निसर्गसृष्टी व माणसे यांच्याकडे तेथील नियोजनकारांनीही 'उत्पादनाचे घटक' म्हणूनच पाहिले. आणि स्थानिक 'नैसर्गिक अर्थव्यवस्थां'ना तितक्याच निर्घृणपणे चिरडले. नफेखोरी कोणी केली व तिचे स्वरूप कोणते राहिले याबाबतीत उत्तर थोडे वेगळे येईल इतकेच.

विकासाच्या आधुनिक प्रक्रियेचे वास्तविक परिणाम असे होत आहेत याचा पडताळा जगभर मिळत आहे. भारतातही आपणास याचा पडताळा येतो. वंदना शिव यांनी 'वुइमेन इन द फॉरेस्ट', 'वुइमेन इन द फूड चेन' आणि 'वुइमेन अँड द व्हॅनिशिंग वॉटर्स' या तीन प्रकरणांमध्ये विकासाच्या आधुनिक प्रक्रियेचा निसर्ग, स्त्रिया, आदिवासी व ग्रामीण भागातील सामान्य जन यांच्यावर जो विध्वंसक आघात होत आहे त्याचे अनेकानेक तपशील दिले आहेत.

भारतीय संस्कृतीच्या एका मुख्य प्रवाहाला उद्देशून 'अरण्य संस्कृती' असे सार्थपणे म्हणता येईल. अरण्यात तपश्चर्या व साधना करणाऱ्या ऋषिमुनींच्या शिकवणुकीचे अधिष्ठान प्राचीन भारतीय संस्कृतीला लाभले. रवींद्रनाथांच्या 'तपोवन' नावाच्या निबंधातील उतारा वंदना शिव यांनी उद्धृत केला आहे. रवींद्रनाथ म्हणतात,

'ऐहिक व बौद्धिक/वैचारिक पुनर्निर्मितीचा प्रेरक स्रोत म्हणून अरण्याला दिले गेलेले स्थान हा भारतीय संस्कृतीचा विशेष आहे. अन्य संस्कृतींमध्ये शहरांकडे यासाठी पाहिले





गेले... मानवी जीवन आणि जिवंत निसर्ग यांच्यातील आत्मीय संबंध हा येथे ज्ञानाचा स्रोत बनला, ज्या ज्ञानातून येथील समाजाला पुनःपुन्हा नवसंजीवन लाभले.' भारतभर गावांच्या जवळ देवराया आढळतात. त्या पवित्र, जागृत शक्तिस्थाने मानली जातात.

अरण्यात व अरण्यांच्या जवळ राहणाऱ्या आदिवासी व अन्य ग्रामीण समाजांचे भरणपोषण अनेक अर्थांनी जंगलांशी निगडित होते. जंगलांमधून वाहून येणाऱ्या, कुजणाऱ्या पाला-पाचोळ्याने शेतजमिनींची सुपीकता टिकून राहते याचे भानही आढळते. गुराढोरांचा सांभाळ जंगलांच्या भरवशावरच अशा भागात केला जातो. आदिवासी समाज तर निसर्गाची वा अरण्याची लेकरे म्हणता येतील. जंगलातील नाना वनस्पतींचे सूक्ष्म ज्ञान आदिवासींना असते आणि हे ज्ञान त्यांच्या जीवनाचा सगळ्यात मोठा आधार असतो.

आधुनिकपूर्व समाजाबद्दल वंदना शिव लिहितात, 'अरण्यातील अगणित प्रकारच्या वृक्ष-वेली-वनस्पती यांचे चिरस्थायी आणि पुनर्निर्मितीक्षम स्वरूपाचे उत्पादन कमाल करण्याच्या दृष्टीने उपकारक अशा रीतीने घनांमधून आपल्या गरजांची पूर्तता करण्याची एतद्देशीय रीत राहिली आहे. अरण्यांतील झाडाझुडपांची, वेली-वनस्पतींची विविधांगी कार्ये ध्यानात घेऊन त्यांच्यात व्यत्यय येणार नाही, उलट ती कार्ये अधिक चांगल्या प्रकारे पार पडत राहतील असा रीतीने वनांशी व्यवहार येथील लोकांनी नेहमीच केला आहे.

त्या पुढे असेही म्हणतात की, जंगलांतून जीवनोपयोगी वेगवेगळ्या गोष्टी संपादित करणे, पण तसे करीत असताना जंगल अबाधित राखणे हे काम प्रामुख्याने स्त्रियांकडे असल्याचे आढळते. जंगलापासून मिळणाऱ्या गोष्टींचा स्रोत अखंडित राहावयाचा असेल तर कोणत्या प्रकारचे अतिरेकी दोहन करता कामा नये याची जाण स्त्रियांना परंपरेने प्राप्त झालेली आढळून येते. याला उद्देशून 'मॅनेजिंग अँड रिन्यूइंग' असे शब्द वंदना शिव यांनी वापरले आहेत. अरण्यांच्या संदर्भात ही भूमिका आपण घ्यावी, तो आपला अधिकार आहे हा विचार आधुनिकपूर्व काळात लोकांच्या मनाला शिवलाही नसावा. ही भूमिका आधुनिकतेचाच एक भाग आहे. लोक जंगलाशी व्यवहार करताना आपल्याला लागणाऱ्या गोष्टींचा पुरवठा अक्षय होत राहील याची काळजी घेत असतील व या दृष्टीने उपकारक ज्ञान व जाण त्यांना प्राप्त होत गेले असेल.

या पार्श्वभूमीवर ब्रिटिश राज्य प्रस्थापित झाल्यानंतरची पालटलेली स्थिती वंदना शिव यांनी वर्णन केली आहे. ब्रिटिश सत्तेचा भारतीय जंगलांशी संबंध सर्वस्पर्शी जीवनपोषणाचा वा आध्यात्मिक सांस्कृतिक पोषणाचा नव्हता. जहाजबांधणी, आगगाड्यांच्या रुळांखालचे स्लीपर, फर्निचर, इमारती लाकूड या गरजांसाठी उपयुक्त अशा सागवानी लाकडाचे कोठार म्हणून त्यांनी जंगले 'पाहिली' आणि आपले स्वामित्व प्रस्थापित केले. असे चारदोन वेचक जातींचे वृक्ष सोडता इतर वृक्ष-वेली-वनस्पतींची त्यांना अडगळच वाटली. जंगलात राहणारे आदिवासी व जंगलांपासून अनेकानेक उपयोगी वस्तू व सेवा प्राप्त करणारी माणसेही त्यांना अडथळ्यासारखीच वाटली. त्यांच्या काही हक्कांना निस्तार हक्क म्हणून मान्यता देत असताना त्यांनी अनेक निर्बंधही घातले.

जमिनीची धूप होण्यापासून संरक्षण करण्यातली, शेतजमिनींच्या सुपीकतेचे नित्य नूतनीकरण करण्यातली, पाण्याचा साठा जमिनीच्या पोटात करून ठेवण्यातली, पावसाचे मान कायम राखण्यातली, जंगलातल्या नानाविध पर्यावरणीय संतुलन-संवर्धन व धारणक्षमतावृद्धीच्या संदर्भातली अशा नाना भूमिकांची जाण ब्रिटिश राजवटीने जशी प्रगट केली नाही, तशी ती स्वातंत्र्य मिळाल्यानंतरच्या प्रशासनानेही.

जंगलांमधून व्यापारी तत्त्वांवर इमारती लाकूड व इतर वस्तू काढण्याचे म्हणजेच जंगलांचे दोहन करण्याचे प्रमाण वाढल्यावर जंगलतोडीचे प्रमाण बेसुमार वाढले. जंगलांमधील इतर वनस्पतींची नासधूस वाढली. मूळ जंगल साफ करून व्यापारी उपयोगाच्या झाडांची लागवड मोठ्या प्रमाणावर जंगल खाते करू लागले. (यालाच 'शास्त्रशुद्ध अरण्यसंवर्धन' म्हटले गेले.) याचा आघात दुहेरी झाला. समाईकपणे जीवनस्रोत म्हणून उपलब्ध असलेल्या जंगलांवर ज्यांचे जीवन व जीवनमान अवलंबून होते ते वंचित झाले. चारा, अन्न, जळण, औषधी वनस्पती व अन्य पदार्थ संपादित करण्यासाठीची यातायात वाढली. पाण्याचे स्रोत आटत गेले तशी पाण्यासाठी वणवण सुरू झाली. याचा आघात स्त्रियांवर अधिक झाला. कारण जंगलातून वेगवेगळ्या गोष्टी हस्तगत करण्याचे काम मुख्यतः त्यांचे होते. त्यांच्या मेहनतीत व कामाच्या तासांमध्ये वाढ झाली. त्या परिमाणात त्यांची दडपणूक व हलाखी वाढली.

वंदना शिव म्हणतात, 'अनेकानेक जातींच्या वृक्षवेली वनस्पतींचा अन्योन्याश्रयी एकात्म समुदाय, त्यांच्यातील

गुंतागुंतीचे संबंध हे अरण्याचे स्वरूप असते याकडेही अरण्यांचे व्यापारी दोहन करण्याची भूमिका दुर्लक्ष करीत आली. तसेच अरण्यातील वनस्पतीजीवन आणि जमीन, पाणी यांसारखे इतर साधनस्रोत यांच्या आंतरसंबंधांकडेही दुर्लक्ष करून अरण्यांचे दोहन करण्यात आले. यातून अरण्यांच्या निसर्गव्यवस्थेचा पाया खचून ती डळमळीत झाली. निसर्गसृष्टी हा साधनस्रोत सजीव व स्वतःची सतत पुनर्निर्मिती करणारा विशेष स्वरूपाचा साधनस्रोत आहे. निसर्गाची पुनर्निर्मिती क्षमताच अस्थिर केल्याने त्याची साधनस्रोत म्हणून असलेली क्षमता खच्ची होण्यास या तथाकथित शास्त्रशुद्ध वनव्यवस्थापनाचा परिणाम झाला आहे. अरण्य या साधनस्रोतांचे कार्य अनेकांगी आहे. अरण्यव्यवस्थेवर प्रहार झाल्याने ही अनेकविध कार्ये पार पाडणे दिवसेंदिवस कठीण होत गेले. स्वतःच्या भौतिक अस्तित्वासाठी अरण्याच्या या अनेकांगी कार्यावर, अनेकपदरी साधनस्रोत म्हणून त्यांच्या असलेल्या स्वरूपावर अवलंबून असलेले लोकसमूह; विशेषतः आदिवासी व स्त्रिया, यांच्या आर्थिक हितसंबंधांवर घाला पडला आहे.'

यातले 'डायव्हर्स' आणि 'सर्व्हायव्हल' हे शब्द महत्त्वाचे आहेत. लोकांच्या गरजांच्या दृष्टीने विचार करता जंगलाला असलेली अनेकविध परिमाणे टिकविणे महत्त्वाचे आहे. विशिष्ट जातींच्या झाडांची वने निर्माण केल्यास म्हटले तर 'जंगलसंवर्धना'चे काम केले जाते. पण वस्तुतः ते फक्त आधुनिक व्यापारी अर्थव्यवस्थेतील नफेखोरीस तेवढे उपयोगी असते. त्याने समाजातील काहींचा आर्थिक लाभ होताना दिसत असला तरी सामान्य जनांचे अस्तित्व धोक्यात आणणारी ही घडामोड ठरते. तथाकथित आधुनिक वैज्ञानिक दृष्टी कशी वास्तविक आंधळी व कोती आहे आणि विकासाची आधुनिक प्रक्रिया मूलतः लोकहितविरोधी कशी आहे याचे जंगलविषयक धोरण व निलगिरी व सुबाभूळ सारख्या जातींची वने निर्माण करण्यावर भर देणाऱ्या जंगल-संवर्धनाच्या अलीकडील योजना हे एक अतिशय बोलके उदाहरण आहे.

जंगलाखालील क्षेत्र झपाट्याने कमी होत चालले आहे व ही मोठी चिंतेची बाब आहे, ही गोष्ट शासन आज स्वतःच सांगत आहे. जंगले राखणे व जंगले वाढविणे यावर भर दिला जात आहे. विकासविषयक आधुनिक दृष्टी व तंत्रवैज्ञानिक समज प्रश्न सोडविण्याच्या प्रयत्नात प्रश्न अधिक गंभीर कशी बनविते त्याचे दिग्दर्शन येथे होते. इमारती लाकूड, कागद/कापड निर्मितीसाठी कच्चा माल म्हणून लाकूड, जळण म्हणून लाकूड भरपूर प्रमाणात उपलब्ध व्हावे या दृष्टीने सारा विचार चाललेला आहे. वृक्षशेतीला प्रोत्साहन देण्यात येत आहे. गावोगावच्या निकृष्ट पडजमिनी उत्पादक बनविण्याच्या हेतूने खाजगी उद्योजकांना वृक्षलागवडीसाठी देण्याच्या योजना हाती घेतल्या गेल्या आहेत. 'सामाजिक वनीकरणा' वर मोठा पैसा खर्च होत आहे.

अन्नधान्याखालील जमिनी वृक्षशेतीसाठी वापरात आल्या की तळागाळातल्या लोकांसाठी उपलब्ध असणाऱ्या स्थानिक अन्नधान्याच्या पुरवठ्यावर विपरीत परिणाम होतो. नाचणी पिकविणाऱ्या जमिनीवर सुरू, निलगिरींची लागवड कर्नाटकात मोठ्या प्रमाणात केली गेली तेव्हा हे कळून आले. अन्न महागले, दुष्प्राप्य झाले. शेतीत काम मिळणाऱ्या भूमिहीन लोकांचे काम गेले. कर्नाटकातील कोलार जिल्ह्याची आकडेवारी वंदना शिव यांनी दिली आहे. नाचणीचे क्षेत्र १९७७-७८ ते १९८०-८१ या काळात १,४१,७७२ हेक्टर वरून ४८,४०६ हेक्टरपर्यंत खाली आले व उत्पादन १,७५,१९५ टनांपासून १३,३४० टनांपर्यंत घसरले. निलगिरीच्या लागवडीवर भर असल्याने पाण्याच्या स्रोतावरही विपरित परिणाम झाला आहे.

गावोगावच्या पडजमिनी या स्थानिक गोरगरिबांच्या दृष्टीने एक आधार असतो. गुरे चारता येतात. जळणासाठी काट्याकुट्या मिळतात. खासगी उद्योजकांच्या ताब्यात या जमिनी गेल्या की त्यांची परवड वाढते. ते अधिकच परावलंबी बनतात. पैशाच्या रूपात उत्पन्न नसेल तर आधुनिक बाजारी अर्थव्यवस्थेत त्यांना गिऱ्हाईक म्हणून प्रवेश करता येत नाही.

लोकांच्या गरजांच्या पूर्तीच्या दृष्टीने जंगलांचे संवर्धन करावयाचे असेल तर प्रथम नैसर्गिक जंगल ही एक उत्पादक, विविध परिणामांनी समृद्ध अशी निसर्गव्यवस्था आहे हे जाणले पाहिजे. लोकजीवनाला जंगलाचा जीवनाधार प्राप्त व्हावयाचा असेल तर जंगल कोणकोणते आधार कसे पुरविते ते जाणले पाहिजे. आणि अशी जंगले ही सामाईक रीत्या लोकांना गरजांच्या पूर्ततेसाठी उपलब्ध असली पाहिजेत, अबाधित राखली पाहिजेत ही आवश्यकताही स्वीकारली गेली पाहिजे.

७

शेतीच्या क्षेत्रातील बाजारीकरणाच्या परिणामांची चिकित्सा वंदना शिव यांनी विस्ताराने केली आहे. हरितक्रांती

ही बाजारासाठी, नफा कमविण्यासाठी शेतमालाचे उत्पादन करण्यावर आधारलेली आहे. शेतीवर अवलंबून असलेल्या लोकांच्या जीवनपोषक गरजांची पूर्तता करण्याच्या दृष्टीने कालपरवापर्यंत शेती केली जात असे. हरितक्रांतीचे मॉडेल हे पुरुषी मॉडेल आहे, शेतीचे हे पुरुषीकरण आहे असे वंदना शिव यांचे मुख्य प्रतिपादन आहे. कोणत्या अर्थाने या स्थित्यंतराचे असे वर्णन करणे अर्थपूर्ण ठरते?

पुरुषतत्त्व आणि स्त्रीतत्त्व असा जो भेद वंदना शिव यांनी केला आहे तो ध्यानात घेणे येथे आवश्यक आहे. जिंकून घेणे, मात करणे, सत्ता गाजविणे या प्रवृत्तींना उठाव मिळणे म्हणजे पुरुषतत्त्व वरचढ ठरणे असे त्यांच्या मांडणीत अभिप्रेत आहे. तसेच घराबाहेरच्या औपचारिक व्यवस्थेच्या, बाजारी व्यवस्थेच्या कसोट्यांवर जीवनाच्या क्षेत्राचे संघटन करणे ही पण पुरुषीपणाची कसोटी ठरते. पुरुषी संस्कृती ही कर्तृत्व व यश यांच्या एकेरी व्याख्या ग्राह्य मानते; संतुलन, अन्योन्य संबंध, समान सहभाग नाकारते. तसेच अशी पुनर्रचना करताना ती असे गृहीत धरते की, तिच्या मूळ स्वभावप्रकृतीमुळे अशा पुनर्रचित व्यवस्थेत व व्यवहारात स्त्रिया उपयोगाच्या नाहीत, त्या पुऱ्या पडू शकत नाहीत. म्हणजेच निर्णयप्रक्रिया पुरुषांच्या हाती असणेच स्वाभाविक व उचित आहे. उत्पादक व उद्योजक म्हणून खरी महत्त्वाची भूमिका पुरुषच पार पाडू शकतात. कुटुंब व घर हे कार्याचे केंद्र अनुचित मानले जाते.

भरणपोषणासाठी केली जाणारी कौटुंबिक शेती (सबसिस्टन्स होमस्टेड फार्मिंग) ही जमीन-गुरे-माणसे यांच्या अन्योन्याश्रयी जैव संबंधांवर आधारलेली एक संतुलित व्यवस्था होती. जमीन, जंगल, पाणी, गुरे व माणसे हे केवळ 'उत्पादनाचे घटक' नव्हते. जमीनही 'काळी आई' होती. गाय ही गोमाता होती. या शेतीत स्त्री व पुरुषांची कामे वेगवेगळी असत, पण त्यांचा सहभाग हा समान सहकाऱ्यांमधील सहभाग असे.

जमिनीची सुपीकता अक्षय टिकवून धरण्याचे महत्त्व जुन्या पारंपरिक शेतीइतकेच नव्या हरितक्रांती-अधिष्ठित शेतीतही आहे. पण निसर्गव्यवस्थेतील चक्रे अभंग राखण्यावर, तिच्यातले संतुलन कायम राखण्यावर सुपीकता टिकणे सर्वस्वी अवलंबून आहे. अशी पारंपरिक धारणा होती. आणि यामध्ये गुरांचा, पिकांच्या फेऱ्यांचा, जमिनीला मधून मधून विश्रांती देण्याचा व अशाच इतर गोष्टींचा मोठा वाटा असतो हे मानलेले होते. आधुनिक शेतीचे गृहीत असे आहे की, जमिनीतून आपण कशाचेही व कितीही उत्पादन काढू शकतो; कारण उत्पादन-वाढीची सर्व वैज्ञानिक-तंत्रवैज्ञानिक रहस्ये माणसाने (म्हणजे पुरुषाने) आता हस्तगत केली आहेत. अन्योन्याश्रय, समान सहभाग या सर्व भाकड समजुती आहेत. संकरित बियाणे, रासायनिक खत, कृत्रिम रीत्या पुरविलेले पाणी, रोग/कीटकनाशक औषधे आणि शक्ती (मानवी श्रम, गुराढोरांचे श्रम वा यांत्रिक शक्ती) यांचे शास्त्रशुद्ध गणित बसविता आले की आणि सर्व उत्पादन घटक आपल्या 'हाती' असले की झाले. शेती उत्तम पिकणे हीदेखील प्रभुत्वाशी, सत्तेशी निगडित गोष्ट बनली आहे. भांडवलाची उपलब्धता, विज्ञान-तंत्रज्ञानाची उपलब्धता या प्रभुत्वाच्या, सत्तेच्या द्योतक गोष्टी आहेत. पुरुषी तत्त्वाने शेतीचे क्षेत्र ताब्यात घेतल्याचा हा परिणाम आहे.

या नव्या व्यवस्थेत ज्या गोष्टींसाठी पैसा मोजावा लागत नाही व ज्या गोष्टी पैशाच्या रूपात उत्पन्न देत नाहीत त्यांची किंमत केली जात नाही; त्यांचे अवमूल्यन होते. आणि जेथे पैसा मोजावा लागतो तेथे किती पैसा लागला त्यावरून मोल ठरविले जाते. कौटुंबिक श्रम हे पुष्कळदा धरलेच जात नाहीत. जर असे श्रम कुटुंबातील स्त्रिया करीत असतील तर त्या श्रमांच्या अवमूल्यनाबरोबर स्त्रियांचेही अवमूल्यन होते. शेतीतल्या पुरुषांच्या समान सहकारी म्हणून त्यांना स्थान व प्रतिष्ठा नाकारली जाते. स्त्रियांना मजुरी कमी देऊन त्यांचे अवमूल्यन पुरुषसत्ताक व्यवस्था करते आणि मग कमी मजुरी त्यांच्या गौणत्वावर शिक्कामोर्तब करण्यासाठी पुरावा म्हणून पुढे केला जातो.

निसर्गसृष्टीच्या रीतींशी संवादी अशा शेतीचे वैशिष्ट्य वंदना शिव यांनी पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे -

'समग्र पर्यावरणीय अन्योन्यसंबंधाच्या दृष्टीने अन्य उत्पादन करणारी शेतीव्यवस्था अरण्ये, जलस्रोत आणि प्राणीसृष्टी या अन्य निसर्गव्यवस्थांपासून वेगळी तोडून विचारात घेताच येत नाही.'

या संदर्भात स्त्रिया कोणती महत्त्वाची भूमिका पार पाडत आल्या? तर,

'जंगलरक्षण व संवर्धन, पशुपालन आणि शेती यांची जैव सांगड घालणे व ती राखणे हे परंपरेने स्त्रियांचे शेतीतले कार्य राहिले आहे.'

जंगलात गुरे चारायला नेणे, जंगलातून चारा आणणे, गुरांचा सांभाळ करणे, कचरा-शेण-मूत्र यांचे कंपोस्ट तयार

करणे, ते शेतात नेऊन टाकणे, अशा प्रकारची दुव्यांची साखळी म्हणून स्त्रिया महत्त्वाचे काम पार पाडीत आल्या आहेत.

शेतीचा शोध व विकास स्त्रियांनी केला या गोष्टीस आज मान्यता मिळाली आहे. शेतीशी निगडित अनेक गोष्टींचे सूक्ष्म ज्ञान स्त्रियांशी पारंपरिक शहाणपणाच्या स्वरूपात संचित झाले होते व ते त्यांच्या बारीकसारीक व्यवहारांमधून प्रकट होताना जगभर आढळते. आधुनिक व्यापारी शेतीच्या प्रसाराबरोबर ते कुचकामी ठरवले गेले; त्या 'अकुशल मजूर' ठरल्या. वंदना शिव म्हणतात,

'निसर्गव्यवस्था जशी स्वतःत परिपूर्ण व पुनर्निर्मितीक्षम असते तशी शेतीव्यवस्थाही निसर्गसृष्टीचा नमुना डोळ्यांपुढे ठेवून उभारण्यात स्त्रियांचे तज्ज्ञ कौशल्य कामी आले. आज या प्रकारची शेती उद्ध्वस्त करण्यात आली आहे. शेतीबरोबर निसर्गातल्या प्रक्रियाही खंडित करण्यात आल्या आहेत. ग्रामीण भागातील गरीब लोकांचे खच्चीकरण वरील दोन प्रकारच्या विध्वंसनांशी मिळतेजुळते असेच आहे.

'जसे जमिनीचे क्षेत्र वाढत्या प्रमाणावर नगदी पिकांखाली येत गेले आणि हरितक्रांतिप्रणीत तंत्रविज्ञानाचा पर्यावरणीय आघात होऊन जमिनी खराब होत गेल्या तसा स्त्रियांना शेतीत असलेला अवकाश कमी झाला आणि अन्न-उत्पादन करण्यासाठी त्यांना जास्त भार उचलणे भाग पडत गेले. बाजारात मिळणारी किंमत यावरून उत्पादकता मोजली जाऊ लागते तसे स्त्रियांच्या कामाचे 'मूल्य' आणि त्यांचे स्थान यांची घसरण होते. पण त्याच वेळी अस्तित्व टिकवून धरण्यासाठी कराव्या लागणाऱ्या त्यांच्या परिश्रमांत वाढ होते. भांडवलप्रधान पुरुषसत्ताक व्यवस्था एकाच वेळी कामाचा भार वाढविते आणि स्त्रियांना शेतीच्या क्षेत्रात परिघाबाहेर ढकलते. बाजारी अर्थव्यवस्था पोटापाण्याची गरज भागविणाऱ्या स्वावलंबी अन्न-उत्पादनापासून दूर शहरांमध्ये/कारखान्यांमध्ये जाण्यास भाग पाडते आणि अशा रीतीने पोटापुरते अन्न हस्तगत करण्याच्या संदर्भातले स्त्रीचे काम वाढविते. नगदी पिके आणि हरितक्रांतिप्रणीत शेती यांमुळे ढासळलेल्या पर्यावरणाच्या समतोलामुळे पाणी आणणे, चारा व सरपण गोळा करणे यांसाठी त्यांना जास्त तास खर्ची घालावे लागतात.'

ग्रामीण भागातील अल्पभूधारक व शेतमजूर कुटुंबांच्या बाबतीत ही परिस्थिती वाढत्या प्रमाणावर अनुभवास येत आहे. जी शेती पावसावर अवलंबून आहे त्या शेतीतही हे चित्र सार्वत्रिक आढळून येत आहे. स्त्रियांवरील भार तेवढा वाढतो आहे असे नाही. त्याच भारभूत आहेत अशी भावना वाढत आहे.

समाजासाठी स्त्रिया एकीकडे जास्त भार वाहू लागतात तेव्हाच दुसरीकडे समाजाला त्या उत्तरोत्तर अधिकाधिक भारभूत ठरत आहेत, आणि समाज त्यांच्यावाचून काम चालवू शकेल, समाजाला त्यांची गरज नाही, असा निवाडा केला जाऊ शकतो. त्यांच्याविरुद्ध पक्षपात केला जातो, हुंडाबळीचे आणि गर्भावस्थेत वा अर्भकावस्थेत त्यांच्या हत्येचे प्रमाण वाढते.' असे वंदना शिव म्हणतात. आपल्या म्हणण्याला आधार म्हणून त्यांनी हरितक्रांतीसाठी गाजणाऱ्या पंजाबचा दाखला दिला आहे. अन्नधान्याच्या बाबतीत समृद्ध असलेल्या पंजाबात मुलींचा आहार निकृष्ट आढळला. गर्भजल परीक्षेनंतर मुली असल्या तर गर्भपात करण्याचे प्रमाण पंजाबमध्ये पुष्कळ मोठे आढळले. १९७८ ते १९८३ च्या दरम्यान असे ७८००० गर्भपात केले गेले.

हरितक्रांतीची आणि धवलक्रांतीची बरीच विस्ताराने वंदना शिव यांनी चर्चा केली आहे. अन्नधान्याचे, काही इतर पिकाचे, दुधाचे उत्पादन पुष्कळ वाढल्याचे आपण वर्तमानपत्रात वाचतो. या उत्पादनवाढीमुळेच भारतात भूकबळी पडत नसल्याचेही आपणास सांगितले जाते. हे जर खरे असेल तर मग शेती व पशुपालनाच्या क्षेत्रातील या क्रांत्या घडवून आणणारी विकासाची आधुनिक प्रक्रिया विनाशाची प्रक्रिया कशी म्हणता येईल, असे विचारले जाते.

जे साधनस्रोत अक्षय राहण्यावर पृथ्वीवरील जीवनाची निरंतरता, चिरंजिविता अवलंबून आहे ते साधनस्रोत थोडक्या काळात वापरून टाकून उजाड बनविण्यावर जर ही उत्पादनवाढ अवलंबून असेल तर? तसेच, जी संसाधने एकदाच तयार झालेल्या साठ्यांच्या स्वरूपातील असतील, आणि त्यांचा वारेमाप वापर करून ही उत्पादनवाढ थोडक्या काळासाठी साध्य केली जात असेल तर? या दोन्हींच्या जोडीला उत्पादनवाढीच्या या पद्धतीने सत्ता व लाभ यांचे कमालीचे केंद्रीकरण होत असेल आणि दुसऱ्या टोकाला दारिद्र्य, गांजवणूक व परावलंबित्व वाढत वा टिकून राहात असेल तर?

हा विकास आहे हे ठरविण्याच्या आपल्या कसोट्या चुकीच्या आहेत. शेतीच्या बाबतीत दोन कसोट्या महत्त्वाच्या आहेत. जिराईत शेतीवर जगणाऱ्या शेतकरी व बिगरशेतकरी

समाजांचे व विशेषतः तळाशी असलेल्या स्त्रियांचे जीवन सुखसमाधानाचे आहे असे आपणास म्हणता येते का? आणि भारतभरच्या अनेकविध निसर्गव्यवस्थांची नित्य नूतनीकरणाची, उत्पादनाची म्हणजेच जीवनधारणेची क्षमता उच्चांक गाठण्याच्या दिशेने उत्क्रांत होत आहे का?

आपण आणखीही एक प्रश्न उपस्थित करू शकतो. उत्पादनवाढ कोणाच्या 'गरजां'साठी केली जात आहे व ते कोण ठरवतो, हा तो प्रश्न होय. होणारे उत्पादन कोठे जात आहे आणि त्याचा कोणता वापर केला जात आहे?

उदाहरणार्थ, सकस अन्नाची गरज ही सामान्य भारतीयांची सर्वप्रथम गरज असेल तर कोणत्या पिकांचे उत्पादन वाढावयास हवे आणि ते लोकांना त्यांच्या श्रमाच्या मोबदल्यात सहजी प्राप्त व्हायला हवे? नाचणी, बाजरी, डाळी, कडधान्ये, तेलबिया यांचे उत्पादन घटून जर गहू, द्राक्षे, ऊस, सफरचंदे, आंबे यांचे उत्पादन वाढत असेल तर त्याचा काय अर्थ लावावयाचा? अंडी व दूध यांच्या उत्पादनासाठी जमीन, पाणी व अन्य साधनांचा वापर होत असेल आणि दूध-अंडी हे पदार्थ शहरवासी उच्च मध्यमवर्गांच्याच पोटात मुख्यतः जात असतील तर त्यापासून कोणता बोध काढावयाचा? जीवनधारक संसाधनांपर्यंतची गोरगरिबांची पोच जर जास्त अवघड होत असेल आणि घरच्यांची उपासमार करून त्यांना आवश्यक अन्नपदार्थ बाजारात विकावे लागत असतील तर निष्कर्ष कोणता निघतो?

संकरित बियाणांच्या वापराने चाऱ्याचे उत्पादन घटले. परिणामी गुरांची उपासमार वाढली. जमिनीची सुपीकता टिकवून धरण्यात त्यांच्या मलमूत्राचे कार्य महत्त्वाचे राहिले आहे. मातीत पडणाऱ्या सेंद्रीय खतांच्या अभावाने जमिनींची ओल टिकवून धरण्याची क्षमता घटली. वंदना शिव लिहितात,

'माणसांसाठीचा अन्नपुरवठा वाढविण्यासाठी सकृद्दर्शनी चाऱ्याचे उत्पादन कमी देणाऱ्या जातींचा प्रसार केला जातो आणि गुराढोरांचा पोटभर चारा मिळण्याचा हक्क हिरावून घेण्याची हिंसा घडते. गुराढोरांकरवी जमिनीला सेंद्रीय खत मिळून तिचे जे पोषण होते त्या पोषणापासून तिला वंचित करण्याची हिंसा पहिल्या हिंसक व्यवहारातून उद्भवते. वास्तविक जमीन ही अन्नदायी आहे. तिच्यासोबत असा हिंस्र व्यवहार घडतो. या साखळीतल्या पुढच्या टप्प्यावर माणसावरच ही हिंसा सूड घेते; अन्नधान्याचे दुर्भिक्ष्य निर्माण करून.' स्त्रिया, गोरगरीब हे बळी जातात.

नाचणी, बाजरी, मांडुआ यांसारखी आहारदृष्ट्या उच्च प्रतीची सकस धान्ये, डाळी व तेलबिया यांचे उत्पादन घटते तेव्हा सर्वसामान्य पोषणावर विपरित परिणाम होतो व अस्तित्वाचा प्रश्न अधिक बिकट बनतो.

'पोषण आणि अस्तित्व यांच्या दृष्टीने विचार केला तर हरितक्रांतीच्या ओघात बाद ठरत जाणारी, लागवड कमी होणारी पिके फुटकळ नसतात; पोषण आणि अस्तित्वाचे रक्षण या दृष्टीने ती मध्यवर्ती महत्त्वाची असतात. नफा कमविण्याच्या उद्देशाने बाजारात विकण्यासाठीचा माल म्हणून मात्र ती फुटकळ बिनमहत्त्वाची असतात.

कळीचा मुद्दा हा आहे. खते, औषधे, पाणी, शेतीसाठी आवश्यक असणाऱ्या सर्व गोष्टींसाठी आणि शेतीत पिकणाऱ्या सर्व शेतमालासाठी स्वतःच्या हाती सूत्रे एकवटणाऱ्या राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय यंत्रणा, संशोधनसंस्था, कंपन्या व सरकारे यांच्या हाती नियंत्रण व निर्णय यांची सत्ता आज एकवटत आहे. अन्न वा पोषण हाही अर्थकारण व राजकारण यांचा भाग बनविणारी ही विकासप्रक्रिया या अर्थाने 'पुरुषी' आहे हे खरेच आहे. वंदना शिव जागोजाग मॅस्क्यूलीन, पॅट्रिआर्कल, मेलडॉमिनेटेड असे शब्द वापरतात. ते काही अंशी खटकतात व अस्थानी पण वाटतात. पण पुरुषतत्त्वाची तसेच स्त्रीतत्त्वाची जी मांडणी त्यांनी आरंभी केली आहे ती ध्यानात ठेवली तर या शब्दांच्या वापराने त्यांना काय सूचित करावयाचे आहे ते समजू शकते. विकासाच्या आधुनिक प्रक्रियेचा सामान्य थरातील स्त्रियांवर आणि स्त्रीच्या एकंदर स्थान व अस्तित्वावर जो आघात होत आहे तो खराच आहे. त्या म्हणतात,

'जुनी पारंपरिक पक्षपाती वागणूक व दडपणूक यांमधून आधुनिकीकरणाच्या प्रक्रियेमुळे स्त्रियांची मुक्तता होईल अशी प्रचलित समजूत आज खोटी ठरली आहे. भारतात शेतीच्या आधुनिकीकरणाचा परिणाम जुने पूर्वग्रह अधिक दृढ होण्यात आणि त्यात नव्या प्रकारच्या पक्षपातांची भर पडण्यात व हिंस्र वागणूक वाढण्यात होत आहे. समग्रतेने विचार न करता, तुकडे पाडून सुटा सुटा संकुचित विचार करण्यामधून अर्थशास्त्र व विज्ञानवाद जे भेद रचतो व कप्पे पाडतो त्यामधून निसर्गसृष्टी व स्त्रिया यांची गरज आता नाही व त्यांना उत्पादनव्यवस्थेतून बाद केले तरी चालेल असा तर्कसंगत निवाडा केला जात आहे. एका बाजूला जमिनी मृत होत

आहेत, सुपीक मातीचे रूपांतर निर्जीव धुळीत होत आहे, वाळवंटे तयार होत आहेत आणि दुसरीकडे स्त्रियांना वंचित केले जात आहे, त्यांचे अवमूल्यन होत आहे आणि त्यांचा बळी घेतला जात आहे. या घडामोडीच्यामागे समग्र व सम्यक दृष्टीचा हा अभावच कारणीभूत आहे.

'अन्न-उत्पादनाच्या दृष्टीने जमीन ही मूळ मुद्दल भांडवलासारखी आहे. हे भांडवल सुरक्षित राखून त्याचा समुचित वापर केला तरच निरंतर पोषण होत राहील. हे मुद्दल सुरक्षित राखावयाचे याचा अर्थ जमिनीला सुपीक बनविणारी निसर्गातील चक्रे अखंडितपणे कार्यरत राहतील अशी दक्षता बाळगावयाची. पण आज आपण अन्नधान्याचे उत्पादन वाढविण्यासाठी ज्या अनैसर्गिक, नव्हे, निसर्गविरोधी रीतींचा वापर करीत आहोत या व्यवहारांचा परिणाम म्हणून आपण एक घोर आपत्ती स्वतःवर ओढवून घेत आहोत. याचबरोबर, उत्पादनातील सहभागामुळे ज्यांना उपजीविकेसाठी पुरेसे अन्न मिळण्याचा स्वाभाविक नैसर्गिक हक्क प्राप्त व्हावयास हवा तो त्यांना अन्नोत्पादन व त्याचा व्यापार यांच्या वर्तमान बाजारी पद्धतीमुळे नाकारला जात आहे. यामधूनही लोक एका महासंकटात सापडत आहेत. अस्तित्वावरच प्रश्नचिन्ह लागले आहे.'

## ९

कुविकासाचे हे चक्र उलटवायचे कसे? समाज-व्यवस्था, अर्थव्यवस्था यांची स्त्रीतत्त्वानुसार पुनर्रचना करावयास हवी असे वंदना शिव यांचे मागणे आहे.

साऱ्या जीवनाचा व वैपुल्याचा, शांती व समाधानाचा आधार नित्यप्रसवा निसर्गसृष्टी अथवा पृथ्वी हाच आहे आणि तिचे जीवनचक्र अभंग व अक्षय राहील अशा प्रकारेच मानवाने तिच्या कृपाप्रसादाने स्वतःचे जीवन संपादित केले पाहिजे. धरित्री ही माता आहे आणि तिच्याशी मातेच्या भावनेनेच आदरपूर्वक व संयमाने व्यवहार केला पाहिजे.

मानवी जीवनाच्या संदर्भात स्त्रीची भूमिका व कार्य प्रजनन, संगोपन, संवर्धन हे आहे. निसर्गाशी तादात्म्य पावून, निसर्गाच्या रीती सूक्ष्म बारकाव्यासह जाणून घेऊन, सहृदयतेने उचित व्यवहार करण्याचे शहाणपण स्त्रीने आपल्या स्वभाव-प्रकृतीला, भूमिकेला व कार्याला अनुसरून मानवजातीच्या इतिहासात प्रदीर्घ काळ केले आहे. हे शहाणपण हाच मानवी समाजाच्या पुनर्रचनेचा पाया असायला हवा.

समाजाची रचना पुरुषसत्ताक नसावी याबद्दल कोणाचे दुमत नाही. स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीने सर्व क्षेत्रे खुली असावीत, काम, वेतन, अधिकार, स्थान इत्यादी बाबतीत भेदभाव केला जाऊ नये. कुमारी मातृत्वासारख्या गोष्टींनाही समाजमान्यता असावी अशा प्रकारचे आधुनिकीकरण वा या अर्थाने समान वागणूक एवढेच वंदना शिव यांना नको आहे. अशी समानता प्राप्त झाली तरी ती जर पुरुषी चौकटीत प्राप्त झाली तर स्त्रीतत्त्वाचा स्वीकार झाला असे म्हणता येणार नाही.

जिंकून घेणे, मात करणे, बळजोरी करणे, प्रभुत्व व स्वामित्व प्रस्थापित करणे, सत्ता गाजविणे, लाभ, सत्ता व प्रतिष्ठा यांचे केंद्रीकरण स्वतःच्या हाती करणे - थोडक्यात सर्वच संबंध हे सत्तेचे संबंध मानणे व तसा व्यवहार करणे या अर्थाने पुरुषी तत्त्वावर झालेले सर्व जीवनाचे व ज्ञानविश्वाचे संघटन अव्हेरण्यास त्या महत्त्व देतात.

पुरुषतत्त्वाची वंदना शिव यांची मांडणी पूर्णपणे नकारात्मक अशी आहे तर स्त्रीतत्त्वाची पूर्णपणे विधायक. ही मांडणी इतकी नकारात्मक आहे की या तत्त्वाचे पूर्ण उच्चाटन व्हावे असेच म्हणायला लागते. हे त्यांच्या संपूर्ण मांडणीतले सर्वात मोठे न्यून आहे. पुरुषतत्त्व आणि स्त्रीतत्त्व (मॅस्क्युलिनीटी व फेमिनिनिटी) ही दोन्ही विधायक स्वरूपात व संतुलित अवस्थेत स्त्री व पुरुष दोघांच्याही ठायी कार्यरत राहणे इष्ट व आवश्यक आहे अशी मांडणी अधिक परिपूर्ण व सम्यक होईल. याचा अर्थ असा की, स्त्रीतत्त्वाचीही नकारात्मक मांडणी करणे शक्य आहे व ती तशी करून आणखी कोणत्या गोष्टी जीवनाधार म्हणू अव्हेरल्या पाहिजेत याची स्पष्टता केली पाहिजे. तसेच पुरुषतत्त्वाची विधायक मांडणी करून 'फेमिनिन प्रिन्सिपल'ला आणखी कोणत्या गोष्टींची जोड द्यायला हवी तेही स्पष्ट केले पाहिजे.

त्याचप्रमाणे स्त्रियांचा वैशिष्ट्यपूर्ण वेगळा पण समान सहभाग आणि काही क्षेत्रांमधले मध्यवर्ती स्थान मान्य व्हायलाच हवे. पण त्याच वेळी पुरुषांचा असाच वैशिष्ट्यपूर्ण वेगळा पण समान सहभाग कोणता, कसा व कोणत्या क्षेत्रांमध्ये राहील तेही स्पष्ट व्हायला हवे. काही क्षेत्रांमध्ये पुरुषांचेही विधायक पुरुषतत्त्वाच्या पायावर मध्यवर्ती स्थान राहीलच. ते कोणते याचीही अधिक स्पष्टता जरूरी आहे.

आधुनिक पाश्चात्त्य विज्ञान व तंत्रविज्ञान यांच्या

वरील टीका बव्हंशी मान्य होण्यासारखी आहे. पण ज्ञान-विज्ञानाचीही पर्यायी बैठक व अशा ज्ञानविज्ञानाचा आशय पुरेसा स्पष्ट करण्याची गरज आहे. 'रिडक्शनिस्ट' असा शब्दप्रयोग त्या करतात. ज्ञानविज्ञान संपादित करण्याची रीत कोणती? पारंपरिक शहाणपण हे विज्ञानच आहे हे म्हणणे ठीक आहे. संघटित व पद्धतशीर प्रयत्नांद्वारे अधिक वेगाने व ठरवून ज्ञानविज्ञानात वृद्धी करण्याची व ते उपयोगात आणण्याची शक्यता मानावयाची की नाही?

निसर्गसृष्टीशी संवादी राहून, निसर्गसृष्टीचे संतुलन व पुनर्निर्मितिक्षमता अबाधित राखून शेती, जंगलसंवर्धन, पशुपालन, पाण्याचा वापर कसा करता येईल या सर्व नैसर्गिक व्यवस्थांचा मानवी गरजापूर्तीशी जैव व अन्योन्याश्रयी व अन्योन्यसंवर्धक मेळ कसा घालता येईल याची स्पष्टता तुलनेने सोपी आहे. कारण त्याच्या आड राजकीय-आर्थिक हितसंबंध, लोकमानसातील अनेक दृढ समजुती व जाड्य येतील. पण औद्योगिक उत्पादनाच्या क्षेत्रात अशा बऱ्याच बारकाव्यांचा विचार करावा लागेल जेथे फक्त निसर्गव्यवस्थेचा व संतुलन, पुनर्निर्मिती क्षमतेचा मुद्दा विचारात घेण्याने भागणार नाही.

आधुनिक पाश्चात्त्य वैज्ञानिक संशोधनामधून प्राप्त झालेले ज्ञान, उलगडलेली निसर्गाची रहस्ये व नियम 'सायंटिफिक रिडक्शनिझम'चा युक्तिवाद करू बाद ठरविणे युक्त होणार नाही. याचाच अर्थ असा की, 'सायंटिफिक रिडक्शनिझम'चा आरोप कोणत्या बाबतीत ग्राह्य ठरतो व कोणत्या बाबतीत त्याच्या मर्यादेत आधुनिक ज्ञानविज्ञान 'युनिव्हर्सल' ठरले तरी तंत्रविज्ञानाच्या बाबतीत त्या ज्ञानविज्ञानाचा वापर किती व कोणत्या मर्यादेत करणे इष्ट व मुक्त आहे हे स्वतंत्रपणे ठरवावे लागेलच.

अशा सर्व मुद्द्यांचा विचार या एकाच पुस्तकात केलाच पाहिजे होता असा आग्रह धरणे वंदना शिव यांच्यावर अन्याय करणारे होईल. पण आधुनिक विकासप्रक्रियेचे विध्वंसकत्व उघड करण्याच्या उत्कट व त्वेषपूर्ण प्रयत्नात अतिउत्साहात त्या काहीशा वाहावत गेल्या असे म्हणावे लागते. यामुळे त्यांच्या विवेचनात ज्या त्रुटी उत्पन्न झाल्या व लंगडेपण आहे आहे त्यावर झोड उठवून त्यांचे मुख्य प्रतिपादन बाद ठरविण्याचा प्रयत्न केला जाईल. तसे करणे बुद्धिमान प्रतिपक्षी वकिलाला शक्य असले तरी ते युक्त होणार नाही. कारण प्रचलित विकासप्रक्रियेमुळे भारतातील पर्यावरणाचे संतुलन ढासळण्याच्या बेतात आहे, निसर्गव्यवस्थांची पुनर्निर्मितीक्षमता धोक्यात आलेली आहे व त्यामुळे 'समृद्धीची बेटे' जागोजाग झगमगत असली तरी अगणित गोरगरीब जनतेचे विशेषतः तळागाळातल्या स्त्रियांचे अस्तित्वच आज संकटात सापडले आहे ही गोष्ट अनुभवास येणारी गोष्ट आहे. या वस्तुस्थितीकडे लक्ष वेधण्याचे व ती निर्माण करण्याला जबाबदार असलेल्या प्रक्रियेवर नेमकेपणाने बोट ठेवण्याचे महत्त्वाचे काम वंदना शिव यांनी जिवाच्या कराराने पार पाडले आहे. या कामगिरीसाठी आपण सर्व त्यांचे ऋणीच राहू.



'आज जगात कोणी उपाशी नाही, उघडा नाही,' असे ज्या दिवशी रेडिओवरून सांगता येईल तो सुदिन! केव्हा येईल तो? स्वतःच्या आईचे दुःख विसरून, कोट्यवधी आयांच्या दुःखात तुम्ही-आम्ही सारे सहभागी होऊ तेव्हा. श्याम स्वतःच्या आईचे दुःख आता विसरला आहे. लाखो लोकांच्या दुःखांचा परिहार करू पाहणाऱ्या क्रांतीत अशक्त व आजारी असूनही तो शिरू पाहत आहे. लाखो लोकांच्या विकासाला विरोध करणारे सारे सैतानी पंथ व संघ पायाखाली तुडविण्यासाठी, आपल्या कृश, रुग्ण शरीराने, परंतु पेटलेल्या मनाने, श्याम उभा राहू पाहत आहे. आईचे दुःख खरोखर मला समजले असेल, माझ्या आईची खरीखुरी पूजा करावी असे जर माझ्या मनात पूर्वी कधी येत असेल, तर ह्या अशा विराट क्रांतीतील सात्त्विक संतापाने पेटलेला एक सैनिक मी बनेन. शरीराने नाही बनता आले, तर मनाने बनेन. खरा मातृभक्त तो, जो दुसऱ्या लाखो मातांची दुःखे दूर करण्यासाठी उभा राहतो. मी खरा मातृभक्त असेन, तर असा वागेन. असे माझ्या हातून होवो, असा मला ध्यास लागेल. त्या महान क्रांतीत प्रत्यक्ष पडता न आले, तर निदान मी तिचे अभिष्ट तरी चिंतीन. त्या क्रांतीला यश चिंतीन. तिची गाणी गाईन व इतरांना ऐकवीन. तिचा जप करीत मरेन. मातृदेव श्याम, क्रांतिदेव झाला पाहिजे.

**- साने गुरुजी**










# उथळ पर्यावरणवादाच्या मूलभूत मर्यादा

अविनाश जोशी

'कॅन्सर, पर्यावरणीय नुकसान व मृत्यू या गोष्टीच अशा आहेत की त्या 'थोड्याशा' किंवा 'किंचितशा' प्रमाणात असूच शकत नाहीत'. - पेट्रा के. केली.

१

भ्रमनिरास ही जशी दुःखद गोष्ट असते तशीच ती उपकारकही असते. किंबहुना ती उपकारकच असते असे म्हणणे अधिक योग्य कारण भ्रमनिरास म्हणजे भ्रमाचे, अज्ञानाचे पटल भेदून, जमेल तितके ते बाजूला सारून पुढे टाकलेले पाऊल. मनाला ज्या भ्रमाची सवय झालेली असते त्या भ्रमाला बाजूला सारताना क्लेश होणे साहजिक असते. परंतु ते एक पुढचे पाऊल असल्याने ते अंतिमतः आनंददायी असते; असायला हवे.

एका भ्रमनिरासाचा विलक्षण अनुभव आपण विशेषतः गेले वर्षभर घेत आहोत; आणि एकूण घटनांचा वेग लक्षात घेता 'समाजवाद' हा शब्दच या शतकाच्या अखेरपर्यंत इतिहासजमा तर झालेला नसेल ना अशी काहीशी हळवी चिंता करत आहोत.

परंतु आणखी एक भ्रमनिरास आपल्याला पचवायला लागणार आहे अशी चिन्हे दिसत आहेत. हा भ्रमनिरास आहे बहुसंख्य पर्यावरणतज्ज्ञांच्या उपदेशामधील दिखाऊ मूलगामित्वाच्या परंतु वास्तविक उथळपणाच्या संदर्भातला. हा भ्रमनिरास काहीसा अधिक सूक्ष्म असणार आहे असे वाटते. किंबहुना युरोपमधील सोविएत छापाच्या समाजवादाबद्दल ज्या लोकांचा जगभर भ्रमनिरास सध्या होतो आहे त्यांपैकी अनेकांना हा दुसरा भ्रमनिरास एक भ्रमनिरास आहे असे बहुधा वाटणारही नाही असे त्याचे सूक्ष्म स्वरूप आहे.

गेल्या दहा-पंधरा वर्षांच्या कालखंडात, प्रथम श्रीमंत पाश्चात्त्य देशांत व नंतर यथाकाल भारतासारख्या तथाकथित 'न्यूनविकसित' देशांमध्ये, पर्यावरणविज्ञानाचा (ecology) बराच बोलबाला होतो आहे. त्याचे मुख्य कारण म्हणजे, उद्योगीकरण-शहरीकरणामुळे व शेतीच्या व्यापारीकरण-यांत्रिकीकरणातून निर्माण झालेल्या पुढील समस्या : हवेचे प्रदूषण, आम्लवर्षा (acid rain) ओझोन पटलातील छिद्र, नद्या-तळी-समुद्र या जलस्रोतांचे प्रदूषण, पृथ्वीवरील तापमान हळूहळू वाढून होणारा 'ग्रीन हाऊस' परिणाम, अणुभट्ट्यात वापरलेल्या इंधनांचा वाढत जाणारा किरणोत्सर्गी कचरा, प्लॅस्टिकसारख्या जैविक विघटन होऊ न शकणाऱ्या मालापासून बनविलेल्या वस्तूंच्या कचऱ्याचे डोंगर, जंगलतोडीमुळे होणारी जमिनींची धूप, आधी सुपीक असलेल्या प्रदेशांचे वेगाने होणारे वाळवंटीकरण, जलसिंचन योजनांमुळे होणाऱ्या पाण्याच्या अतिवापरातून जमिनीचे खारावणे, रासायनिक खतांच्या सतत व वाढत्या वापरामुळे जमिनींचे विषारणे, वाहने-लाऊडस्पीकर्स - करमणुकीची इलेक्ट्रॉनिक साधने इत्यादींमुळे होणारे ध्वनीप्रदूषण, मोठ्या धरणयोजनांमुळे करावी लागणारी असंख्य असहाय्य लोकांची (Oustees) पुनर्वसने व संभाव्य भूकंपाचे धोके, कीटकनाशके-जंतुनाशके-तणनाशके यांच्या वाढत्या वापरातून मानवासकट सर्व जीवसृष्टीवर (biosphere) होणारे प्रत्यक्ष - अप्रत्यक्ष दुष्परिणाम, यामुळे जीवसृष्टीतील अनेक जाती-प्रजाती यांचे परस्परसंतुलन बिघडणे व त्यांतील काही हळूहळू पृथ्वीतलावरून कायमच्या नष्ट होणे इत्यादी.

या सर्व (व इतर) विवक्षित समस्यांचा एक परमविपाक म्हणून जो अंदाज बहुसंख्य पर्यावरणतज्ज्ञांकडून (ecologists किंवा environmentalists) व्यक्त केला जाऊ लागतो, म्हणजे माणसाने पृथ्वीवर उपलब्ध असलेल्या मर्यादित साधनसंपत्तीच्या व्यवस्थापनाची किंवा तिचा उपयोग करण्याच्या पद्धतींची कार्यक्षमता (efficiency of resource management) जर तातडीने वाढविली नाही तर केवळ मानवसंस्कृतीच नव्हे तर कदाचित पृथ्वीचे अस्तित्वच धोक्यात येईल. या प्रकारचा इशारा ज्या माहितीवर (stastistical data) आधारावा लागतो त्या माहितीने संपन्न असे अभ्यास/अहवाल/लेख गेल्या काही वर्षांत प्रसिद्ध झाल्याचे अनेकांना माहीत असेल. उदा. Worldwatch Institute चे 'State of the World' अहवाल, World Resources Insti-

अनुक्रमणिका

tute चे वार्षिक अहवाल, Brundtland Commission चा अहवाल, Gaio Atlas इत्यादी. (भारतातही Centre For Science and Environment या संस्थेने १९८२ व १९८५ साली The State of India's Environment या शीर्षकाचे दोन अहवाल प्रसिद्ध केले आहेत.)

लोकसंख्यावाढीमुळे व न्यूनविकसित देशांतील लोकांच्या सतत वाढणाऱ्या मागण्यांचे अनुकरण करू लागल्याने साधनसंपत्तीच्या वापराचा वेग कसा वाढतो आहे; कोळसा, तेल व इतर खनिजे यांसारख्या अपुनरुत्पाद्य संसाधनांचे साठे कसे वेगाने कमी होत आहेत; त्यामुळे त्यांच्यावर आधारित उत्पादने कशी उत्तरोत्तर अधिक खर्चिक बनत आहेत व या सगळ्यामुळे मानवी संस्कृती व सृष्टी टिकण्याचा (survival) प्रश्न कसा बिकट बनत चालला आहे याबद्दलचे या अहवालातून उपलब्ध होत असलेले विश्लेषण व इशारे अत्यंत महत्त्वाचे आहेत याबद्दल दुमत होणार नाही असे वाटतो.

या विश्लेषणाचे व त्यातून होणाऱ्या संकटसूचनांचे महत्त्वच असे आहे की, या मुद्द्यांचा विचार पॉल सॅम्युअल सारख्यांच्या अर्थशास्त्रावरील जगद्विख्यात पाठ्यपुस्तकांमध्येही अलीकडच्या आवृत्त्यांमध्ये, त्रोटक स्वरूपात का होईना, परंतु करावा लागलेला आहे. राष्ट्राच्या आर्थिक कर्तबगारीची मोजदाद ढोबळ राष्ट्रीय उत्पादनाच्या (Gross National Product किंवा GNP) मापाने न करता 'निव्वळ आर्थिक कल्याण' (Net Economic Welfare किंवा New) या सुधारित फूटपट्टीने करावी असा व तत्सम इतर विचार पुढे येत आहेत.

पर्यावरण तज्ज्ञांच्या विश्लेषणाला व इशाऱ्यांना पारंपरिक अर्थशास्त्रज्ञांनी दिलेले हे प्रतिसाद स्वागतार्हच आहेत; इतके की त्या इशाऱ्यांमध्ये जरी थोडीशी अतिशयोक्ती असली तर तीसुद्धा स्वागतार्ह ठरावी (erring on the right side).

आता विवेचन या वळणावर आल्यावर एखाद्याला असे वाटणे साहजिकच आहे की जर पर्यावरणज्ञ हे इशारे देण्याची एवढी महत्त्वाची कामगिरी पार पाडत असतील तर लेखाच्या सुरुवातीला उल्लेखिलेल्या भ्रमनिरासाचा प्रश्न कुठे आणि कसा उपस्थित होतो?

## २

या प्रश्नाचे उत्तर देण्यासाठी पर्यावरणज्ञांनी आतापर्यंत केलेल्या विश्लेषक कामगिरीचे महत्त्व आपल्याला थोडे अधिक कठोरपणे तपासावे लागेल. त्यासाठी आपण असा प्रश्न उपस्थित करणे आवश्यक ठरते की पाश्चात्त्य समाजशास्त्रज्ञांनी, विशेषतः अर्थशास्त्रज्ञांनी मानवी कल्याणाच्या दृष्टीने आतापर्यंत जो विचार केला त्यामध्ये पर्यावरणज्ञांनी नेमकी कोणत्या प्रकारची सुधारणा केली, भर घातली?

झॅक्स (Sachs) यांच्या शब्दांत या प्रश्नाचे उत्तर असे देता येईल की, 'पृथ्वीवरील जीवसृष्टी टिकून राहण्याच्या संदर्भात जे संकट उभे ठाकले आहे त्याबद्दलच्या निःशब्दतेचा पडदा पर्यावरणज्ञांनी ओढून बाजूला सारला आणि त्यायोगे पारंपरिक अर्थशास्त्राने या संकटाची जी रोखठोक दखल घ्यायचे टाळले होते ती टाळाटाळ पर्यावरणज्ञांनी संपवली.

हे काम महत्त्वाचे आहे यात शंकाच नाही. परंतु प्रश्न असा आहे की, ज्या पर्यावरणज्ञांनी सृष्टीच्या टिकण्याबद्दलच धोक्याचा कंदील स्पष्टपणे दाखवला त्यांनी स्वतःच्या सर्वंकष संकटाच्या जाणिवेला प्रतिसाद कशा प्रकारचा दिला आहे? तो प्रतिसाद पारंपरिक अर्थशास्त्र्यांच्या प्रतिसादापेक्षा किती निराळा आहे? मानवहिताच्या, सृष्टिहिताच्या दृष्टीने कितपत परिणामकारक ठरू शकणार नाही?

या कळीच्या प्रश्नाचे उत्तर असे आहे की, पारंपरिक अर्थज्ञ आणि पर्यावरणज्ञ यांच्यातील फरक दुर्दैवाने केवळ मात्रेचा (degree) आहे; प्रकाराचा (kind) नाही. हा फरक प्रकारात्मक आहे अशी समजूत मात्र मोठ्या प्रमाणावर निर्माण झालेली दिसते आणि यामध्येच ज्या भ्रमनिरासाचा इशारा लेखाच्या सुरुवातीला दिला आहे, त्या भ्रमनिरासाची बीजे दडलेली आहेत. या विधानाचे स्पष्टीकरण थोडेसे तपशीलवार करणे आवश्यक आहे,

कर्क पॅट्रिक सेल यांनी पर्यावरणज्ञांबद्दल जो विचार व्यक्त केला आहे त्यातून आपल्याला या स्पष्टीकरणाची नांदी करता येईल. सेल म्हणतात की, पृथ्वीच्या गुणधर्मांच्या यथार्थतम अभ्यासाला ज्यांनी वाहून घेतले आहे असे आपण (भाबडेपणाने) ज्यांना समजून चाललेलो असतो, ते पर्यावरणज्ञ कशात धन्यता मानताना दिसतात? तर विज्ञान वादाचा (scientism) खोडा गळ्यात अडकवून घेण्यात. म्हणून तर ते 'एंट्रपी' सारखी भौतिकीतील संख्यात्मक संकल्पना रसरसत्या समग्र निसर्गाला लागू करतात, ऊर्जेच्या 'उत्पादना'ची भाषा करतात, अन्नपदार्थांच्या मालिका (food chains) मांडतात, अरण्यांच्या 'व्यवस्थापना'चा विचार करतात, एवढेच नव्हे तर प्राणिमात्रांच्या

समाजाच्या (biolic community) जिवंत प्रतिमेच्या ठिकाणी पर्यावरणाच्या प्रणाली (eco-system) ची यांत्रिक संकल्पनाच प्रस्थापित करतात. निसर्गाच्या संबंधात अशी परिभाषा वापरण्याच्या या अवस्थेला आपण कसे आलो असा प्रश्न उपस्थित करून श्री. सेल या प्रश्नाचे अतिशय मार्मिक (परंतु अनेकांना विवाद्य वाटेल) असे उत्तर देतात की, याचे कारण म्हणजे, गेल्या चार शतकांमध्ये विश्वाविषयी विचार करण्याचा जो विज्ञानग्रस्त (scientistic) दृष्टिकोण बळावत गेला त्याची भेदक चिकित्सा करण्याचे सोडून आपण त्याचा एखाद्या धर्मश्रद्धेसारखा आंधळा स्वीकार केला हे होय. विज्ञानवादाने केवळ शिक्षण, शेती, वैद्यकी, ऊर्जा, संप्रेषण (communication), वाहतूक यांचेच पोषण केले आहे असे नाही तर हा विज्ञानवाद अत्यंत पायाभूत अशा आपल्या राजकीय व आर्थिक संस्थांचे जणू प्राणतत्त्व झाला आहे. कर्क पॅट्रिक सेल यांनी रेडिओटेलिग्राफी, विद्युत्‌शक्ती, स्वच्छता (hygiene), रोगप्रतिकारण (immunilogy) या क्षेत्रांमध्ये विज्ञानाने केलेल्या कामगिरीला निःसंदिग्ध शब्दात उपकारक म्हणून गौरविले आहे; परंतु त्यांच्या मते वैज्ञानिक वृत्तीचा जेव्हा 'विज्ञानवाद' झाला तेव्हा, त्याने, आरपार जिवंत असलेला लसलसता निसर्ग आणि माणसाचे परंपरेतून साठत आलेले ज्ञान आणि शहाणपण या दोन महाशिक्षकांचा बळी घेतला. त्याचा परिणाम असा झाला की, एकूण प्राणिमात्रांच्या समाजाच्या व्यामिश्र व्यवहारांमध्ये भाग घेणाऱ्या अनेकांतील केवळ एक घटक आपण आहोत, त्या समाजाचे सत्ताधीश नाही, हे जे महत्त्वाचे भान विज्ञानवादाच्या आधी माणसाला होते ते ढळले आणि तो स्वतःला त्या विराट समाजातल्या इतर जातींपेक्षा श्रेष्ठ समजू लागला. सृष्टीला त्याने आपले बटीक मानणे सुरू केले.

पर्यावरणज्ञांनी दिलेले इषारे आणि सुचविलेले व्यावहारिक उपाय हे पारंपारिक अर्थशास्त्रज्ञांपेक्षा गुणात्मकदृष्ट्या निराळे का नाहीत याच्या उत्तराचा गाभा श्री. सेल यांच्या वरील मुद्द्यात आपल्याला भेटतो. बहुसंख्य पर्यावरणज्ञांना विज्ञान वादाच्या औद्धत्यापासून स्वतःला मुक्त ठेवता आलेले नाही हे अत्यंत दुर्दैवाचे आहे. परंतु संभाव्य अशी फार मोठी निराशा टाळण्यासाठी ते लक्षात घेणे आवश्यक आहे.

वरील परिच्छेदात 'बहुसंख्य पर्यावरणज्ञांना' असे जे म्हटले आहे त्यातील 'बहुसंख्य' हा शब्द महत्त्वाचा आहे. कारण पर्यावरणज्ञांमधील आजमितीला अत्यंत अल्पसंख्य असे जे 'गंभीर पर्यावरणज्ञ' (deep ecologist) आहेत त्यांना वरील टीका लागू होत नाही. टीकेचे लक्ष्य असलेले जे पर्यावरणवादी आहेत त्यांना 'उथळ पर्यावरणज्ञ' (shallow ecologists किंवा environmentalists) असे संबोधणे उचित ठरेल. हेच बहुसंख्य आहेत. त्यांच्यातील व अल्पसंख्य पर्यावरणज्ञांमधील जो महत्त्वाचा भेद आहे तो संक्षेपाने या टप्प्यावरच मांडून घेऊन पुढे जाणे हे अनावश्यक गैरसमजुती टाळण्याच्या दृष्टीने आवश्यक आहे. (या भेदाच्या काही तपशीलासाठी 'परिसर वार्ता'चा डिसेंबर १९८८ चा अंक तीन उपयुक्त आहे. विस्तृत तपशीलासाठी Bill Devall व George Sessions यांचा Deep Ecology हा उत्कृष्ट ग्रंथ पाहावा.)

Arne Naess या नॉर्वेजिअन तत्त्वज्ञाने १९७३ मध्ये 'गंभीर पर्यावरणविचार' ही संकल्पना प्रथम मांडली. हा पर्यावरण विचार म्हणजे आधुनिक विज्ञान व त्यामागची मानवकेंद्री विश्वदृष्टी (anthropocentrism) यांच्यापलीकडे जाऊ पाहणारे एक दर्शन आहे. Naess यांनी असे आग्रहाने सांगितले आहे की, या दर्शनात संपूर्ण नवे असे काही नाही; कारण या दर्शनाचे मुख्य घटक आपल्याला प्राचीन व अर्वाचीन अशा अनेक धर्म-तत्त्व दर्शनांमध्ये आढळतात. ही दर्शने, विचारधारा व काही महत्त्वाचे प्रतिभावंत यांची यादी करावयाची झाल्यास त्यात पुढील प्रमुखांचा समावेश करावाच लागेल : वेदांत, बौद्धदर्शन, टाओ, झेन, हेरॅक्लिट्स, सेंट फ्रॅन्सिस, जॉर्डानो ब्रुनो, डँटी हे मध्ययुगापर्यंतचे; आधुनिक काळातील स्पिनोझा व त्यानंतर एकदम व्हाइटहेड, थॉरो, हायडेगर, जॉर्ज सँटिॲना, ऑल्डस हक्सली, ॲलन वॉट्स, डी.एच. लॉरेन्स, वॉल्ट व्हिटमन्, पॉल शेपर्ड, गेरी श्नायडर. जंतु-नाशकांच्या भरमसाठ वापराविरुद्ध जगभर आवाज उठवणाऱ्या 'सायलंट स्प्रिंग' या पुस्तकाच्या (१९६२) कर्त्या रॅटेल कार्लसन यांचा व तशाच कारणांसाठी 'वन स्ट्रॉ रेव्हेल्युशन' या आपल्या पुस्तकामुळे सध्या बहुचर्चित अशा मासानोबू फुकुओका या कृषिमहर्षीचा विशेष उल्लेख करावा लागेल; आणि अहिंसेचे तत्त्वज्ञान गंभीर पर्यावरण विचाराचा गाभाच असल्याने गांधीजींच्या उल्लेखाशिवाय ही यादी पुरी होणार नाही हेही उघड आहे.

गंभीर पर्यावरणविचार हे केवळ 'आणखी एक'










विज्ञान नसून शुष्क, नीतिनिरपेक्ष विज्ञानाच्या पलीकडे जाणारे एक शांत-सखोल शहाणपण (wisdom) आहे हे सूचित करण्यासाठी Naess यांनी ecosophy हा सुंदर शब्द रचला आहे. (sophy = wisdom) या संज्ञेमुळे उथळ पर्यावरण-वादाच्या केवळ सुधारणावादी मर्यादा चांगल्या स्पष्ट होतात. गंभीर पर्यावरण विचारप्रणालीमध्ये, सध्याच्या युगात टोक आलेल्या पर्यावरणाच्या कोणत्याच प्रश्नांना आपली संपूर्ण आधुनिक मूल्यप्रणालीच मुळापासून बदलल्याखेरीज आपण स्पर्शसुद्धा करू शकत नाही, याची स्पष्ट जाणीव अनुस्यूत आहे. सुधारणावादी मलमपट्टीने काही होणार नाही तर संपूर्ण वास्तवाविषयी, अवघ्या विश्वातील मानवाच्या 'खऱ्या' स्थाना-विषयी सम्यक विचार जीमध्ये असेल अशा वैचारिक-आध्यात्मिक क्रांतीच्या आवश्यकतेचे भान या विचारप्रणालीचा जणू प्राणवायू आहे.

गंभीर पर्यावरणविचार अनुसरणाऱ्या व्यक्तीला विश्वातील प्रत्येक अंशाचे बाकीच्या सर्व विश्वाशी असलेल्या अतूट नात्याचे सखोल भान आलेले असते. एक महत्त्वाची गोष्ट अशी की, हे भान केवळ आधुनिक भौतिकीतील माहितीच्या पातळीवर रेंगाळून भागत नाही तर हे भान एक प्रकारचे थेट, परा-वैज्ञानिक, साक्षात्कारी (intutive, experiential) असण्याची नितान्त आवश्यकता असते. मात्र याचा अर्थ असा नाही की त्यासाठी तपस्या,कर्मकांड यांची आवश्यकता असते. फार फार तर असे म्हणता येईल की, त्यासाठी विज्ञानवादाने ग्रस्त नसण्याची अकरणात्मक आवश्यकता असते. सत्य आकळण्याचा विज्ञान हा केवळ एक मार्ग आहे आणि त्याला स्वतःच्या मर्यादा आहेत हे खुल्या मनाने, नम्र वृत्तीने स्वीकारणे आवश्यक असते.

या दृष्टीने विचार करता एक उत्साहवर्धक गोष्ट म्हणजे वरील प्रकारचे भान कमी अधिक प्रमाणात येऊन आपली जीवनशैलीच बदलण्याचा प्रयत्न करणारे गट अमेरिका, कॅनडा, प. जर्मनी इ. देशांमध्ये निर्माण होत आहे. या प्रयोगां-संबंधीची अतिशय उद्बोधक माहिती Duane Elgin यांच्या 'Voluntary Simplicity' या पुस्तकात व F. Capra and Spretnak यांच्या 'Green Politics : The Global Promise' या पुस्तकात उपलब्ध आहे.

३

तेव्हा वरील विवेचनाच्या पार्श्वभूमीवर आपण पुढील प्रश्न उपस्थित करू शकतो : विज्ञानवादाच्या प्रभावामुळे उथळ पर्यावरणज्ञांच्या भूमिकेत असा कोणता महादोष आपोआप शिरला आहे की ज्यामुळे त्यांच्या इशाऱ्यांचे महत्त्व मान्य करत असतानाच त्यांच्याकडून फारशी अपेक्षा न बाळगण्याची सावधगिरी घेणे आवश्यक ठरावे?

उदा., वर्ल्डवॉच इन्स्टिट्यूट या संस्थेने कमी प्रदूषक संसाधनांचा उपयोग वाढवणे, पुनरुत्पाद्य इंधनांचा (उदा. लाकूड-फाटा, बायोगॅस इ.) उपयोग करणे, वस्तू एकदा वापरल्यावर फेकून न देता त्यांचा पुनरुपयोग करण्याची तंत्रे (recycling techniques) विकसित करणे, संसाधनांचे रक्षण करणे (conservation) इ. उपायांचा अवलंब सुचवलेला आहे. या मागचे सूत्र आहे ते म्हणजे मर्यादित संसाधनांच्या उपयोगाची कार्यक्षमता (resource efficiency) वाढवणे, कमी साधनांतून जास्त उत्पादन निष्पन्न करणे (More out of less = optimization). आता, 'कमीतून जास्त' हे ज्यांचे ब्रीदवाक्य आहे असे पर्यावरणज्ञ, अर्थातच, पारंपरिक अर्थशास्त्रज्ञांच्या एक पाऊल पुढे जातात हे उघड आहे. उदा., टपरी बांधण्यासाठी एखाद्याने वापरलेले पत्र्याचे टाकाऊ तुकडे, इंधन म्हणून वापरलेले शेण अशा गोष्टींना 'कमीतून जास्त' या ब्रीदवाक्यामुळे संसाधनांचा दर्जा प्रथमच प्राप्त होतो. कालव्यातून जलसिंचन करण्याऐवजी ठिबकसिंचन, उघड्या जाळीच्या चुलीऐवजी स्टोव्हज् (stoves) चा वापर, खोल नांगरटीऐवजी जमिनीच्या फुलाचे अधिक संरक्षण साधणारी नांगरट, कमी विद्युत्शक्ती वापरून तेवढाच प्रकाश देणारे बल्बज् या प्रकारचे तांत्रिक बदलसुद्धा 'कमीतून जास्त' या घोषवाक्याचेच प्रत्यक्ष आविष्कार होत. यालाच आपण 'कोंड्याचा मांडा करणे' असे म्हणतो.

पर्यावरणज्ञांनी प्रसृत केलेले बदल महत्त्वाचे आहेत की नाहीत? याचे उत्तर होय असेच द्यावे लागेल. परंतु येथे थांबता येत नाही. जी अधिक महत्त्वाची गोष्ट लक्षात घ्यावी लागते ती म्हणजे सृष्टीवर कोसळू पाहणाऱ्या संकटाचा मुकाबला करण्याची दुसरी उपलब्ध वाट पर्यावरणज्ञांनी जवळजवळ पूर्णतः उपेक्षिलेली आहे. आणि ती म्हणजे मारुतीच्या शेपटाप्रमाणे अप्रतिहतपणे वाढत चाललेल्या माणसाच्या मागण्यांचे, लालसांचे सुज्ञ असे नियंत्रण किंवा व्यवस्थापन.

पारंपरिक अर्थशास्त्रज्ञांनी विवेचिलेल्या (संसाधनांच्या उपयोगासंबंधीच्या) कार्यक्षमतेच्या तत्त्वाला थोडी आणखी धार चढवून तेच जुनें तत्त्व सृष्टी वाचविण्याचा अंतिम उपाय म्हणून मांडणें यात केवळ विचारशक्तीचा कच्चेपणा नसून पर्यावरणज्ञांच्या कल्पनाशक्तीला विज्ञानवादाच्या परंपरेने बहाल केलेला एक आनुवंशिक पांगळेपणा आहे. या पंगुत्वाचे जे भिन्न पैलू आहेत आणि त्या पैलूंमागे गृहिते आहेत ती प्रकाशात आणणे अत्यंत आवश्यक आहे; कारण तसे केले नाही तर ज्या भ्रमनिरासाच्या धक्क्यातून वाचण्यासाठी लेखाचा प्रपंच चालू आहे त्या भ्रमनिरासाचे रहस्य अनावृत्त होणार नाही.

४

मागण्याचे सुज्ञ नियंत्रण करण्याचा दुसरा मार्ग पर्यावरणज्ञ का अव्हेरतात? किंवा निराळ्या शब्दांत, त्यांच्या हातून पर्यावरणविज्ञान हे केवळ एक वरच्या दर्जाचे कार्यक्षमता विवेचन (यापेक्षा जास्त काही नाही) असे का होते? याचे कारण असे दिसते की, विज्ञानवादाच्या लघुकारक (reductionist) प्रभावामुळे पर्यावरणज्ञांनी असे गृहितच धरले आहे की, मानवी व्यवहारांकडे पाहण्याची अर्थपरायण विश्वदृष्टी (economic world-view) हीच अटळ, एकमेव व प्रागतिक विश्वदृष्टी आहे. असे गृहित धरण्याचा जो अपरिहार्य परिणाम लक्षात घ्यावा लागतो तो म्हणजे या दृष्टीने प्रभावित अशा पर्यावरणज्ञांकडून जे कार्य होत राहणार ते म्हणजे मनोवृत्तींचे, सवयींचे, संस्थांचे, मूल्यांचे जगभर पश्चिमीकरण. आणि ग्यानबाची मेख इथेच आहे; कारण एका बाजूला पश्चिमी (म्हणजे युरोपिअन) मानसिकतेचा प्रसार आणि दुसऱ्या बाजूला सृष्टीचे विध्वंसावाचून वाचणे या दोन गोष्टींमध्ये मूलभूत असा विसंवाद आहे, परस्पर व्यावर्तन आहे.

पश्चिमी मानसिकतेशी सुसंगत अशा अर्थपरायणतेच्या विश्वसृष्टीनुसार प्रत्येक समाजाचे सर्वोच्च मूल्य म्हणजे भौतिक वस्तु-सेवांचे उत्पादन व त्या मालाचा (commodities) उपभोग. त्यामुळे या दृष्टीनुसार पृथ्वीवरील सर्व समाज हे अंतिमतः आपली अर्थ यंत्रणा/अर्थव्यवस्था विस्तारण्यामध्ये आणि तिच्या व्यवहारांचा परीघ व वेग सतत वाढता ठेवण्यामध्ये गुंग असणार. एकदा अशी दृष्टी स्वीकारली की समाजजीवनाच्या एकूण व्यवहारांचा सतत वाढता हिस्सा आर्थिक व्यवहारांनी व्यापला जाणे, ही गोष्ट जिची चिंता करावी अशी आहे, याचे भानच सुटते. असे झाले की, केवळ आर्थिक अशा उद्दिष्टांपेक्षा भिन्न व उन्नत अशी समाजाची जी उद्दिष्टे असू शकतात (असायला हवीत) त्यांना अनुरूप असे उत्पादन-उपभोगव्यवहार ठेवण्याचे महत्त्व नजरेतून सुटते. ज्या अहवाल अभ्यासांचा आपण सुरुवातीला उल्लेख केला त्यातील बहुतेकांमध्ये अशी धारणा आढळते की, ज्या समाजाच्या जीवनव्यवहारांमध्ये विक्रेय मालांच्या उत्पादन-उपभोगाला, कामाच्या व्यावसायीकरणाला आणि जगण्यातल्या एकंदर धावपळीला कमी महत्त्व दिले जाते असे समाज हे जात्याच काहीतरी उणेपणा असलेले असे असतात. 'विकास' म्हणजे उत्पादनाची - उपभोगाची वेगाने वाढ; फक्त पर्यावरणावर होणाऱ्या घातक परिणामांची दखल घेऊन हे उत्पादन उपभोग व्यवहार वाढवित नेले की झाले, अशा प्रकारची भूमिका जर पर्यावरणज्ञांनी घेतली तर त्यात आश्चर्य वाटण्याचे काहीच कारण नाही.

भौतिक वस्तूंचा उपभोग (व उपभोगासाठी उत्पादन) यावरच माणसांचे समाधान, मानवी जीवनाचे श्रेय अवलंबून असते हे गृहीत धरणाऱ्या आणि म्हणूनच सतत वाढत्या मागण्यांना लगाम घालण्याच्या दुसऱ्या पर्यायांचा म्हणजेच माणसांच्या अंतर्गत विश्वाचे व्यवस्थापन करण्याच्या 'खऱ्या' पर्यायांचा विचारही मनात न येणारे पर्यावरणज्ञ सृष्टीकडे कसे पाहतात?

हा प्रश्न उपस्थित करण्याचे कारण असे आहे की, पर्यावरणज्ञ हे काही संकुचित विचार करणारे वैज्ञानिक नसतात असे आपण मानत असतो. निदान त्यांच्याकडून तरी व्यापक विचाराची अपेक्षा असते. कारण जीव (organism) व तो ज्याच्या अनुबंधित असतो असे पर्यावरण यांच्या संपूर्ण संबंधाचा सम्यक अभ्यास एका विशेष जाणीवपूर्वकतेने करणारे असे हे वैज्ञानिक असतात. आता, असे हे विशेष, एक प्रकारची नैतिकच जबाबदारी असणारे वैज्ञानिक पारंपरिक अर्थशास्त्रज्ञांच्याही पुढे एक पाऊल जातात असे आपण पाहिले आणि ज्या बाबींची गणना संसाधन (resource) म्हणून केली जात नव्हती त्यांनाही ते हा दर्जा नव्याने बहाल करतात हेही आपण उल्लेखिले. कोणाला वाटेल यात गैर ते काय? साधनांची कमतरता जर वाढत चालली असेल तर साधने या कोटीची कक्षा वाढविणे हे योग्यच आहे. परंतु हा मामला वाटतो तितका साधा नाही.

जेव्हा एखाद्या वस्तूचा, कृतीचा, व्यक्तीचा समावेश






'संसाधने ' या कोटीमध्ये केला जातो तेव्हा असे होते की त्यांना त्यांचे असे, त्यावेळचे, त्या विशिष्ट स्थानाच्या संदर्भातले महत्त्वच उरत नाही. होते काय, तर कोणाला तरी भविष्यकाळात दुसऱ्या कशासाठी तरी दुसऱ्या ठिकाणी त्याचा उपयोग होणार असतो व केवळ म्हणूनच त्याला आनुषंगिक (incidental) महत्त्व येते. झॅक्स यांनी म्हटले आहे की, सगळ्याकडे संसाधन म्हणून पाहण्यास चटावलेले मन जेव्हा एखाद्या अरण्याकडे पाहते तेव्हा त्याला तिथे इमारती लाकूड दिसते, जेव्हा ते प्रस्तरांकडे पाहते तेव्हा तिथे त्याला खनिजे दिसू लागतात, समोर पसरलेल्या भूप्रदेशाकडे पाहते तेव्हा त्यांचे प्लॉट्स पडलेले दिसतात आणि अशा 'रिसोर्सफुल' दृष्टीच्या पथात जेव्हा जिवंत माणसे येतात तेव्हा त्यांचे रूपांतर 'मानवी साधनसंपत्ती'मध्ये आपोआप होते. तेव्हा एखाद्या बाबीवर 'संसाधन' हा शिक्का पडला की तिच्या वैशिष्ट्यपूर्ण अशा स्थानिक संदर्भातून तिला उखडून काढून तिच्या नाड्या 'राष्ट्रीय उत्पादन' नावाच्या बिनचेहऱ्याच्या सत्ताधीशाच्या हातात जातात.

वस्तूंना, व्यक्तींना 'संसाधना'च्या तबेल्यात बांधल्याने नेमके काय 'होते' हे लक्षात येण्यासाठी जे समाज विक्रेय उत्पादनाच्या सपाट्यात पूर्णतः अडकलेले नाहीत अशा 'मागास' समाजातील परिस्थिती तुलनेने लक्षात घेणे आवश्यक आहे. अशा समाजांमध्ये (उदा. भारतातील आदिवासी समाजात किंवा जुन्या रेड इंडिअन समाजात किंवा आफ्रिकेतील टोळ्यांमध्ये) बाबींना, वस्तूंना त्यांचा असा एक अर्थ असतो आणि त्यामुळे राष्ट्रीय अर्थव्यवस्थेच्या विराट कॉंक्रीट मिक्सरमध्ये खेचले जाऊन 'संसाधन' होण्यापासून त्या वाचू शकतात. भारतभर पसरलेल्या देवरायांमधील वनस्पती हे त्याचे उत्कृष्ट उदाहरण आहे. या वनस्पती (झाडे, फळे, फुले इ.) 'वाटेल त्या' आर्थिक उपयोगासाठी नसत/नसतात. माणसांच्या बुभुक्षेला बळी पडण्यासाठी अमर्यादपणे उपलब्ध असण्यापासून (धार्मिक चालीरीतींच्या माध्यमातून का होईना) त्यांना एक संरक्षण असायचे/असते. जिवंत झाडे, पशु-पक्षी यांनाच नव्हे तर भूगर्भातील खनिजांनाही वैश्विक समग्र संदर्भात एक स्वतःचे परंतु इतर सर्व चराचराशी संबंधित असे महत्त्व आहे असे मानण्यातला सखोल, विज्ञानवादाच्या औद्धत्याला आकळू न शकणारा 'शहाणपणा' आपल्याला 'अनार्थिक' समाजांच्या जीवनव्यवहारांमध्ये दिसतो. उदा. खाणी या पृथ्वीमातेचे गर्भाशय असून खनिजांची त्यांमध्ये गर्भासारखीच सावकाश वाढ होत असते असे या समाजात मानले जाते.

**यूरपमधल्या प्रबोधन युगानंतर आधुनिक विज्ञान, तंत्रज्ञान, हव्यासकेंद्री व्यक्तिवाद, औद्योगिक भांडवलशाही व राजकीय लोकशाही या ज्या निरनिराळ्या गोष्टी आल्या व त्यांतून जो पश्चिमी अर्थवाद पसरू लागला (व जो विसाव्या शतकातल्या समाजवादी देशांमध्येही अपरिहार्यपणे शिल्लक राहिला) त्या अर्थवादाच्या रेट्याखाली जणू वस्तू व व्यक्तींची ही संरक्षक कवचे भेदली गेली. अशा पद्धतीने असाहाय्य झालेल्या वस्तू व व्यक्तींना अनार्थिक समाजांमध्ये जी एक प्रतिष्ठा होती किंवा असते ती अर्थप्रधान समाजात अशा पद्धतीने नष्टप्राय झाली.**

५

"दुसऱ्याचा उपयोग केवळ साधन म्हणून करणे म्हणजे अनैतिकता' हे कांटचे मत लक्षात घेतले तर अर्थप्रधान विश्वदृष्टीला शिरोधार्य मानणे म्हणजेच कोणत्याही नीतिविचाराला रजा देण्याचे ठरविणे असा अर्थ होतो. पर्यावरणज्ञांनी या नीतिनिरपेक्षतेची दिशा स्वीकारली आहे हे वरील विवेचनावरून स्पष्ट होते. आणि ते पर्यावरणवादाचा विचार करताना लक्षात घेणे नेहमी जरूरीचे राहील. परंतु याआधीच सुचविल्यानुसार हेही लक्षात ठेवणे आवश्यक आहे की, पर्यावरणज्ञांनी नीति-निरपेक्षतेची दिशा स्वीकारणे यात आश्चर्यकारक असे काही नाही; कारण त्यांच्यात आणि पारंपरिक अर्थशास्त्रज्ञांच्या तात्त्विक बैठकीत विज्ञानवादाच्या समाईक प्रभावामुळे कोणताच फरक नाही. म्हणून तर उथळ पर्यावरणज्ञदेखील, आपण वर पाहिल्यानुसार, वाढत जाणाऱ्या मागण्यांच्या नियंत्रणाचा, म्हणजेच संयमाचा पर्याय लक्षातसुद्धा घेत नाहीत. ही गोष्ट पर्यावरणज्ञांच्या अभ्यास-अहवाल इत्यादींमध्ये आढळणाऱ्या आणखी एका मुद्द्यात एका निराळ्या पद्धतीने अधोरेखित होताना दिसते. त्या मुद्द्याच्या विवेचनामध्ये अर्थप्रधान अशी पश्चिमी विश्वदृष्टी व पर्यावरण-ज्ञांनी हिणकस ठरविलेली अर्थगौण विश्वदृष्टी यांच्यातील भेद अधिकच स्पष्ट होतो. तेव्हा आता तिकडेच वळू या.

प्रा. श्रीमती जोन रॉबिन्सन यांनी एका ठिकाणी फार भेदकपणे असे म्हटले आहे की, ॲडम स्मिथच्या पठडीतील निर्हस्तक्षेपनीतीचा पुरस्कार करणाऱ्या अर्थशास्त्रज्ञांनी 'प्रत्येक व्यक्तीने आपला स्वार्थ साधण्याचा प्रयत्न केला तर सर्वांचे हित आपोआप साधले जाईल असा युक्तिवाद करून, जणू,

नीतीचा प्रश्न रद्दच करून टाकण्याचा चंग बांधला होता.'

या पठडीशीच आपली निष्ठा पक्केपणाने बाळगून असणाऱ्या पर्यावरणज्ञांनी काय केले?

'चांगले जीवन म्हणजे अधिकाधिक मालाचे उत्पादन' हे पश्चिमी मूल्य अधिकाधिक समाजांमध्ये पसरल्यामुळे, आर्थिक वृद्धीची आंतरराष्ट्रीय शर्यत सुरू झाली व परिणामतः पाणी, जमीन, खनिजे इ.गोष्टी, ज्या आधी विपुल वाटत होत्या त्यांना प्रचंड प्रमाणात मागणी निर्माण होऊन त्यांची वाढती कमतरता भासू लागली व त्यातूनच सृष्टी टिकून राहण्याविषयीची आजची समस्या निर्माण झाली. ह्या वास्तवाबद्दल थोड्या संकोचाने का होईना, परंतु पर्यावरणज्ञांनी जगाला सावध केले. World Resources Institute च्या १९८७च्या अहवालात पहिल्याच पानावर असे म्हटले आहे की 'जागतिक पर्यावरण हे, ज्यातला प्रत्येक घटक इतर प्रत्येकाशी अनुबंधित असतो अशा एखाद्या जाळ्यासारखे आहे. मानवजात या पर्यावरणावर अवलंबून आहे. आणि म्हणून माणसाने या पर्यावरणाचे शहाणपणाने व्यवस्थापन केले पाहिजे.' या उद्धृतातील 'म्हणून' हा जो शब्द आहे तो अतिशय बोलका आहे. लोकसंख्यावाढीमुळे आपोआप सतत वाढणाऱ्या एवढेच नव्हे तर प्रयत्नपूर्वक वाढविल्या जाणाऱ्या (जाहिराती व तत्सम उतर सर्व प्रकारच्या डावपेचांचा वापर करून) मागण्यांमुळे संसाधनांची कमतरता निर्माण झाली व त्यातून सृष्टीच न टिकण्याच्या शक्यतेचे संकट निर्माण झाले. परंतु पश्चिमी विश्वसृष्टीच्या या मुळांकडे लक्ष द्यावयाची गरज पर्यावरणज्ञांना वाटत नाही असे दिसते. संकट निर्माण झाले आहे, संसाधने अधिकाधिक दुर्मिळ होत आहेत आणि मानवजात त्या दुर्मिळ होत जाणाऱ्या संसाधनांवर अवलंबून आहे हे गृहीत धरा आणि पुढे चला. पर्यावरणज्ञांचा दृष्टिकोण निराळ्या शब्दांत असा मांडता येईल : मानवी मागण्या या फक्त एकाच गुणधर्माने युक्त असतात आणि तो म्हणजे त्यांचा मुळातलाच, स्वयंसिद्ध असा अमर्यादपणा (ends are inherently endles) आणि हा अमर्यादपणा हा त्रिकालाबाधीत सत्य असल्याने तो गृहीत धरून टाका. साधनांच्या कमतरतेचा प्रश्न हा मानवजातीच्या टिकून राहण्याचा (survival) प्रश्न आहे, तो एक मानवजातीचा अंगभूत अटळ प्रश्न आहे हे प्रथम वेदवाक्याप्रमाणे स्वीकारा आणि म्हणून पर्यावरणाच्या सुज्ञ व्यवस्थापनाचा विचार हा एकमेव उपाय म्हणून मान्य करून टाका. जणू काही माणसाने संसाधनांचा एकांगी विचार करण्याऐवजी मागे वळून आपल्या इच्छांकडेही (चिकित्सक मूलगामी असा) दृष्टिक्षेप टाकला तर ग्रीक मिथ्यकथेतल्या ऑर्फियसप्रमाणे तो त्याचे ईप्सित कायमचे हरवून बसेल!

पारंपरिक अर्थशास्त्रात, संसाधने ही निसर्गतःच मर्यादित व मानवी गरजा या निसर्गतःच अमर्याद असे जे गृहीत धरले जाते व त्या पार्श्वभूमीवर 'संसाधनांच्या कार्यक्षम व्यवस्थापनाची समस्या म्हणजे आर्थिक समस्या' असे जे सूत्र मांडले जाते व हा नियम गुरुत्वाकर्षणाच्या नियमासारखा असल्याचे जे श्रद्धापूर्वक प्रतिपादले जाते - त्यामधील 'अवैज्ञानिकता' किंवा 'अनैतिहासिकता' ही अशी सूर्यप्रकाशासारखी स्वच्छ आहे. संसाधनांची कमतरता/दुर्मीळता व त्यातून निर्माण झालेले सृष्टीवरील संकट या गोष्टी सृष्टीच्या इतिहासातील एका विशिष्ट टप्प्यावरील, एका विशिष्ट, म्हणजे, पश्चिमी संस्कृतीच्या विश्वदृष्टीतून निर्माण झालेल्या गोष्टी आहेत, त्या त्रिकालाबाधीत (गुरुत्वाकर्षणासारख्या) नाहीत हे सत्य पारंपरिक अर्थशास्त्राच्या प्रमुख प्रमेयातून आग्रहाने व्यवस्थित नजरेआड केले जाते.

याचा परिणाम काय होतो? याचा परिणाम असा होतो की, पश्चिमी जीवसृष्टीनुसार न चालणारे समाज असू शकतात आणि त्या समाजामध्ये काही इतर समस्या असल्या तरी (जसे अंधश्रद्धा, जातपात इ.) संसाधने संपवून टाकून मानवजात व सृष्टीच नष्ट करण्याची अंतिम स्वरूपाची 'किमया' नाही, या वस्तुस्थितीकडे पारंपरिक अर्थशास्त्र व त्याचीच री अधिक सुबकपणे ओढणारा पर्यावरणवाद काणाडोळा करतो; एवढेच नव्हे तर अशा समाजांना ही विज्ञाने 'मागास' समजतात!

थोडासा अधिक विचार केल्यानंतर एक मजेदार गोष्ट लक्षात येते ती अशी की, 'टिकून राहण्याचा' प्रश्न कोणाला (आणि कोणामुळे) पडला आहे तर, ज्या समाजांनी माणसाच्या संपूर्ण इतिहासात कधीही नव्हते असे दैदिप्यमान उत्पादक कर्तृत्व दाखवले आहे अशा समाजांना; जे समाज मंद गतीने भौतिक 'कुंठितावस्थेत' फारशी धावपळ न करता, फारशी वसवस न करता, वस्तुपिसाट न होता, 'विकास' वगैरे फारसा न साधता बऱ्यापैकी समाधानाने जगतात अशा अकर्तृत्ववान समाजांपुढे 'टिकून राहण्याचा' प्रश्न उभा राहत नाही!

श्री. झॅक्स यांनी या बाबतीत एक अत्यंत मर्मदर्शी








मुद्दा मांडला आहे. तो असा की, आधुनिक पश्चिमी समाज (आणि त्यांचा प्रभाव पडलेले इतर समाज) जर सोडले तर 'टिकून राहणे' हे परम उद्दिष्ट म्हणून स्वीकारणारे समाज इतिहासात फारसे पाहायला मिळत नाहीत. आपत्काळात (दुष्काळ, प्लेग, युद्ध) टिकून राहण्याचा आटापिटा अर्थातच प्रत्येक समाज करतो. तो प्रत्येक जीवाचा व म्हणून समुदायांचा गुणधर्मच असतो. परंतु 'टिकून राहणे' हे क्षणोक्षणीचे परमउद्दिष्ट करण्याचे आणि सर्व समाजाचे व्यवहार त्या उद्दिष्टाच्या पुर्तीच्या दृष्टीने संघटित करण्याचे दुर्भाग्य फक्त अतिसंपन्न, चंगळवादी अशा पश्चिमी समाजांच्याच वाट्याला आले आहे! अ-पश्चिमी समाजांमध्ये 'जिवंत राहणे' व त्यासाठीच्या कृती हा एक प्रकारचा 'बाय-प्रॉडक्ट' असतो. समाजातील बाकीच्या अधिक मूल्यवान, महत्त्वाच्या उद्दिष्टांच्या पूर्तीच्या प्रक्रियेत जे आपोआप साधले जातच असते किंवा साधले जावे असे ते, एका अर्थाने गौण उद्दिष्ट असते. त्याला जाणीवपूर्वक परमउद्दिष्टाचे स्थान दिलेले नसते. ("Survival... was not an explicit concern, but a given banality." : Sachs)

अ-पश्चिमी समाजांमध्ये टिकून राहण्याची प्रक्रिया 'समस्ये'चे रूप का घेत नाही या प्रश्नाचे उत्तर आपल्याला काहीसे पुढीलप्रमाणे देता येईल : सृष्टीची सहनशीलता अगदी शेवटच्या बिंदूपर्यंत ताणण्यासाठी लागणारी हव्यासवृत्ती या समाजांमध्ये नसते. याउलट, पश्चिमी समाजांचे हव्यासवादाच्या प्रभावाखालील जीवननियंत्रक सूत्रच मुळी पुढीलप्रमाणे मांडावे लागेल : 'माणसाचे भले होणे म्हणजेच त्याच्या मालकीच्या संपत्तीत सतत वाढ होणे (Well-beingis Well-having).' या सूत्रावर आधारित जीवनशैली ही परिणामांची क्षिती न बाळगता बिनदिक्कतपणे सृष्टीचे दोहन करण्यास मागेपुढे पाहणार नाही हे उघड आहे. अ-पश्चिमी समाजांना हा एकांगी, अतिरेकी अर्थपरायणतेचा कर्करोग जडलेला नसतो. मानवेतर सृष्टीबद्दल त्यांची वृत्ती बेपर्वा झालेली नसते.

पश्चिमी व अ-पश्चिमी समाजांमधील या भेदाचा एक फार वेगळाच मजेशीर परिणाम आपल्याला दिसतो. उत्पादनवाढीच्या उद्दिष्टाने ग्रस्त असे अतिहिशेबी पश्चिमी समाज ज्या बाबींची निर्मिती करणार नाहीत अशा कित्येक सुंदर, भव्य, उदात्त, लावण्यपूर्ण बाबींची निर्मिती अ-पश्चिमी समाज सहजगत्या करून जातात. प्राचीन व मध्ययुगीन भारतातील देवालये, अजंठा-वेरूळसारखी कलामय लेणी किंवा आधुनिकपूर्वकाळात बांधली गेलेली फ्रान्समधील कथीड्रल्स यांसारख्या बाबींची निर्मिती ही उत्पादनग्रस्त आधुनिक समाजात 'वाढण्याचा अकार्यक्षम उपयोग' या सदरात मोडेल. पश्चिमी समाजातील उत्पादनाच्या प्राधान्यक्रमातील ही विकृती (perversityin the scale of priorities) लक्षात घेतल्यास, 'टिकून राहण्याच्या' उद्दिष्टाच्या अर्थाचे सहजी लक्षात न येणारे पदर आपोआप उलगडू लागतात.

६

भव्य वास्तू, लेणी अशा गोष्टी क्षणभर बाजूला ठेवल्या आणि अनेक अ-पश्चिमी समाजांतील कुटुंबांचे आणि कुटुंबातील व्यक्तींचे नेहमीचे दैनंदिन जीवन जर लक्षात घेतले तर आपल्याला काय दिसते? या समाजाच्या / कुटुंबाच्या / व्यक्तींच्या व्यवहारांना अर्थपरायणतेने ग्रासलेले नसते. त्यामुळे, पश्चिमी, निकषांनुसार जरी त्यांचे वर्णन 'अविकसित', दरिद्री असे होऊ शकले तरी माणसाच्या काही आर्थिकेतर स्वरूपाच्या मूलभूत गरजा भागण्याच्या दृष्टीने आणि मानवतेवर सृष्टीशी सहचर्याचे नाते राखण्याच्या दृष्टीने हे व्यक्तिसमूह व त्यांतील व्यक्ती अधिक निकोप, सुज्ञ जीवन जगत असतात असे मान्य करणे भाग पडते.

पारंपरिक / अपश्चिमी समूहातील जीवनव्यवहार सर्व दृष्ट्या आदर्श असतात असे या ठिकाणी अजिबात सुचवायचे नाही. अंधश्रद्धा, घराणेशाही क्रौर्य व तदनुषंगिक अवगुण या समाजात असतात हे आपल्याला माहीत आहे. परंतु पश्चिमी पूर्वग्रह बाजूला ठेवून विचार केल्यास तथाकथित 'अप्रगत' अशा समाजांच्या व्यवहारांमध्ये, पश्चिमी मूल्यांच्या प्रभावाने ग्रस्त अशा समाजांनी शिकण्यासारखेही खूप असते हे लक्षात येते आणि पर्यावरणीय संकटांच्या संदर्भात तर या गोष्टीला एक विशेष असे महत्त्व प्राप्त होते. तेव्हा, इतिहासाच्या घड्याळाचे काटे मागे फिरवण्याचा प्रश्न जरी नसला तरी, पश्चिमी मूल्यांच्या रोडरोलरपासून या ना त्या कारणाने वाचलेले असे हे जे 'रेंगाळलेले' समाज आहेत त्यांच्याकडून जे काही शिकण्यासारखे असेल त्याला वस्तुपिसाट समाजांनी वंचित होण्याचे काहीच कारण नाही, असा मुद्दा आहे.

अर्थपरायणतेच्या शर्यतीत मागे पडलेल्या अनेकानेक जनसमूहांच्या दैनंदिन जीवनशैलीत आधुनिकांना शिकण्यासारखे असे काय आहे?

पारंपरिक जनसमूहांतील प्रातिनिधिक घरकुलाच्या व्यवस्थापनाचे मुख्य उद्दिष्ट स्वयंनिर्भरता हे असते. म्हणजेच घरातील व्यक्तींचे एकूण स्वास्थ्य हे 'बाहेरच्या' जगातील आर्थिक व्यवहारांवर शक्यतो अवलंबून न ठेवणे हे असते. खरेदी-विक्रीचे व्यवहार शक्यतो किमान ठेवण्याकडे कल असतो. सुरक्षितता हेही एक मुख्य उद्दिष्ट असल्याने निर्वाहासाठी लागणाऱ्या सर्व वस्तू/सेवा घरातल्या घरातच निर्माण करण्याचे धोरण असते. अशीच बरीचशी घरकुले असलेल्या समाजात एकंदरीतच खरेदी-विक्री व्यवहारांतील अमर्याद अवलंबन, सूक्ष्म विभागणी, अतिविशेषीकरण व त्यातून वाढत जाणारी आर्थिक कार्यक्षमता या मूल्यांना गौणत्व येते. अशा घरकुलांनी बनणाऱ्या ग्रामसमाजाला दैनंदिन निर्वाहासाठी 'ग्रामस्वराज्या' पलीकडे फारसे पाहावे लागत नाही. ही घरकुले बचत करण्याचा जरूर प्रयत्न करतात. परंतु या बचतीचा उद्देश बचतीमुळे साधणारे स्वावलंबन एवढाच असतो; निरनिराळ्या क्षेत्रांत गुंतवणुकीच्या संधी शोधत आर्थिक मुलुखगिरी करून इतर व्यक्तींना, प्रदेशांना, मानवेतर निसर्गाला वेठीला धरून, पादाक्रांत करून अप्रतिहत भौतिक कर्तृत्व गाजविण्याचा नसतो. अशा पारंपरिक कुटुंबांमध्ये नवनव्या वस्तू एक व्यसन म्हणून विकत घेण्याकडे फारसा कल नसतो तर वारशाने आलेल्या जुन्या वस्तूच अभिमानाने, प्रेमाने जतन केल्या जातात, मितव्यापी व संयमी वृत्तीला सन्मानाने, आदराने वागविले जाते. अशा कुटुंबांनी बनणाऱ्या समाजातील अनेक वहिवाटींना, रूढींना, लोकव्यवहारांना हिशेबी अर्थशास्त्रीय दृष्टिकोणातून पाहिले असता उधळामाधळीचे, अकार्यक्षम, अपव्ययी असे म्हणता येईल. परंतु एका निराळ्या विश्वदृष्टीने त्यांच्याकडे पाहिले असता आपल्याला या संदर्भातले आपले निवाडे बदलावे लागतील. उदा. गोवऱ्या किंवा इतर किरकोळ उपयोग जळणाची शेकोटी पेटविणे हे, त्या शेणाचा उपयोग गोबरगॅस संयंत्रामध्ये करून उष्णता निर्माण करण्यापेक्षा कदाचित अधिक खर्चिक व कमी कार्यक्षम असेल; परंतु शेकोटी करून त्याभोवती आपल्या सहकाऱ्यांसमवेत बसून ज्या गप्पाटप्पा आणि अकृत्रिम स्नेहसंबंधातील जी ऊब सामान्य शेतकऱ्याला मिळते तिच्यापुढे गोबरगॅसने होणारी श्रमबचत ही किरकोळ ठरते. एका सखोल अर्थाने या दोन गोष्टींची तुलना करणे हीच गोष्ट गर्हणीय ठरते. खरे तर, इथे दोन प्रकारच्या संस्कृती आणि विश्वदृष्टीमधला फरकच उभा ठाकतो आणि त्यांमधील कोणत्या तरी एका संपूर्ण संस्कृतीची निवड करण्याच्या प्रसंगाला आपल्याला सामोरे जावे लागते.

अ-पश्चिमी संस्कृतीचे प्रधानमूल्य कार्यक्षमता हे जरी नसले (पैसा, श्रम आणि उत्पादनाचे पर्यावरणीय परिणाम यांच्या हिशोबाच्या भाषेत) तरी अशा संस्कृतीतील व्यक्तींच्या कृती अपरिणामकारक असतात असे मात्र नाही. जसे शेकोटीभोवती बसून भौतिक ऊब आणि मानवी संबंधांची ऊब हा.संपन्न परिणाम साधला जातो; किंवा दुकानातून पापड विकत घेण्याऐवजी एकमेकींकडे जाऊन पापड लाटण्याचे काम केल्याने पापड तयार होतातच शिवाय पुष्कळसे पैशात न मोजता येणारे सौहार्द आणि समाधान हा माणसाच्या काही सखोल गरजा भागविणारा परिणामही साधला जातो. तेव्हा अपश्चिमी अशा समाजात कार्यक्षमतेऐवजी परिणामकारकता (effectiveness in place of efficiency) या गोष्टीला अधिक महत्त्व दिले जाते आणि उत्पादनाच्या अरुंद, एकांगी, रुक्ष आणि अंतिमतः सर्व सृष्टीवरच संकट कोसळविणाऱ्या रस्त्यापेक्षा जीवनाचा प्रवास अधिक सौम्यपणे, आस्थेवाईकपणे होण्याची व्यवस्था केली जाते.

७

वरील विवेचनातून असे स्पष्ट व्हावे की पर्यावरणज्ञांची जमात (किंवा पर्यावरणीय काळजी घेऊन आर्थिक विकास कसा साधावा याविषयीचा शुष्क तांत्रिक सल्ला देणाऱ्या 'ईको-डिव्हेलपर्स'ची जमात) ही केवळ प्रदूषणाचे धोके कसे टाळावे इ. गोष्टीच सांगून थांबत नाही. संपूर्ण जगाचा विकास पश्चिमी जीवनदर्शनाच्या अनुरोधाने होण्यास प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष मदत ही जमात करत असते. झॅक्स यांचा पुढील इशारा म्हणूनच फार महत्त्वाचा वाटतो. 'पर्यावरणज्ञांची परिभाषा लोकांच्या मनात जितकी खोल रुजेल तितके त्यांना निसर्गाकडे आदराने बघणे कठीण होत जाईल, सर्वांचे हित साधणारी एक संस्था या दृष्टीने समाजाकडे बघणे कठीण होईल आणि आपल्या स्वतःच्या कृतींचा विचार चलाख परंतु सर्वनाशी कार्यक्षमतेच्या ऐवजी एका सखोल सद्‌गुणाच्या (Virtue) भाषेत करणे दुरापास्त होत जाईल.'

पर्यावरणज्ञांनी तंत्रज्ञान व नैतिकता यांपैकी तंत्रज्ञानाची निवड केल्याने त्यांच्या खऱ्या स्वरूपाबद्दल स्वतःला सावध करण्याची आवश्यकता ही अशी निर्माण झाली आहे. अगदी साध्या शब्दांत म्हणजे, पर्यावरणज्ञ हे ॲलोपॅथीची

नितांत श्रद्धेने प्रॅक्टिस करणाऱ्या डॉक्टरांसारखे आहेत. हे डॉक्टर जसे औषध देतात परंतु पथ्य-कुपथ्य वगैरेंचा संयम करावयाला रोग्याला सामान्यतः सांगत नाहीत (म्हणजे सगळी भिस्त जशी तांत्रिक उपायांवर - techno Fixes वर - टाकतात) तसेच पर्यावरणज्ञ किंवा इको-डिव्हेलपर्सही माणसांच्या गरजांमध्ये जीवनपोषक गरजा व जीवनविरोधी गरजा (एरिक फ्रॉमच्या भाषेत valid wants a non-valid wants) असा भेद करू इच्छित नाहीत असे दिसते. सध्याच्या युगात मुद्दाम निर्माण केल्या जाणाऱ्या व व्यक्तीला चंगळवादी (consumerist) बनविणाऱ्या गरजा या तिला समाधानाकडे, तिच्या मानव्याकडे घेऊन न जाता केवळ उत्तेजित करतात, भडकवितात, विमनस्क व त्यामुळे हिंसक बनवितात व त्यातूनच मुख्यतः सर्व सृष्टी नष्ट करण्याची शक्यता निर्माण करतात हे ओळखण्याचा सरळपणा व धैर्य (वा दोन्ही) पर्यावरणज्ञांमध्ये अभावानेच आढळते असे खेदाने म्हणावे लागते.

खऱ्या ('सखोल') पर्यावरणज्ञाने हे ओळखायला हवे की, 'संसाधनांच्या उपयोगातील कार्यक्षमता वाढवित राहणे' हा 'अप्रोच' प्रथम अनावश्यक करणे आवश्यक आहे आणि त्यासाठी 'कार्यक्षमता' हे जिचे मुख्य अंगच नाही अशा मानवी संस्कृतीची जोपासना करणे, तिचा प्रसार करणे, आवश्यक आहे. अशा संस्कृतीत एरिक फ्रॉमने आपल्या To Have or to Be या ग्रंथात केलेल्या विवेचनानुसार, हव्यासवृत्तीच्या स्पष्टपणे विरोधी असा पवित्रा घ्यावा लागेल आणि त्यासाठी एकूणच पश्चिमी 'दर्शन' (paradigm) हे त्याज्य ठरवावे लागेल.

हे जर केले नाही, म्हणजेच बुद्ध आणि गांधींच्या यथाशक्य सखोल अहिंसात्मक दृष्टीने आपण आधुनिक जगाकडे पाहिले नाही आणि चुकून उथळ पर्यावरणज्ञांकडेच जर आपण या सृष्टीचे खरे तारणकर्ते म्हणून पाहत राहिलो, तर मानवी संस्कृती टिकणार नाहीच; परंतु ज्या निसर्गाला माणसाच्या गेल्या दोनशे वर्षांतील प्रमादापासून वाचविण्याचा प्रयत्न पर्यावरणज्ञ करू म्हणताहेत तो निसर्गदेखील त्यांच्याच विश्व-दृष्टीच्या उथळपणामुळे धोक्यात येण्यावाचून राहायचा नाही.

'Zen and the Art of Motorcycle maintainance' या तत्त्वज्ञानात्मक कादंबरीत एका टप्प्यावर जे खाली उद्धृत केलेले भाष्य आहे ते, फार साध्या परंतु समर्थ शब्दांत सध्याच्या पर्यावरणवादाची मूलभूत मर्यादा सूचित करते.

'Arete implies a respect for the wholeness of life and a consequent dislike of specialization. It implies a contempt for efficiency... or rather a much idea of efficiency, an efficiency which exixts not in one department of life but in life itself... And now he (Phaedrus) began to see for the first time the unbelievable magnitude of what man, when he gained power to understand and rule the world in terms of dialectical truths, had lost. He had built empires of scientific capability to manipulate the phenomena of nature into enormous manifestations of his own dreams fo power and wealth - but for this he had exchanges an empire of understanding of equal magnitude :an understanding of what it is to be a part of the world, and not an enemy of it.'

मुक्तीचा आश्वासक आभास निर्माण करणाऱ्या परंतु वस्तुतः विनाशाकडे मानवाची होणारी वाटचाल अधिकच वेगवान करणाऱ्या विज्ञानग्रस्ततेचे पर्यावरणवादापेक्षा अधिक चपखल उदाहरण नसावे या माझ्या धारणेचा बराचसा खुलासा वरील विवेचनात आला आहे अशी माझी समजूत आहे.

### काही पूरक निरीक्षणे

प्रस्तुत लेखात मांडलेल्या मुद्द्यांचा अधिक खुलासा होण्याच्या दृष्टीने पुढील निरीक्षणांचा उपयोग होईल असे वाटते.

१. पश्चिमी विश्वदृष्टीचा स्वीकार केल्याने अनेक गोष्टींचे संरक्षक कवच कसे भेदले जाते व संसाधनांच्या बाजारात त्या कशा खेचल्या जातात याचे एक उत्कृष्ट उदाहरण म्हणजे निसर्गरम्य स्थळांचे पर्यटनस्थळांमध्ये केले जाणारे रूपांतर. साताऱ्याजवळच्या 'कास' नावाच्या जलाशयाचा शांतरम्य परिसर आणि गुजरातेतील बोर्डीचा समुद्रकिनारी भाग यांच्याकडे पर्यटनखात्याची विषारी दृष्टी वळली आहे हे गेल्या वर्षभरातील बातम्यांतून अनेकांना समजले असेल. यावरून, 'स्थळां'चे

स्थानिकत्व नष्ट करून, त्यांच्या अनन्यत्वाचा भंग करून त्यांना असाहाय्य द्रौपदीसारखे जागतिक पर्यटकांच्या बाजारू दरबारात खेचण्याची प्रक्रिया हा भारतीय शासनाने पश्चिमी दृष्टीचा आंधळा स्वीकार करण्याचा परिणाम आहे हे स्पष्ट व्हावे.

पश्चिमी विश्वदृष्टीच्या प्रभावातून स्वाश्रयी संस्था (Voluntary agencies) सुद्धा सुटत नाहीत असे आढळते. समाजसेवक म्हणून मिरवणाऱ्या अनेक व्यक्तींशी बोलताना असे आढळते, की ग्रामीण भागातील ज्या व्यक्तींशी त्यांचा संबंध येतो त्यांच्याकडे हे समाजसेवक 'संसाधने'म्हणूनच पाहत असतात. एक व्यक्ती तर असे म्हणाल्याचे मला स्मरते की, दारिद्र्य, अज्ञान, अंधश्रद्धा इ. समस्या जर नसत्या तर यांचे विकासाचे प्रकल्प चालवता आले नसते आणि प्रकल्पाच्या नावाखाली जे पैसे मिळतात तेही मिळाले नसते!

२. पूर्व युरपमध्ये गेले वर्षभर जे घडत आहे ते, समाजवादाचा बुरखा घेतलेल्या राजवटींमधील दमनयंत्रणा उघडी पडण्याच्या दृष्टीने आणि मानवी हक्कांच्या पुनःप्रस्थापनेच्या दृष्टीने जरी उपकारक असले तरी सृष्टी टिकून राहण्याच्या दृष्टीने बहुधा धोकादायक ठरावे असे वाटते.

याचे कारण असे की, या सर्व देशांतील नागरिक त्या देशांच्या नोकरशाहीप्रधान अर्थव्यवस्थांच्या अकार्यक्षमतेमुळे एक प्रकारच्या वखवखलेल्या परिस्थितीत आहेत. दूरदर्शनवर पूर्व युरपमधील देशांचे जे दर्शन आपल्याला घडते ते भौतिकदृष्ट्या चांगल्या संपन्न समाजांचे दर्शन आहे. परंतु ही संपन्नता त्यांना संपन्नता वाटत नाही कारण त्यांचे संपन्नतेचे प्रमाण हे पश्चिमी देशांतील सुबत्ता, रेलचेल हे आहे. त्यामुळे, या देशांमध्ये बहुपक्षीय लोकशाही प्रस्थापित झाल्यावर काय होणार तर आतापर्यंत आर्थिक अकार्यक्षमतेमुळे दडपला गेलेला चंगळवाद (consumerism) आता उफाळून येईल व त्याची सोय बाजारयंत्रणेच्या सर्रास वापरातून वाढणाऱ्या आर्थिक कार्यक्षमतेमुळे केली जाईल. म्हणजेच पूर्व युरपमध्ये पश्चिमी विश्वदृष्टीचा स्वीकार उघडउघडपणे आणि अधिकच अश्लाघ्यपणे (with avengence) आता केला जाईल. या सोसाट्यात सृष्टीच्या टिकण्याचे उद्दिष्ट पालापाचोळ्यासारखे उडून देखील जाऊ शकेल.

३. पश्चिमी विश्वदृष्टीचा हा प्रसार जवळ जवळ अप्रतिहतपणे होण्याचे कारण कोणते असा थेट मुळाशी जाणारा प्रश्न उपस्थित केल्यास जे उत्तर द्यावे लागेल त्याची थोडी रूपरेषा पुढीलप्रमाणे मांडता येईलसे वाटते :

टी.ए. हॅरिस यांनी लिहिलेल्या 'I AM OK YOU ARE OK' या विख्यात पुस्तकात Transactional Analysis या मानसचिकित्सेचे तात्त्विक व व्यावहारिक विवेचन आहे. या चिकित्सापद्धतीनुसार प्रत्येक व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वात एक Child, एक Parent व एक Adult असतो. यातील 'बालक' हे मुख्यतः भावनांच्या कल्लोळाचे प्रतिनिधित्व करते; 'पालक' हा अंधपणे स्वीकारलेल्या आदर्श कल्पनांचे प्रतिनिधित्व करतो; तर 'प्रौढ' हा चिकित्सक सारासार विवेकाची निर्णयकाची भूमिका पार पाडतो.

ही परिभाषा वापरून आपल्याला असे म्हणता येते की, अचिकित्सकपणे स्वीकारलेल्या आदर्श कल्पना त्या त्या परिस्थितीला अनुरूप नसलेल्या भावभावना यांचा प्रभाव निर्णय घेणाऱ्या 'प्रौढ' या घटकावर पडला तर निर्णयप्रक्रिया दूषितहोते. व्यक्तीच्या संदर्भातील हे निरीक्षण संपूर्ण समाजांना/राष्ट्रांना/संस्कृतीलाही कमी-अधिक प्रमाणात लागू करता येते. तसे केल्यास आपण असे म्हणू शकतो की, उत्पादन-उपभोग या क्रियांमध्येच अडकून राहणारी आणि त्यापलीकडे पाहू न शकणारी पश्चिमी विश्वदृष्टी ही 'दूषित प्रौढा'ची किंवा एकांगी विचार करणाऱ्या पालकाचे आदर्श जसेच्या तसे मानणाऱ्या बालकाची म्हणजे 'बालवत' (म्हणजेच बावळट) अशी मनोवस्था सूचित करते.

यामध्ये 'जितकी जास्त संपत्तीची निर्मिती तितके मानवी सुख अधिक' (More is better) या परंपरारूपी 'पालका'कडून आलेल्या आदेशाचा अचिकित्सित स्वीकार दिसतो; तसेच त्यामध्ये 'माझ्याजवळ तुझ्यापेक्षा जास्त' किंवा 'टुक् टुक् माकड आम्ही खातो पापड' या प्रकारची मूलतः दुःखी व असुरक्षित असणाऱ्या 'बालका'ची चिंताग्रस्त, स्पर्धाग्रस्त व त्यामुळे चिडखोर अशी भाववृत्तीही दिसते.

दुर्दैव असे की, या दोन प्रभावांमुळे दूषित झालेली जीवनदृष्टी ही मूलतः पर्यावरण समस्येच्या, सृष्टी टिकून राहण्याच्या समस्येच्या मुळाशी आहे हे भान पर्यावरणज्ञांमध्ये दिसत नाही. किंवा दिसल्यास ते फारच क्षीण किंवा क्षमायाचक (apologetic) स्वरूपात दिसते. त्याला श्री. माधव गाडगीळ यांच्यासारखे भारतीय पर्यावरणज्ञही अपवाद ठरत नाहीत. (Seminar च्या जानेवारी १९९० च्या अंकातील त्यांचा

एरवी चांगला असा लेख पहावा.)

मला जे सन्माननीय अपवाद आढळले ते म्हणजे ते म्हणजे सेमिनारच्याच वर उल्लेखिलेल्या अंकातील श्रीमती राधिका हर्झबर्गर यांचा लेख (Living Lightly On Earth) व पेट्रा के. केली यांचा 'Gandhi marg' च्या जुलै-सप्टेंबर १९८९ च्या अंकातील लेख (Gandhi and the Green Party). या लेखातील विचारांचा निराळेपणा थोडक्यात पुढीलप्रमाणे मांडता येईल :

(अ) श्री. हर्झबर्गर यांच्या शिक्षणव्यवस्थेवरील लेखात त्यांनी असे प्रतिपादले आहे की सृष्टीच्या टिकण्यासाठी मानवाने सृष्टीवर टाकलेला आत्यंतिक भार खूप कमी करण्याची आवश्यकता आहे आणि हे मूल्य व्यक्तींच्या वृत्तीत व वर्तनात रुजविणे हे शिक्षणव्यवस्थेचे आद्य कर्तव्य झाले पाहिजे. मानवासकट सृष्टीतील सर्व घटकांचे परस्परावलंबित्व शिक्षणातून विद्यार्थ्यांच्या स्पष्टपणे लक्षात आले पाहिजे व संयम, काटकसर, अहिंसा आणि सहकार या गुणांच्या जोपासनेखेरीज मानवाचे सर्व प्रयत्न कसे निरर्थक आहेत हे बिंबवले गेले पाहिजे. शिक्षणव्यवस्था या दिशेने बदलण्याचे ध्येय म्हणजे स्पर्धाप्रधान पश्चिमी विश्व दृष्टीला शह देण्याचे ध्येय आहे हे स्पष्ट आहे. हर्झबर्गर यांच्या मते भारताच्या प्राचीन परंपरेत हा शह देण्याचे सामर्थ्य कसे आहे हे आपल्याला दोन गोष्टींमध्ये दिसून येते. त्या गोष्टी म्हणजे : एक, ज्ञानार्जन व स्वास्थ्यसंपादन (learning and healing) यांसाठी निसर्गात राहण्याच्या आवश्यकतेचे प्राचीन भारतीयांचे तीव्र भान (गुरुकुल पद्धतीने अरण्यातील आश्रमांमध्ये अध्ययन-अध्यापनाची व्यवस्था); व दोन, हिताचा किंवा कल्याणाचा विचार करताना फक्त मानवाचा विचार न करता सर्व चराचर सृष्टीचा विचार करण्याची आवश्यकता (सम्राट अशोकाच्या शिलालेखांवरील सूचना).

(आ) श्री. पेट्रा केली (युरोपियन शांतता चळवळीतील एक अग्रणी व 'ग्रीन पार्टी'शी फार जवळून संबंधित) यांनी ग्रीन पार्टी च्या सदस्यांना असा स्पष्ट इशारा दिला आहे की, 'अहिंसा हे केवळ तत्त्व नसून तो एक प्रत्यक्ष जगण्याचा मार्ग आहे, अशी श्रद्धा जर आपल्यामध्ये निर्माण झाली नाही तर आपला पक्ष विश्वासार्हताच गमावून बसेल.'

सृष्टी वाचण्याच्या दृष्टीने संपूर्ण सामाजिक संर... आणि अभिप्रेरणा (motivation) बदलण्याची आवश्य... प्रतिपादताना पेट्रा केली यांनी वैयक्तिक जीवनातील बदल... भर दिला आहे. आणि त्या संदर्भात 'प्रौढत्वाचा गाभा' म्हणजे, म. गांधींनी नमूद केलेल्या पुढील सात गोष्टी टाळण्यात मिळवलेले यश, असे सांगितले आहे. त्या सात गोष्टी म्हणजे:

तत्त्वशून्य राजकारण,
विवेकशून्य सुखोपभोग,
श्रमाविना संपत्ती,
चारित्र्याविना ज्ञान,
नीतिशून्य वाणिज्य,
अमानुष विज्ञान आणि
त्यागशून्य उपासना.

काही 'व्यावहारिक' सूचनांच्या स्वरूपात त्यांनी ग्रीन पार्टीच्या सदस्यांना असे आवाहन केले आहे, की सदस्यांनी आपला उपभोग अशा पद्धतीने बदलावा की ज्यामुळे मोठ्या उद्योजकांच्या मालाला मागणी कमी होईल; ज्यामुळे इतर देशांच्या साधनसंपत्तीत आपला हक्क नसताना आपण वाटेकरी होणार नाही.

अशी काही आवाहने केल्यावर पेट्रा केली यांनी एक अत्यंत महत्त्वाचा इशारा दिला आहे की 'प्रत्यक्षातले संकट आणि त्यावरील संभाव्य उपाय हे काही कोठे 'बाहेर' उपलब्ध नसतात. संकटेही आणि उपायही आपल्या 'आत'च असतात. या जगात आपल्या स्वतःच्या वर्तनाची जबाबदारी आपणच घेणे ही जवळजवळ एकमात्र गोष्ट अशी आहे की जी पूर्णपणे आपल्या आधीन असते.'

जो आणखी एक महत्त्वाचा विचार पेट्रा केली यांनी मांडला आहे तो म्हणजे कोणतेही शासन हे हिंसाचारीच असल्याने ग्रीनपार्टीसारख्या चळवळीला शासनाचा भाग बनून चालणार नाही. अशा चळवळीने सरकारच्या विरोधातच राहून शांततापूरक, अहिंसात्मक रचनात्मक कामे विकेंद्रित पद्धतीने करत राहिले पाहिजे.

❖❖❖

या लेखातील तटस्थ सूक्ष्म विवेचनाचा 'अस्त की नवोदय' या विषयाचा अभ्यास करू इच्छिणाऱ्या सर्वांनाच प्रारंभ बिंदू म्हणून उपयुक्त होऊ शकेल.

- (दे-दा)

# विकासाची भावी दिशा

वसंत पळशीकर

तंत्रविज्ञानाच्या क्षेत्रातील अगदी अलीकडील घडामोडींमुळे उच्चतंत्रविज्ञानाचा आधार घेऊन विकेंद्रित अर्थव्यवस्थेची निर्मिती करता येण्याची शक्यता निर्माण झाली आहे. उदाहरणार्थ, 'फ्युचर शॉक' या पुस्तकामुळे जगद्विख्यात झालेले लेखक ॲलविन टॉफलर यांनी 'इलेक्ट्रॉनिक कॉटेज' ची कल्पना त्यांच्या 'द थर्ड वेव्ह' या पुस्तकामध्ये मांडली. उत्पादन हे गावोगाव व घरोघर विखुरलेल्या स्वरूपात, लहान आकाराच्या यंत्रावर करता येईल; आणि तरीही तंत्रवैज्ञानिकदृष्ट्या ते आधुनिकतम व उच्च तंत्राधारित केलेले उत्पादन असेल, असे आश्वासन या नव्या व्यवस्थेत आहे. 'थर्ड वेव्ह' या पुस्तकाच्या एका प्रकरणाचे शीर्षक 'गांधी वुईथ सॅटेलाइटस्' असे आहे. गांधीप्रणीत ग्रामस्वराज्याच्या निर्मितीच्या दृष्टीने अत्यंत अनुकूल अशी ही घडामोड आहे असे वाटून आपण आत्मसंतुष्ट वृत्तीने उच्चतम अत्याधुनिक तंत्राचा पुरस्कार करायला लागू असा धोका आहे. म्हणून या नव्या मांडणीच्या पार्श्वभूमीवर आपल्या भूमिकेची स्पष्टता करून घेण्याची गरज आहे.

अशी स्पष्टता करून घेण्याआधी व्यवहाराच्या पातळीवरील एक वस्तुस्थिती ध्यानात घ्यायला हवी. आपल्या रोजच्या वापरातल्या व अत्यावश्यक या सदरात मोडणाऱ्या कितीतरी वस्तू वा सेवा या केंद्रीभूत उद्योग व प्रशासनयंत्रणेवर आधारित आहेत याचा विचार मनात आणा. स्वयंपाक करण्यासाठी आज गॅस वा केरोसिन यांचा वापर सार्वत्रिक केला जातो. या दोन्ही गोष्टींचे उत्पादन राष्ट्रीय वा आंतरराष्ट्रीय पातळीवरच केले जाते. ते विकेंद्रित स्वरूपात करता येण्याच्या शक्यता जवळपास शून्य आहेत. आपली वाहतूक व्यवस्था घ्या. शहरांच्या वाढत्या आकारमानामुळे कामधंद्यासाठी पेट्रोलवर चालणारे स्वतःचे दुचाकी वाहन बाळगण्याची गरज उत्पन्न झाली आहे. एरवीही बस, रेल्वे यांच्यावरील अवलंबन वाढले आहे. शहरांमध्ये बहुतेक सर्वच इमारती काँक्रीट वापरून बांधल्या जात आहेत. त्यासाठी पोलाद हवे, जे मोठ्या कारखान्यांमध्ये तयार होते. असे आपण अनेकानेक तपशील भरत जाऊ शकू. केंद्रीभूत अवजड, पायाभूत उद्योगांवरील व तंत्रविज्ञानावरील आपले अवलंबन इतके सर्वव्यापी व सर्वस्पर्शी आहे की विकेंद्रीकरणाची आशा हे भाबडे स्वप्नरंजन वाटते. विकेंद्रित ग्रामस्वराज्याची गोष्ट करणाऱ्यांच्या स्वतःच्या जीवनसरणीकडे बोट दाखवून या विचाराची अव्यवहार्यता पटवून देणे तसे फार सोपे आहे.

'इलेक्ट्रॉनिक क्रांती'मुळे विखुरलेल्या स्वरूपात घराघरांतून सुट्या भागांचे उत्पादन करण्याची पद्धती भविष्यकाळात प्रचारात येईल अशी शक्यता पुष्कळ अधिक आहे. पण आपल्या घरात बसून उत्पादन करणारी व्यक्ती ही स्वतःचा उद्योग चालविणारी मालक व्यक्ती असेल असे क्वचितच असेल. शक्यता अशी आहे की, ज्या यंत्रावरती काम करीत असेल ते यंत्र, उत्पादनासाठी लागणारा कच्चा माल यांचा पुरवठा करणारा व उत्पादित पक्का माल विकत घेणारा उद्योजक/उद्योगसमूह मोठ्या शहरात असेल. तो टेलिफोन-टेलेक्सवरून श्रमिकाला संदेश देईल आणि त्याच्या कामाचे नियंत्रणही करील. श्रमिकाच्या कामावर डोळ्यांत तेल घालून देखरेख करण्याची, त्याच्यावर वचक बसविण्याची एके काळी फार गरज होती. स्वयंचलित यंत्राचा प्रशिक्षित मदतनीस अशी त्याची भूमिका बनू लागली असल्याने त्याच्या घरात काम करू देण्यास फार अडचण आता उरली नाही. पण घरी काम करीत असला तरी तो कामगारच असतो आणि व्यवस्था केंद्रितच राहते.

ग्रामस्वराज्याची गोष्टही अशीच आहे. राष्ट्र-राज्य (नेशन-स्टेट) ही रचना तुम्हाला अमान्य आहे का, स्वराज्य उपभोगणारे ग्राम कोणत्या बृहद् व्यवस्थेचे घटक असेल, अशा उच्चतर पातळीवरील समावेशक विशाल रचनेचे भौगोलिक क्षेत्र किती लहान वा मोठे असेल व तिचा कारभार कसा चालेल, या प्रश्नांची उत्तरे अशीच अवघड आहेत. कारण राष्ट्र-राज्य ही रचना स्वीकारली की अनेक गोष्टींचे केंद्रीकरण हे स्वाभाविक व आवश्यक बनणार, ते कसे टाळता येईल, असे विचारले जाणारच. राष्ट्राचे संरक्षण कसे करणार? हा याच मालिकेतला एक प्रश्न असतो.

असे तर नाही, की विकेंद्रीकरण, स्वावलंबन, ग्रामस्वराज्य या शब्दांमुळे विचारांमध्ये नेमकेपणा वा स्पष्टता

अनुक्रमणिका






उत्पन्न होण्याऐवजी स्पष्टतेच्या आडच ते येत आहेत? याचे एक कारण असे असेल की भूतकाळाच्या परिचित प्रतिमांच्या साहाय्याने भविष्याचे चित्र रेखाटण्याचा प्रयत्न होतो. समाजाला भूतकाळात नेण्याचा हा सारा कार्यक्रम आहे असे ऐकणाऱ्यास/वाचणाऱ्यास वाटते. हे कसे शक्य आहे, असा प्रश्न तर त्याच्या मनात येतोच; पण त्याला भूतकाळात जाण्याची इच्छापण नसते.

वरीलसारखे परवलीचे शब्द न वापरता भविष्यातील वाटचालीची दिशा स्पष्ट करण्याचा प्रयत्न करण्याचे येथे मनात आहे.

पृथ्वीवर स्वर्ग निर्माण करता येईल या खात्रीने जी वाट आपण धरतो ती थोड्याच काळात आपणास कडेलोटापर्यंत नेणार आहे याचे भान ही यापुढच्या काळात मूलगामी समाज परिवर्तनाची सर्वात प्रबळ प्रेरणा राहणार आहे. सर्वसंहारक महायुद्धाच्या कायम उपस्थित असलेल्या धोक्यापासून स्वतःची सुटका करून घेणे निकडीचे बनले आहे; तसेच वस्तुवैपुल्य व (संकुचित अर्थाचा) सुखोपभोग यांच्या हव्यासातून मानवजातीने आपली सोडवणूक करून न घेतल्यास महायुद्धाइतकेच विनाशकारी संकट ओढवू शकते हे भान वाढत चालले असल्याने, 'चिरस्थायी विकास' (सस्टेनेबल डेव्हलपमेंट) ही क्रांतिकारी संकल्पना प्रभावी बनली आहे. अगदी वेगळी वाट आपण धरायला हवी याविषयी एकवाक्यता वाढत आहे.

वेगळी वाट जी धरावयाची तिची निवड करताना मुख्य मुद्दे कोणते लक्षात ठेवावयाचे, कोणत्या श्रेयासाठी वाटचाल करावयाची? असे लक्षात येते की, मानवी व्यक्तित्वाची सफलता आणि परिपूर्ती कशात आहे याविषयीची धारणा बदलली आहे. योग्य, सम्यक् स्वरूपात अनुबंधित असण्याचे महत्त्व ध्यानात येत आहे. स्वतःशी, इतरेजनांशी व निसर्गाशीही. अहंपणा व स्वत्व यांतील भेदही आज अधिक ध्यानात आलेला आहे. सत्य अभिव्यक्त व्हायचे असेल तर माणसाचे सर्व व्यवहार व ते व्यवहार ज्या चौकटींमध्ये होतात त्या चौकटी यांचा आकार, प्रमाण आणि मांडणी माणसाला गुदमरवून टाकणारी असता कामा नये. सत्ता, मत्ता व प्रतिष्ठा प्राप्त करण्यासाठी स्पर्धेत उतरण्याचे, यश संपादन करण्याचे स्वातंत्र्य प्रत्येकास असावे, सर्वांना समान संधी मिळावी, या गोष्टीवर सर्वांचे समान मूलभूत हक्क आहेत या प्रतिपादनाचा रोख माणसाला वेगळ्या दिशेने नेणारा ठरला. अहंपणाच्या जोपासनेतच विकास, सत्यप्रकटन अंतर्भूत आहे, अशी धारणा रुजविणारे हे प्रतिपादन ठरले. व्यक्तिमत्त्व रसाळ व गोमटे व्हावयाचे असेल तर 'स्व'चा परिपोष व 'स्व'चे प्रकटन आणि 'अहं'ची जोपासना व त्याचा आविष्कार यांतला भेद सतत ध्यानात (व वागण्यात) राखला गेला पाहिजे हे पण आज उमगले आहे. वस्तुवैपुल्य, त्या वैपुल्याच्या उपभोगातून मिळणारे सुख माणसाला मुक्त, स्वतंत्र करण्याऐवजी गुरफटवून टाकते. दैनंदिन जीवनाचे अवडंबर इतके वाढते की त्याच्या भोवतीचे पाश जास्त आवळले जातात. याचीही अनुभूती वाट वेगळी कोणत्या बाबतीत असावी याचे सूचन करते.

कालच्यापेक्षा आज आणि आजच्यापेक्षा उद्या या पद्धतीने माझी (वा माझ्या समाजाची/राष्ट्राची) सधनता, सत्ता व प्रतिष्ठा वाढली पाहिजे, इतरांच्या तुलनेत मी अधिक वरचढ ठरलो पाहिजे, ही प्रेरणा उरली नाही; विकासाचे, प्रगतीचे वा सुखीपणाचे ते गमक नाही असे एकदा ठरले की, आधुनिक व्यवस्थेची व संस्कृतीची मुख्य आधाराची वीट काढून घेतल्यासारखे होते. 'हे हवे, तेपण हवे, आणि नित्य नवे काही ना काही हवे' या मागणी/आकांक्षेऐवजी, 'हे हवेच का, ते कशासाठी हवे, त्याचा नेमका उपयोग काय?' असे प्रश्न एकदा माणूस विचारू लागला की त्याची वाट मूलतः वेगळी झाली म्हणून समजा. 'चिरस्थायी विकासा'च्या संकल्पनेतही वाढ अध्याहृत आहे, पण वेगळी वाट धरल्यावर भर चिरस्थायीपणावर वाढेल व विकासाचा आणि वस्तुवैपुल्याचा संबंध व्यस्तपण होऊ शकेल.

सामाजिक-राष्ट्रीय पातळीवर आम्हाला नित्य अधिक सत्तावान, मत्तावान व्हायचे नसले, इतर राष्ट्रांशी त्यावरून आमची स्पर्धा वाढली नसली तर राष्ट्र-राज्याच्याही अस्तित्वाचा व कार्याचा एक मूलाधार नष्ट होतो असे लक्षात येईल. मग एका टप्प्यावर देशांतर्गतही अनेकविध क्षेत्रांत राज्यसत्तेने स्वतःकडे जी कामे व अधिकार घेतले आहेत त्यांना आव्हाने उपस्थित होतील. देशांतर्गतही अनेक व्यवहारांचे जे केंद्रीकरण आढळते ते त्या व्यवहारांच्या सुकरतेच्या वा परिणामकारकतेच्या दृष्टीने आवश्यक म्हणून अस्तित्वात आलेले नसते. अंतिम निर्णयाचा अधिकार कोणाचा, सत्ता कोणाची याच्याशी त्याचा संबंध असतो. उदाहरणार्थ, सहभागी लोकशाहीच्या दृष्टीने राज्यकारभार लोकभाषेत चालावा हे इष्ट आहे; पण सर्व मराठी भाषिकांचे एकच राज्य असावे हे आवश्यक आहे का? आज संघराज्यात्मक रचनेच्या अंतर्गत आपण राज्याराज्यांमध्ये काही वेगळेपण राहील असे गृहीत धरतो. हेच वैविध्य एकेका समूहाच्या अंतर्गत असायला वास्तविक काय हरकत आहे? किंबहुना विभिन्न निसर्गव्यवस्था (इकोसिस्टिम) असलेल्या

प्रदेशांमध्ये त्या त्या निसर्गव्यवस्थेला अनुरूप वैशिष्ट्यपूर्ण वेगळी व्यवस्था प्रादेशिक तत्त्वावर हवी, थोडक्यात, देशांतर्गत राज्यकारभाराच्या बाबतीतही, 'देशभर एकछत्री अंमल' या गोष्टीचे आकर्षण नष्ट होईल तर जीवन अनेकदृष्ट्या कितीतरी अधिक सुकर होईल.

२

माणसाचे व्यक्तित्व व त्याचे अनुबंध या तशा दोन वेगळ्या गोष्टी नाहीत. सुसंस्कृत, उन्नत व मुक्त व्यक्तित्व प्रत्येक माणसास लाभावे यासाठी तीन गोष्टींची पायाभूत आवश्यकता आहे. एक अन्न-वस्त्र-निवारा या स्वरूपातल्या प्राथमिक गरजांची किमान पूर्तता; दोन, व्यक्ती म्हणून त्याला घडविणाऱ्या, त्याला अस्मिता प्राप्त करून देणाऱ्या, त्याला आकार देणाऱ्या समुदायाचे अस्तित्व; आणि तीन, समुदायामध्ये त्याला सन्मान व प्रतिष्ठा प्राप्त करून देणाऱ्या, त्याचे व्यक्तिमत्त्व आविष्कृत करणाऱ्या भूमिका व तदनुषंगिक कार्ये. या तीन ऐहिक गोष्टी एक ना एक आध्यात्मिक मूल्य व श्रेयकल्पनांच्या कोंदणात बसवाव्या लागतात, आणि विश्वाच्या उत्पत्तीसंबंधी व दैनिक घडामोडींमागील चालक शक्तीविषयीची एक ना एक धारणा ही मूल्ये व श्रेयकल्पना यांच्या मुळाशी असायला लागते.

ज्या तीन ऐहिक गोष्टी आहेत त्यांचे स्वरूप स्थानिक व विशिष्ट असणे आवश्यक आहे. 'वसुधैव कुटुंबकम्' असा घोष करीत असताना देखील माणूस अशा अमूर्त विश्वव्यापी कुटुंबाच्या कल्पनेने समाधान पावत नाही. कुटुंब, नातीगोती, जात-जमात, गाव-समाज, मित्रपरिवार, पंथ-संप्रदाय अशा स्थानिक व विशिष्ट समुदायांची रचना ही त्याची गरज असते. इतरांनी वेगवेगळ्या भूमिका पार पाडीत, कामे करीत जर मला आयुष्यभर पोसायचे म्हटले, मला कोणतीच क्रियाशील, प्रौढ भूमिका व काम राहिले नाही तर समाजात माझी संभावना दुबळा, अपंग, वाया गेलेला, चुकार, विकृत, वेडा अशा प्रकारे होते. म्हणजे आत्मसन्मान व प्रतिष्ठा दोन्ही दृष्ट्या प्रत्येक प्रौढ व सक्षम व्यक्तीला स्थानिक व विशिष्ट अशी अर्थपूर्ण भूमिका व कार्य असायला लागते. या भूमिका व कार्य पार पाडण्यातून त्याच्या अन्न-वस्त्र-निवारादि प्राथमिक गरजांची पूर्तता व्हायला लागते.

ऐहिक पातळीवरील तीन गरजांची पूर्तता करणारा समुदाय हे ऐहिक जीवनाच्या संघटनेच्या व संरचनेच्या दृष्टीने पायाभूत एकक ठरते. आणि 'ग्राम' हा शब्द वापरतो तेव्हा, भावी काळाच्या संदर्भात, शेती व उद्योग यांच्याभोवती उभारलेला समुदाय (कम्युनिटी) असे आपणास म्हणावयाचे असते. असा ग्राम-समुदाय स्थानिक व विशिष्ट असला तरी दुसऱ्या टोकाला तो एका व्यापक रचनेचा एक घटक-समुदाय भविष्यात राहणार आहे. गरज आहे ती या दोन टोकांमध्ये गतिमान समतोल प्रस्थापित करण्याची व राखण्याची. माणसांच्या समूहाला ग्रामसमुदायाचे रूप प्राप्त व्हावयाचे असेल तर आर्थिक-औद्योगिक, राजकीय-प्रशासकीय, सामाजिक-सांस्कृतिकदृष्ट्या वजनदार संघटन आवश्यक आहे. अनेकपदरी घनिष्ट अन्योन्य संबंधांमधून समुदायपण प्राप्त होते व टिकून राहते. सुसंस्कृत, उन्नत व मुक्त व्यक्तित्वाच्या परिपोषासाठी ऐहिक जीवनाचे संघटन मानवाला झेपेल/पेलेल अशा आकारमानाच्या स्थानिक व विशिष्ट समुदायांमध्ये होण्याची गरज पटली तर, आणि पटेल तेव्हा मानवजात वेगळी वाट धरेल अशी सुचिन्हे दिसत आहेत.

ग्राम-समुदायाचे संघटन वजनदार ठरवायचे असेल तर दैनंदिन जीवनाच्या ओघात, पायाभूत ऐहिक गरजांच्या पूर्ततेसाठी माणसांना आपल्या ग्राम-समुदायाच्या परिघाबाहेर कमीतकमी जावे लागेल अशी रचना व व्यवस्था करण्याची गरज राहील. पृथ्वी ते ग्रामसमुदाय या दोन टोकांमध्ये अनेक वर्तुळे असतील व या प्रत्येक वर्तुळाशी आपल्या स्वतःमध्ये केंद्रस्थानी स्थिर राहून ग्रामसमुदाय सक्रियपणे व घनिष्टपणे जोडलेला असेल, अनुबंधित असेल. याचाच अर्थ जो तो ग्रामसमुदाय हव्या त्या वाटेने तसे जायला मोकळा असणार नाही. एकसारखेपणा नसला तरी एकात्मता असावी लागेल.

आजच्या जगात एकात्मतेच्या ऐवजी एकसारखेपणावर भर आहे. अर्थव्यवस्था, राज्यव्यवस्था यांचा एकछत्री अंमल प्रस्थापित करण्यामधून व जास्तीतजास्त एकसारखेपणा निर्माण करून एकात्मता साधण्यावर भर आहे. सत्ता, मत्ता व प्रतिष्ठा यांचे केंद्रीकरण साधावयाचे तर याच पद्धतीने सारे जग एक करणे आवश्यक बनते.

पण एकात्मता साधण्याची दुसरी रीत असू शकते. हिचे तीन भाग भविष्यात असतील. माझ्या ग्रामसमुदायात राहात असतानाही सर्व जगाशी जोडणाऱ्या तंत्रवैज्ञानिक साधनांची सहज उपलब्धता व रचना हा एक भाग असेल. वेगवेगळ्या समुदायांमध्ये अनेक वस्तूंची व सेवांची देवाणघेवाण कमीअधिक प्रमाणात चालेल. हा एकात्मता निर्माण करणारा दुसरा भाग. मूल्ये, श्रेयकल्पना यांवर आधारित नैतिक-सांस्कृतिक विचार-व्यूहाद्वारे जे एकात्मपणे जोडले जाणे घड[illegible] तो तिसरा भाग राहील.

अनुक्रमणिका

आजही वरील तीन भाग कार्यरत आहेत असे म्हणता येईल. फरक कोणता असेल? आज ग्रामसमुदायाचे अस्तित्व उखडले जात आहे, तर व्यक्तित्वाच्या निकोप परिपोषाच्या दृष्टीने आपण ग्रामसमुदायाचे संघटन वजनदार व भरीव करण्यावर भर देत आहोत. दैनंदिन जीवन चांगल्या प्रकारे जगण्यासाठी समुदायाबाहेर लांब-लांबपर्यंत जाण्याची, व्यापारी वा प्रशासकीय स्वरूपाचे संबंध ठेवण्याची गरज क्रमीत कमी पडावी या दिशेने प्रयत्न राहील.

३

आजचे बरेचसे प्रश्न सर्व क्षेत्रांत अवडंबर वाढवीत राहण्यामधून गुंतागुंतीचे बनले आहेत. सत्ता-मत्ता व प्रतिष्ठा यांचा हव्यास, सुखासमाधानासाठी वस्तुवैपुल्याची आकांक्षा, वीढ व विकास यांविषयीच्या प्रचलित संख्यात्मक धारणा, अशांमधून अवडंबर वाढत जाते. अर्थ व उद्योगव्यवस्था, राज्यकारभार, शिक्षण व संशोधन, अशा सर्व क्षेत्रांतले अवडंबर हे माणसाच्या माणूसपणाचा संकोच करते. मोठ्या यंत्रणा, त्यांतील नोकरशाही व तिचे माणूस-निरपेक्ष व्यवस्थापन या गोष्टी अवडंबरापोटी निर्माण होतात व त्या स्वतः एक अवडंबरच असतात. समाजव्यवस्था व संस्कृती यांना जडलेला हा एक गंभीर रोग आहे. या गोष्टी जगभर विचारी माणसांच्या ध्यानी आल्या आहेत.

दैनंदिन जीवन साधे राखण्यातून मिळणारी मोकळीक, स्वतंत्रता व स्वस्थता यांमधून मानवी प्रतिभेच्या हर प्रकारच्या आविष्काराला सर्वात अधिक प्रेरणा व अवसर मिळतो. साधे जीवन जगायचे ठरवले तर त्या जीवनाची निश्चिती देण्याची व्यवस्थाही अधिक सुलभपणे करता येऊ शकते हा सामाजिक पातळीवरील अधिकचा फायदा आहे.

स्थानिक व विशिष्ट परिसरात ग्रामसमुदाय व पंचक्रोशी या वर्तुळात साध्या दैनंदिन जीवनाची निश्चिती माणसांना मिळाली तर अर्थ-उद्योगव्यवस्था, राज्य व प्रशासन-व्यवस्था, वाहतूक व दळणवळणव्यवस्था, शिक्षण व संशोधन-व्यवस्था अशा आजच्या अनेक व्यवस्थांवरचा बोजा किती कमी होईल याची कल्पना करा, मग या व्यवस्थांच्या वजनाखाली माणसेही भरडली जायचे थांबेल. पृथ्वी या टोकापर्यंतच्या बाहेरील, विशाल वर्तुळांशी माणसे जोडली जातील ती जास्त करून मनाने, विचाराने, विशेष आवडीनिवडींनी, विशेष कारणांनी वगैरे.

महात्मा गांधींनी खेडे हा केंद्रबिंदू व त्याभोवतीची वर्तुळे (ओशियानिक सर्कल्स) अशी रचना कल्पिली होती. त्या प्रतीकाची अर्थपूर्णता ध्यानात येते.

४

इष्ट व आदर्श दिशेने परिवर्तन घडून येण्याची शक्ती कोणती राहील, असे प्रश्न व्यवहारात महत्त्वाचे असतात.

अद्यापही जगभर वरचढ शक्ती केंद्रीकरणाच्या दिशेने काम करणाऱ्याच आहेत. युरोपातील राष्ट्र-राज्ये एकत्र येऊन एक 'महा'राष्ट्र-राज्य स्थापण्याच्या प्रयत्नात आहेत. बहुराष्ट्रीय कंपन्यांचे प्रस्थ वाढत आहे. जगभर महाकाय महानगरे अस्तित्वात येत आहेत. वरकरणी तरी वेगळी वाट धरली जाण्याची शक्यता फारशी दिसून येत नाही.

सत्ता, मत्ता व प्रतिष्ठा व नित्य वाढते सुखोपभोग यांच्यात माणसांचे मन अद्यापही गुंतून पडलेले आहे. केवळ श्रीमंतांचेच, सत्ताधारी राजकारण्यांचेच नव्हे तर सामान्य, गरीब, शोषित, पीडितांचेही.

आणि तरीही, 'झिरो ग्रोथ'ची भाषा आज गांभीर्याने केली जात आहे. मोठमोठ्या कारखान्यांमध्ये एकाच जागी प्रचंड उत्पादन करण्याची गरज उरलेली नाही ही गोष्ट लक्षात घेऊन पुनर्रचनेची भाषा सुरू झालेली आहे. औद्योगिक क्रांतीच्या पुढच्या टप्प्यावर खनिज तेल, कोळसा ही इंधने बाद ठरणार, जलविद्युतही भरवशाची नाही हे जाणून, अणुऊर्जेचे विनाशकारी स्वरूप पाहून सौरऊर्जेच्या, वनस्पती-प्राणिजन्य ऊर्जेच्या वापराची योजना केली जात आहे. पण हे सगळे घडून यावयाचे असेल तर चंगळवादाची कास सोडायलाच हवी, नित्य नव्या 'गरजा' उत्पन्न करणे व मग त्या पुरविण्यासाठी नाना उद्योग व सेवा उभ्या करण्याचा उपद्व्याप थांबवायला हवा असे अधिकाधिक जोर देऊन म्हटले जात आहे. तात्पर्य असे की, आजच्या व्यवस्थेच्या सूत्रधारांचाही, ती व्यवस्था संचलित करीत असता-नाही, त्या व्यवस्थेच्या अधिष्ठानावर विश्वास उरलेला नाही. गतेतिहासात डोकावून पाहिले तर असे आढळते की सत्तेच्या केंद्रस्थानी असणाऱ्या मंडळींचा व्यवस्थेवरचा विश्वास उडतो हे मूलगामी विघटन व संघटनाची घडामोड जवळ येत असल्याचे लक्षण असते. आपण ज्या व्यवस्थेमध्ये वरिष्ठ आहोत व सर्व विशेषाधिकार व सुखे उपभोगत आहोत त्या व्यवस्थेचे पापाचे घडे भरत आले, शंभर अपराध पूर्ण होत आले अशी भावना वाढीस लागते. त्या व्यवस्थेचे नैतिक प्रामाण्य नष्ट होते. व सत्ताधारी वर्गाचा आत्मविश्वास विरून जातो. वरकरणी व्यवस्थेची ताकद शिगेला पोचत आहे, व्यवस्था अभेद्य आहे असे दिसत






असते, पण तो देखावा असतो. आतून डोलारा पोकळ झालेला असतो.

नजीकच्या भविष्यात दोन बदल शिखरस्थानी होऊ लागताना दृष्टोत्पत्तीस पडतील. 'उत्पादनवाढ - नफा - भांडवली गुंतवणूक - आणखी उत्पादनवाढ - नफा' हे चक्र फिरण्याची गती मंदावेल; कारण हे चक्र वाढत्या वेगाने फिरविण्यातला आत्मघातकीपणा नजरेआड करणे सधन राष्ट्रांनाही परवडणारे राहिलेले नाही. दुसरा बदल, शस्त्रास्त्रस्पर्धेच्या क्षेत्रात घडून येईल. जागतिक महायुद्ध कसेही करून टळले पाहिजे हे बंधन बड्या सत्तांनी गेली सुमारे ४५ वर्षे पाळले आहे. आज त्यांच्या ध्यानात येत आहे की, शीतयुद्ध चालू ठेवण्याचीही खरे तर गरज नाही. परस्परांवरील अविश्वास हाच अडसर आहे. भांडवलशाही, साम्यवाद या आयडिऑलॉजी खरे तर तितक्या परस्परांपासून भिन्नही नाहीत. स्वार्थी हितसंबंधांची स्पर्धा, चुरस आहे; पण त्यासाठी आण्विक महायुद्धाचे सावट सतत आपल्यावर पांघरून घेण्याची गरज नाही. सत्ता व मत्ता या क्षेत्रांमधील ही दोन महाचक्रे सधन, बड्या राष्ट्रांमध्ये एकदा गरगर फिरेनाशी झाली की जीवघेण्या, अमानुष ताणामधून मुक्त होत असल्याचा जो प्रसन्न व शांत अनुभव येईल त्यामुळे वेगळ्या वाटेने वाटचाल करण्याची इच्छा तीव्र बनेल आणि निर्धार पक्का होईल.

आर्थिक विकास व समृद्धी यांच्यासाठी 'तिसऱ्या जगा'तील देश 'पहिल्या व दुसऱ्या (-भांडवलशाही पाश्चिमात्त्य - जपान व सोविएत रशिया) जगा'वर कायमचे कर्जात बुडण्याइतके परावलंबी बनले आहेत. त्यांच्या देशांमधील साधनसंपत्ती आणि माणसे विकावयास काढूनही कर्जबाजारीपणा कमी होत नाही. एवढे करूनही रोजगार, किमान जीवनमान, समता, शांत व निवांत जीवन यांची उपलब्धी सामान्यांना करून देण्याच्या दिशेने पाऊल पुढे पडत नाही. नियोजनबद्ध आर्थिक विकासाच्या 'संमिश्र' मार्गास प्रामाणिक निष्ठेने वाहून घेतलेल्या सज्जन व्यक्तींना सत्याला सामोरे जाणे अलीकडे भाग पडत आहे. सधन पाश्चिमात्त्य साम्यवादी राष्ट्रांतील समाजांची भडवेगिरी (pimp) करण्याची भूमिका आपणाकडे आली आहे; व आपली सारी मिजास व सुखे त्याची किंमत म्हणून आपण उपभोगीत आहोत. भडव्याला असतो त्यापेक्षा वास्तविक आपणास सन्मान व प्रतिष्ठा जास्त नाही हे लौकरच 'तिसऱ्या जगा'तील उच्चशिक्षित, व्यावसायिक, प्रशासक, तज्ज्ञ व विचारवंत मंडळींच्या जेव्हा ध्यानात येईल तेव्हा त्यांच्यापैकी सज्जन व चोख प्रामाणिक माणसे स्वतःच्या भरवशावर विकास घडवून आणण्याचा स्वाभिमानाचा स्वदेशी मार्ग शोधण्यासाठी पेटून उठतील. [ओ.पी. विजयन् यांची 'द सागा ऑफ धर्मपुरी' (पेंग्विन बुक्स इंडिया, दिल्ली) ही कादंबरी जरूर वाचायला हवी.]

खेड्यापाड्यातल्या सर्वसामान्य माणसाला त्याच्या राहत्या गावाच्या आसपास रोजगार द्यायचा असेल, त्याचे दारिद्र्य दूर करीत असतानाच पर्यावरणाचे संरक्षण व संवर्धन करावयाचे असेल आणि त्याचाही कर्त्या व्यक्तीच्या भूमिकेतून सहभाग मिळवावयाचा असेल तर नगर जिल्ह्यातील राळेगण-सिद्धी, औरंगाबाद जवळील आडगाव या गावांच्या वाटेने जावयास हवे हे स्पष्ट आहे. आजची राजकीय, प्रशासकीय चौकट, तिची नोकरशाही यंत्रणा व यमनियमांचे जंजाळ हे सारेच अवडंबर झारीच्या तोंडातील शुक्राचार्यासारखे वाट रोखणारे आहे हे ध्यानात आलेले आहे. पंतप्रधान राजीव गांधी यांचे संकल्पित पंचायत राज्य घटनादुरुस्ती विधेयक हा केवळ राजकीय स्टंट मानणे योग्य नाही. राजकारणी डावपेचांचा भाग त्यात जसा काही प्रमाणात आहे तशी, बोजड बनलेल्या, स्वतःच्या भाराखाली ग्रामीण जनतेला भरडणाऱ्या शासनाचे (राजकारणी + नोकरशाही) स्तोम व अवडंबर कमी करायला हवे याची कबुली पण आहे.

विचार, उच्चार व आचार असे तीन टप्पे विनोबांनी सांगितले आहेत. विचाराच्या टप्प्यावरून एक पाऊल पुढे चढून उच्चाराच्या टप्प्यापर्यंत जग आले आहे. आपल्या देशातही असा बदल गेल्या ७/८ वर्षांमध्ये घडून येत असलेला आपण पाहतो. कृती सुरू होण्याचा टप्पा फार लांब नाही.

भारताच्या संदर्भात बोलावयाचे तर असे म्हणता येईल की, आज व्यासपीठ तात्त्विक वाद घालणाऱ्यांच्या ताब्यात आहे. तात्त्विक वाद घालण्याची गरज दीर्घकाळ होती ही खरीच गोष्ट आहे. अजूनही ती गरज संपुष्टात आलेली नाही. पण आता रंगमंचावर कर्तबगार, व्यवहारकुशल, संघटनानिपुण योजकांचा व प्रयोगवीर टोळ्यांचा प्रवेश होण्याची गरज आहे. शासनाच्या अखत्यारीतल्या प्रत्येक क्षेत्रात, प्रत्येक पातळीवर सत्ता व मत्ता यांच्या केंद्रीकरणाच्या, सर्वत्र एकसारखा प्रमाण (युनिफॉर्म) एकछत्री अंमल प्रस्थापित करण्याच्या उद्दिष्टामुळे कामे चांगल्या रीतीने पार पाडण्याच्या दृष्टीने बोजड यंत्रणा, यमनियमांचे जंजाळ आणि फाफटपसारा यांचे अवडंबर किती माजले आहे व ते कसे कापून काढता येईल याची नेमकी मांडणी तपशीलामध्ये करण्याची नितांत गरज आहे. एका अर्थी 'फेबिअन सोसायटी' सारख्या संस्थेची गरज आहे. हीच



अनुक्रमणिका

गोष्ट औद्योगिक उत्पादन, शेती, अर्थव्यवहार, व्यापार, वाहतूक व दळणवळण या क्षेत्रांच्या पुनर्मांडणीच्या, त्यांच्याशी संबंधित तंत्रवैज्ञानिक रचनेच्या बाबतीत आहे. अशा मांडण्यांच्या आधारे जे कार्यक्रम पुढे येतील त्यांतील काही शासकीय-प्रशासकीय, व्यापक सामाजिक स्तरावर पार पाडावयाचे असतील. तिथे अनुकूल व निर्धारसंपन्न राज्यसत्तेच्या भूमिकेचे महत्त्व राहीलच. पण अनेक कार्यक्रम-उपक्रम स्वयंसेवी संघटना व संस्था यांच्याकडून हाती घेतले जाऊ शकणारेच असतील हे उघड आहे.

लोकशक्तीच्या आधारे, शासनाशी निष्कारण संघर्षाची भूमिका न घेता सर्वांगीण व मूलगामी पुनर्रचनेचा केवढा व्यापक कार्यक्रम हाती घेता येतो याचे भव्य दर्शन विनोबांनी भूदान-ग्रामदानाच्या आंदोलनाच्या काळात घडविले. भारतीय समाजाच्या पुनरुत्थानाचा तो महान प्रयत्न विरून गेला याचे कारण विनोबांनी गांधीप्रणीत सत्याग्रही संघर्ष टाळला हे आहे, असे चुकीचे विश्लेषण केले जाते. दुर्दैवाने ते सर्वोदय चळवळीतही प्रतिष्ठा पावले आहे. विनोबांनी सुचविलेले बहुतेक सर्व कार्यक्रम आजही तेवढेच प्रस्तुत व क्रांतिकारक आहेत. लोकशक्तीच्या सहभागातून अहिंसक क्रांती सिद्ध करावयाची असेल तर राज्यकर्ते-शासन यांच्या पातळीवरून टाकल्या जाणाऱ्या परिवर्तनकारी पावलांच्या बरोबरीने विनोबांनी अधिक रेखीव व सुस्पष्ट केलेल्या महात्मा गांधींच्या मार्गावरून वाटचाल करण्याइतकी फलदायी दुसरी गोष्ट नाही.



## स्वराज्य शास्त्र

**प्रश्न** - अन्य राष्ट्रे हिंसावादी असताना एकच राष्ट्र अहिंसावादी राहू शकेल काय?

### एकटेही अहिंसक राष्ट्र सार्वभौम सहानुभूतीच्या वज्रकवचात सुरक्षित

**उत्तर**- अहिंसक विचारसरणीप्रमाणे एकाच मानवसमाजात अलग अलग राष्ट्रे मानावयाची, ती केवळ सोईच्या मुद्द्यावरच. कोणत्याही एका राष्ट्राला अहिंसेची सुबुद्धी लाभली, तर ते राष्ट्र आपल्याला अन्य राष्ट्रांहून तुटक आणि विरोधी मानणार नाही. आसपासच्या राष्ट्रांचे योग्य हितसंबंध संरक्षणाविषयी ते तितकेच जपेल, जितके स्वतःच्या हितसंबंधांविषयी. हिंसावादी राष्ट्रे म्हटली, तरी ती सबंधच्या सबंध पिसाळलेली नसतातच. किंबहुना राष्ट्रे ही एकमेकांच्या ओढीने हिंसावादी बनली आहेत. हिंसेसाठीच हिंसा मानवाला प्रिय होत नाही. म्हणून अहिंसक विचारसरणीप्रमाणे वागू इच्छिणारे आणि तदनुसार जगाशी अविरोधी संबंध ठेवू पाहणारे राष्ट्र निर्माण झाले, तर ते आसपासच्या राष्ट्रांतील विवेकवृत्तीला जागवील, चालना देईल, आणि तितक्या मानाने त्यांना अहिंसेच्या मार्गावर आणेल.

अहिंसक राष्ट्र आपला माल जबरदस्तीने दुसऱ्यावर लादणार नाही. अहिंसक राष्ट्रातील प्रत्येक गाव परिश्रमनिष्ठ आणि स्वावलंबी राहील. त्यामुळे इतर राष्ट्रांच्या हितसंबंधाचा आपल्या हितसंबंधाशी त्यांनी विरोध मानल्यास त्यातून मार्ग काढण्यासाठी आणि त्याचे संपूर्ण समाधान करण्यासाठी मैत्रीच्या भावनेने मदत करील. इतर राष्ट्रांवर दुष्काळादी संकट आले असता त्यांची शक्य तितकी सेवा निष्काम भावनेने करील. वादविषयक प्रश्न लवादाकडे सोपविण्याची तयारी राखील. इतर राष्ट्रांनी लवाद न स्वीकारल्यास, अथवा स्वीकारून त्याचा निर्णय अमान्य केल्यास, आणि स्वतःवर आक्रमण केल्यास, त्याचा अहिंसक प्रतिकार करील. अशातऱ्हेच्या वृत्तीचे एकाकी राष्ट्र राहणार नाही; सर्व जगभर आपल्याविषयी सहानुभूतीचे वज्रकवच ते निर्माण करील. असे राष्ट्र का कल्पिता येऊ नये?

### अहिंसक राष्ट्र अकुतोभय

बरे, बाहेरची राष्ट्रे आक्रमण करू इच्छितील, ती का? (अ) त्यांच्यापाशी जमीन कमी आणि लोकसंख्या जास्त आहे, आणि आमच्यापाशी जमीन भरपूर आणि लोकसंख्या अल्प आहे म्हणून? तसे असेल तर त्यात जे लोक आमच्या देशात राहू इच्छित असतील, आणि येथल्या व्यवस्थेत अंतर्भूत होऊ इच्छित असतील, त्यांचे आम्ही स्वागतच का करणार नाही? अहिंसक राष्ट्र आपल्याला तुटक मानीत नाही, हे वर सांगितलेच आहे. प्राचीन हिंदुस्थानची वृत्ती ही जरी शास्त्रीय आणि परिनिष्ठित अहिंसेची म्हणून न म्हटली गेली, तरी संकटात सापडलेल्या पारश्यांना हिंदुस्थानने जागा दिलीच की नाही? आणि त्यात हिंदुस्थानचे काय नुकसान झाले? (आ) अथवा इतर राष्ट्रे दुर्भिक्ष्यादी कोण्या अडचणीमुळे आक्रमण करतील काय? अहिंसक राष्ट्र स्वतः थोडेफार कष्ट सोसूनही अशांना मदत केल्यावाचून कसे राहील? (इ) अथवा लोभवृत्तीला वळी पडून व्यापारी पेठ बळकावण्यासाठी आमच्यावर कोणी आक्रमण करतील काय? लोभाची टाळी एका हाताने कधीच वाजत नाही. आमच्यात आळस असेल, अथवा विलास असेल, शेजाऱ्याच्या लोभाला आम्ही जागा देऊ. पण तसे असेल, तर आम्ही हिंसकच नसू. (ई) अथवा सरहद्दीवरील मिसळ समाजातील परस्यांच्या हितसंबंधांच्या भानगडीमुळे आमच्यावर आक्रमण योजिले गेले असेल काय? तसे असेल तर त्यांचे समाधान उभयपक्षाला मान्य असे घडवून आणणे दुबळ्या अहिंसेच्या नव्हे, पण वीर्यवती अहिंसेच्या राष्ट्राला का शक्य होणार नाही?

आणि शेवटी लढाईवरच पाळी आली असे गृहीत धरले, तर हिंसेने आजपर्यंत राष्ट्रांना जितके संरक्षण दिले, त्याहून कमी संरक्षण अहिंसेने आमरण कष्ट सोसणारे वीर ज्या राष्ट्रांत सिद्ध असतील, त्या राष्ट्राला का लाभावे?

- विनोबा






# साम्यवाद की साम्ययोग?

## विनोबा

परंधाम प्रकाशन, पवनार (सप्टेंबर १९९०) यांच्या सौजन्याने.

अनुक्रमणिका


| | |
|---|---|
| प्रस्तावना | ९९ |
| गांधीजी आणि साम्यवाद | १०१ |
| साम्यवादाचे परीक्षण | १११ |
| उक्ति-कृतीतील अंतर : एक चर्चा | १२१ |
| भूमि समस्या, साम्यवादी आणि भूदान | १२२ |
| साम्ययोगाचे समग्र दर्शन | १२५ |
| सर्वोदयात सर्वांचे हित | १२८ |
| साम्ययोगाचा अर्थविचार | १३० |
| साम्ययोग : समग्र व अविरोधी विचार | १३२ |
| अंतिम संघर्ष | १३६ |


अनुक्रमणिका






# प्रस्तावना

**पराग चोळकर**

साम्यवादी देशांमध्ये गेल्या काही दिवसांपासून अभूतपूर्व मंथन सुरू आहे. पूर्व युरोपातील बहुतेक साम्यवादी देशांमधील राजवटी जनतेच्या असंतोषाच्या स्फोटांनी उखडल्या गेल्या आहेत. साम्यवादाविरुद्ध एवढी तीव्र प्रतिक्रिया तेथे उत्पन्न झाली आहे की साम्यवादी पक्षांना आपले नाव बदलणे भाग पडत आहे. सोविएत युनियनच्या घटक राज्यांमध्येही खळबळ सुरू आहे. चीनमध्ये विद्यार्थी बंड करून उठले; त्यांना रणगाड्यांनी दाबून टाकावे लागले. या सगळ्या घटनांमधून साम्यवादाला जबरदस्त हादरा बसला आहे.

रशियातील तथाकथित क्रांतीनंतर साम्यवादाबद्दल फार मोठ्या आशा-अपेक्षा निर्माण झाल्या होत्या. गरिबांचा, कष्टकऱ्यांचा तारणहार म्हणून त्याचेकडे पाहिले जात होते. परंतु लवकरच आशांना छेद जाऊ लागला. साम्यवादाबद्दल आशा बाळगणाऱ्यांचा स्वप्नभंग होऊ लागला. स्टॅलिनने आपल्या विरोधकांना यमसदनास किंवा सैबेरियात गुलाम म्हणून पाठवले. सोविएत रशियात पोलिस राज्याची स्थापना झाली. परदेशातील साम्यवादी पक्षांना रशियाचे हस्तक म्हणून वापरण्यात येऊ लागले. साम्यवादाच्या देवाने दगा दिला आहे याची जाणीव तेव्हाच झाली. परंतु फॅसिझम्‌विरुद्धचा लढा, चीनमधील क्रांती यासारख्या गोष्टी आणि साम्यवादाची शास्त्रीय भासणारी परिभाषा यांमुळे साम्यवादाबद्दलचे आकर्षण कमी-अधिक प्रमाणात कायम राहिले.

अलीकडील घडामोडींनी या आकर्षणाला जोरदार धक्का दिला आहे. जे घडले, जे घडत आहे, ते केवळ अकल्पित आहे. देशोदेशींचे साम्यवादी पक्षही त्यामुळे बावचळून गेले आहेत. त्यांच्या पायाखालची वाळूच घसरू लागली आहे. जगभर साम्यवादाबद्दल पुनर्विचार सुरू झाला आहे.

जे घडले त्याला साम्यवादी राजवटींचा पराभव म्हणायचे की साम्यवादाच्या विचाराचा पराभव? काही लोक याला साम्यवादाचा पराभव मानायला तयार नाहीत. तो विचार योग्य तऱ्हेने अंमलात आणला गेला नाही असे ते म्हणतात. परंतु, या विचाराला अनेक देशांमध्ये संधी मिळाली आणि तो कुठेही योग्य तऱ्हेने अंमलात येऊ शकला नाही; नवा समाज तर त्याला कुठेच निर्माण करता आला नाही, आपल्या लोकांच्या जीवनावश्यक गरजा पूर्ण करू शकण्यासारखी व्यवस्थाही त्याला उभारता आली नाही, याचे कारण काय याचाही मग निश्चित शोध घेतला गेला पाहिजे.

भांडवलशाही विचारात काहीच सत्त्व नाही, शेवटी साम्यवाद व सर्वोदय यांतच वैचारिक मुकाबला होईल अशी भविष्यवाणी विनोबांनी केली होती. इतिहासाने ही भविष्यवाणी खोटी ठरवली आहे असे आज वाटते. साम्यवादाचा अनुभव घेतलेल्या लोकांना भांडवलशाही त्यापेक्षा परवडली असे वाटत आहे ही साम्यवादाची केवढी मोठी शोकांतिका!

या शोकांतिकेची मुळे साम्यवादाच्या वैचारिक पायात आणि जीवनदृष्टीत शोधावी लागतील. भांडवलशाहीतील हिंसा, शोषण, अन्याय यांचेविरुद्ध साम्यवादाने विद्रोह केला. परंतु या गोष्टी केवळ उत्पादन-साधनांच्या व्यक्तिगत मालकीतून आलेल्या आहेत असे त्याने मानले. उद्योगवादाच्या स्वरूपाचे शास्त्रीय विश्लेषण त्याने केले नाही. म्हणून त्याने उद्योगवादाचे तंत्रज्ञान, त्याची मूल्ये स्वीकारली. साहजिकच भांडवलशाहीसोबत सत्तासंपत्तीसाठी स्पर्धा करण्यातच त्याने इतिकर्तव्यता मानली. प्रदूषण, प्राकृतिक असंतुलन, पर्यावरणाचे संकट, युद्धे आणि तणाव यांना त्यानेही हातभार लावला. त्याने केवळ परिस्थिती-परिवर्तनावर लक्ष केंद्रित केले व त्यासाठी हिंसेवर भरवसा ठेवला, उत्पादनांची साधने खऱ्या अर्थी लोकांच्या हातात यावयाची असतील तर उद्योगवादाला पूर्ण नकार देऊन तंत्रज्ञानाबद्दल आणि एकूणच आर्थिक व राजकीय रचनेबद्दल वेगळा विचार करावा लागेल. साम्यवादाने तसा विचार केला नाही. म्हणून तो अपयशी ठरणे क्रमप्राप्त होते. साम्यवादी राजवटी बलिष्ठ राहिल्या असत्या तरी साम्यवादाने जे स्वप्न दिले होते ते तर भंगलेच होते, भंगणारच होते.

साम्यवादामागे गरिबांबद्दलच्या करुणेची प्रेरणा आहे यात शंका नाही. साम्यवाद्यांनी अनेक ठिकाणी गरिबांकरता लढून त्यांचा विश्वास संपादन केला आहे. त्यामुळे तिसऱ्या जगातील गरीब देशांमध्ये साम्यवादाचे आकर्षण अद्यापही आहे, आणि काही काळ तरी राहणारही आहे. आणि म्हणूनच विचार व कृतीच्या स्तरावर साम्यवादाचा मुकाबला करण्याची आणि लोकांपुढे नवसमाज-निर्मितीचा पर्यायी मार्ग मांडण्याची










गरज आहे. साम्यवादातील विचारदोष व उणिवा वेळीच ध्यानात घेतल्या तर एक तृतियांश जगाला ज्या वेदनांमधून जावे लागले त्या टाळता येऊ शकतील. पर्यायी मार्गावर आगेकूच होऊ शकेल.

सर्वोदय किंवा साम्ययोग हा असा पर्यायी मार्ग आहे. तो भांडवलशाहीच्या प्रतिक्रियेतून निघालेला विचार नाही. परंतु भांडवलशाहीचे शास्त्रीय विश्लेषण त्याने केले आहे. भांडवलशाहीचा तो कट्टर वैरी आहे. तिला नष्ट करण्यासाठी व्यक्तिगत पातळीवर अस्तेय, अपरिग्रह आणि शरीरश्रमाचा आणि सामाजिक पातळीवर विश्वस्तवृत्ती आणि विकेंद्रीकरणाचा विचार सर्वोदयाने दिला आहे. सर्वोदयाला अभिप्रेत असलेली परिवर्तनाची प्रक्रिया समग्र आहे, हृदय-परिवर्तन, विचार-परिवर्तन आणि समाज-परिवर्तन या तिन्ही गोष्टींचा विचार करणारी आहे. म्हणूनच ती अधिक शास्त्रीय, अधिक मूलगामी आणि मानवी उत्क्रांतीला पोषक आहे.

साम्यवाद आणि साम्ययोग यांचा तुलनात्मक अभ्यास करून सत्यशोधन करणे ही काळाची एक गरज आहे. विनोबांच्या विचारांचे हे प्रस्तुत संकलन या दृष्टीने उपयोगी ठरेल.

साम्यवादावरचा हा प्रबंध नव्हे. विनोबांनी साम्यवादा-बद्दल वेळोवेळी व्यक्त केलेल्या विचारांचे यात संकलन आहे. अर्थातच यात साम्यवादाचे समग्र, तपशीलवार तात्त्विक परीक्षण नाही. विनोबांचा तसा प्रयत्न नव्हता, आणि तशी त्यांना सवडही नव्हती. दुसरे असे की त्यांची दृष्टी सत्याग्रही होती. 'सर्वेषां अविरोधेन' काम करण्याची त्यांची भूमिका होती.

अशा भूमिकेतून आपले काम करताना विनोबांनी अनेक प्रसंगी व्यक्त केलेल्या विचारांमधून साम्यवादातील विचारदोष, कच्चेपणा, उणिवा यांवर मार्मिकपणे बोट ठेवण्यात आले आहे. सूत्रमय भाषेत हे विचार व्यक्त झाले आहेत. त्यांचा फारसा विस्तार करण्यात आलेला नाही. असा विस्तार करण्यास, त्यांचेवर भाष्य करण्यास भरपूर अवकाश आहे.

विनोबांचे साम्यवादावरील आक्षेप प्रामुख्याने खालीलप्रमाणे आहेत.

१. वैतर्किक वस्तुवादातून (डायलेक्टिकल मटेरिआ-लिझम) मार्क्सने काढलेले निष्कर्षच निष्पन्न होतात असे नाही.

२. वर्गांची व त्यातून आलेली हित-विरोधाची आणि वर्गसंघर्षाची कल्पना चुकीची आहे.

३. मत्सर, द्वेष, प्रतिक्रिया यांचे आधारावर स्थायी व श्रेयस्कर परिवर्तन होऊ शकत नाही. असा विचार फार काळ टिकूही शकत नाही.

४. भांडवलशाहीत केंद्रीकरण यंत्रपूजा, शस्त्रनिष्ठा व शोषण यांपेकी तीन गोष्टी कायम राखून चौथी नाहीशी करण्याचा प्रयत्न साम्यवादाने केला. तो अशास्त्रीय होता व म्हणून तो फसणे क्रमप्राप्त होते.

५. साम्यवादात करुणा आहे. पण वैज्ञानिक चिंतन नाही. परिवर्तनाची त्यांची प्रक्रिया एकांगी आहे.

६. त्यात साध्य-साधन-विवेक नाही. हिंसेवर तो भरवसा ठेवीत आला. ती श्रद्धा ढळली असली तरी अजून हिंसेला पर्याय त्याला सापडलेला नाही.

७. व्यक्तिगत त्याग/प्रयत्नावर साम्यवादाचा विश्वास नाही.

८. युरोपातील परिस्थितीच्या आधारावर बनलेले त्याचे सिद्धांत भारतात प्रासंगिक नाहीत.

९. तो भविष्य-सत्ययुगवादी आहे. आदर्शाच्या दिशेने पाऊले टाकण्याऐवजी तो उलटी दिशा पकडतो.

साम्यवाद्यांबद्दलही विनोबांचे काही आक्षेप आहेत.

१. ते पोथीनिष्ठ आहेत.

२. रशिया/चीनच्या कलाने वागणारे आहेत.

३. भारतीय विचार-परंपरेचे त्यांना ज्ञान नाही.

४. त्यांच्या शब्दांत व कृतींत अंतर आहे.

असे असले तरी विनोबा साम्यवादाला साम्ययोगा-खालोखाल नंबर देतात. हे लक्षात ठेवण्यासारखे आहे.

साम्यवादाच्या पुढे जाणारा, अधिक शास्त्रीय आणि क्रांतिकारक विचार म्हणजे साम्ययोग. त्याची स्थूल रूपरेषा आखणारी काही सामुग्रीही या संकलनात समाविष्ट करण्यात आली आहे. त्यामुळे या पुस्तकाची उपयोगिता वाढली आहे.

या पुस्तकातून जिज्ञासू वाचकांना भरपूर वैचारिक खाद्य मिळेल. परंतु केवळ वैचारिक स्पष्टता होणे पुरेसे नाही, लोकांच्या समस्या सोडविण्याच्या व नवसमाज निर्माण करण्याच्या दृष्टीने साम्ययोगाची शक्ती व व्यवहार्यता सिद्ध व्हावी लागेल. 'साम्यवाद की साम्ययोग?' या प्रश्नाचे उत्तर जीवनाच्या कुरुक्षेत्रातच मिळेल. विनोबांनी म्हटले आहे : 'ज्यांचा अहिंसक पद्धतीवर विश्वास आहे त्यांनी ती पद्धती यशस्वी करून दाखवली पाहिजे, हा त्यांचा धर्म आहे.'

प्रस्तुत पुस्तक या दृष्टीनेही प्रेरणादायी ठरावे.

❖❖❖









# साम्यवाद की साम्ययोग?

विनोबा




## गांधीजी आणि साम्यवाद

### १. चालू जमाना आणि तोही दुःखाचा

सृष्टी तर बोलूनचालून अनादिच म्हटली आहे. पण ज्या पृथ्वीवर आपण राहतो तिलाही काही नाही तरी दोनशे कोटी वर्षे होऊन गेली आहेत, असे पुराणिकांचे आणि आधुनिकांचे मत आहे. पृथ्वी आधी निर्जंतुक होती म्हणतात. सूर्यासारखा एक जळता गोलच होती ती. पुढे थंड होत होत जेव्हा ती जंतु-निवास योग्य झाली तेव्हा जंतु जन्मास आला. होता होता मानवाचा अवतार झाला. त्यालाही दहा-पाच लाख वर्षे होऊन गेली असावीत, असे वैज्ञानिकास वाटते. मानवाच्या एवढ्या मोठ्या जीवनप्रवाहात शे-दोनशे वर्षांचा हिशोबच काय? पण गेली शे-दोनशे वर्षे आम्हाला इतकी महत्त्वाची होऊन बसली आहेत की मानवाचा अर्धा अधिक इतिहास या शे-दोनशे वर्षांत सामावला आहे, असे आम्हास वाटते.

चालू काळ हा केव्हाही महत्त्वाचा असतोच. भूत-काळाचे तो फळ असतो. भविष्याचे बीज असतो. दोन्ही बाजूंनी त्याचे महत्त्व अद्वितीयच. भूत आणि भविष्य यांच्या संधि-स्थानी तो असल्यामुळे आपोआपच तो क्रांतीचा काळ ठरतो. मग ती क्रांती जन्म-दात्री असो की मरण-दात्री असो. वृद्धिकारिणी असो की क्षय-कारिणी असो. चालू क्षण हा केव्हाही क्रांतीचाच. इतकेच नव्हे, 'न भूतो न भविष्यती'! आपण पाहतो ना, ६०-६५ वर्षे काँग्रेस बहुधा दरसाल भरत असते, पण 'यंदा'ची काँग्रेस अनेक कारणांमुळे अपूर्व आणि आणीबाणीची असतेच की नाही? इतके कशाला, घरगुती उदाहरण घ्या ना. एखाद्या आईला मुलाचे दर्शन होते. तेव्हा तत्पूर्वी दुसऱ्या कोणत्याही आईला तसले दर्शन झाले नसेल असेच तिला वाटत नाही काय? मी तर अलीकडे पुष्कळ आयांना म्हणताना ऐकतो, 'आमच्या मुलासाठी असे काही नाव सुचवा की आजपर्यंत कुणा मुलाचे तसे ठेवले गेले नसेल.'

सारांश चालू काळ निःसंशय क्रांतीचाच नव्हे, तर अपूर्व क्रांतीचा असतो. एक गृहस्थ म्हणाले, आम्हाला तो जुना 'शांतिः शांतिः शांतिः' हा घोष नको आहे. आम्ही आता 'क्रांतिः क्रांतिः क्रांतिः' असा त्रिवार उद्घोष गरजणार आहोत. मी म्हटले, एकदाच क्रांती म्हणाल तर ठीक होईल. त्रिवार घोष केल्याने मूळ पदाच्याही मागे जाऊन बसाल. शांतीला काही धास्ती नाही. ती कायमची जुनी आहे. ही जुनी झाली की विटली! म्हणून त्रिवार म्हणण्यात काही सार नाही. एकदाच क्रांती म्हणावे, आणि पुन्हा नाव काढू नये.

चालू काळाचे महत्त्व जुन्या काळाला कुठून येणार? तो जुना काळ जेव्हा चालू असेल तेव्हा त्याचेही अपूर्व महत्त्व असेल; ती गोष्ट वेगळी. त्यातून चालू काळ किंवा चालू क्षण जर दुःखाचा असला तर त्याच्या किंमतीला मोलच नाही. दुःखाचा काळ नेहमीच दीर्घ असतो. दुःखाचा एक प्रसंग, सुखाच्या अनेक प्रसंगांना पोटात जिरवून आपली प्रौढी मिरवतो. सुखाचे पुष्कळसे प्रसंग विस्मृतीच्या उदरात खुशाल गडप होऊन जातात. दुःखाच्या प्रसंगाचा विसर पडायचा म्हणजे त्याहून अधिक दुःखाचा प्रसंग येईल तेव्हा. दुःखाला पुसून टाकण्याची ताकद सुखात नाही. उलट सुखाने त्याची आठवण अधिकच खुलायची. दुःखाला पुसून टाकणे हे तीव्र दुःखाचेच काम आहे. गेली शे-दीडशे वर्षे हा आमचा चालू जमाना. आणि त्यात पुन्हा तो दुःखाचा जमाना. मग आमच्या दृष्टीने मानवाच्या सबंध इतिहासाला तो ग्रासून बसला तर त्यात नवल काय?

### २. मार्ग - संशोधन

आजचा जमाना दुःखाचा म्हणण्यासारखी कोणती अशी घटना या जमान्यात झाली? सुख-साधने वाढली, सुखाच्या राशी निर्माण झाल्या हीच ती घटना आहे, जी एवढे मोठे दुःख व्याली आहे. सुख आणि दुःख परस्परविरोधी म्हणवितात, पण ती एकमेकांना पितृस्थानी आहेत. सुख दुःखाला जन्म देते, दुःख सुखाला जन्म देते. दुसरा जन्म केव्हा होणार असेल तो होईल, पण सध्या पहिला जन्मोत्सव चालू आहे. एकट्या

अनुक्रमणिका

सुखामागे किती उपाधी नि किती अडचणी! सुख म्हटले की त्याच्या वाटणीचा केवढा मोठा प्रश्न! दुःखाला असे काहीच संकट नाही. त्याचा सारा वाटा कोणीही खुशाल पटकवावा. कोणी खुशाल ते एकट्याने भोगून घ्यावे. त्यावर दृष्ट कुणाची लागायची नाही. एखाद्या महात्म्याची ऊर्फ महामूर्खाची लागली तर तो अपवाद समजायचा. 'स महात्मा सुदुर्लभः!' या आमच्या जमान्याने सुखाच्या राशी निर्माण करून त्याच्या ओझ्याखाली सबंध जगातली आम जनता चिरडून टाकली. साखरेच्या गोण्या बैलाच्या पाठीवर चढायच्या, यजमानाच्या पोटात जायच्या. यजमानाचे पोट खाऊन खाऊन बिघडले. बैलाची पाठ वाहून मोडली. जी बिनतक्रार गोडच गोड, त्या साखरेने हा असा चमत्कार केला. सुखाच्या वाटणीत कोणी सिंहाचा वाटा मागितला, कोणी जंबुकाचा मागितला. कोकराच्या वाट्याला काही उरलेच नाही. उलट ते सबंध कोकरूच त्या दोघांच्या वाट्याला आले. असंख्यांना रडावयास लावणारी आजच्या जमान्याची ही विनोद-कथा आहे.

यातून सुटका कशी, हाच आता सगळ्यांच्या पुढे प्रश्न आहे. त्यासाठी अनेक चळवळी, अनेक खळबळी आणि अनेक तळमळी चालू आहेत.

१९३० आणि ३२ सालचे ते तुरुंग, सत्याग्रही कैद्यांनी चिकार भरलेले. जमावाने चोराला सोडून ख्रिस्ताला क्रुसावर चढवावयास लावल्याची गोष्ट बायबलात आली आहे. तसेच त्या वेळी सरकारने अनेक चोर कैद्यांना सोडून सत्याग्रही मंडळीला तुरुंगात सामावून घेतले होते. एवढ्या त्या भरल्या घरात काय काय गोष्टी झाल्या आणि काय काय झाल्या नाहीत, हे सगळे ध्वनी पोटात साठविणाऱ्या त्या आकाशालाच विचारले पाहिजे. अनेक लोक फलज्योतिषाच्या नादात गुंग झाले. सगळे केव्हा सुटणार याची भाकिते वर्तवू लागले. एकावर एक भाकिते खोटी पडली तरी निराशा न दाखवता आपल्या अभ्यासाला उजळा देऊ लागले. पण निराशा न दाखविली तरी लपण्यासारखी नव्हती. शतंजीव लढायांची (हंड्रेड इअर्स वॉर्सची) वर्णने वाचलेले आम्ही इतिहासज्ञ खरे, पण एक एक महिना आम्हाला भारी होऊ लागला. शेवटी काही लोक धर्मानुष्ठानाला लागले. काहींनी पाकशास्त्रीय प्रयोग आरंभिले. कित्येकांनी दोन्ही उद्योगांचा समन्वय साधला. असेच आणिकही उद्योग अनेकांनी हुडकून काढले. पण इतके करून सारी संख्या आटली नाही, काही लोक रिकामे उरलेच. त्यांनी मग भारताच्या आणि जगाच्या दुःखावर काय उपाय होऊ शकतो याचे बुद्ध देवाच्या उत्साहाने चिंतन चालविले.

गांधींच्या मार्गानेच प्रश्न सुटेल, असा ज्यांच्या श्रद्धेने निर्णय घेतला होता, त्यांनी आपल्यातल्या दोषांचे संशोधन चालविले. ते म्हणाले, मार्ग हाच आहे. पण आमची पावलेच नीट पडत नाहीत. हेच पहा ना, आम्ही जेलमध्ये सत्याग्रही म्हणून आलो, पण आम्ही चोरून बाहेर संदेश पाठवितो. इतकेच काय, पण गरजेच्या वस्तूही चोरून मिळवितो. ही आमच्या सत्याची दशा. आणि 'आग्रह-शक्ति' आमची एवढी की चार-दोन महिनेही आम्हाला भारी होतात. असे आम्ही नावाचे सत्याग्रही! असल्या मोडक्या तोडक्या साधनांनी सिद्धी कशी लाभणार? म्हणून आम्हाला आज जी एकांताची संधी मिळाली आहे तिचा लाभ घेऊन आम्ही आवश्यक गुण-विकास साधला पाहिजे. असे म्हणून हे लोक संयमावलंबी होऊन जेलची टास्के पुरी करून शिवाय तुरुंगात कांतू, पिंजू, विणू आणि भंगीकामही करू लागले. दुसऱ्या कित्येकांना ही अंतरवृत्ती पटली नाही. सत्याच्या आणि अहिंसेच्या काटेकोर आचरणाची गोष्ट तुम्ही राजकीय लढ्यात काढता; तुम्हीच सांगा, जगाच्या इतिहासात इतके राजकीय लढे झाले, त्यातले एखादे उदाहरण आम्हाला असे दाखवा की ज्यात आम्ही पाळला त्याहून अधिक संयम पाळला गेला असेल. अहिंसक लढ्याच्या यशस्वितेसाठी जर मनुष्याचा सर्वसामान्य स्वभावच पालटण्याची गरज असेल तर अहिंसक लढा म्हणजे मृगजळच ठरेल. सद्गुणसंवर्धन करीत करीत तुम्ही सबंध जनतेला त्यागाचे धडे कुठवर देणार? दुर्जनांचे हृदय-परिवर्तन केव्हा घडणार? आणि जनतेची दुःखे केव्हा मिटणार? निकटच्या भविष्यात होणाऱ्या या गोष्टी आहेत काय? दुसरा मार्ग दिसत नव्हता म्हणून आम्ही गांधींचा मार्ग अवलंबिला. मार्ग तर चांगला आहे, पण आमच्या गावाला जर तो पोचविणार नसेल, तर चांगला आहे म्हणूनच त्यावर चालत राहायचे की काय? तेच रशियात पहा. बघता बघता केवढी क्रांती झाली; देशाची कायाच त्याने पालटून टाकली. आणि आता जग आत्मसात करण्याची ते उमेद बाळगीत आहेत. आणि आम्ही सत्य-अहिंसेच्या आणि जेलच्या शिस्तीच्या कोंडीत अडकून पडलो आहोत. अशाने काय होणार? चार महिने दम धरवत नाही म्हणता, पण देशातल्या तमाम

कार्यकर्त्यांनी महिनेच्या महिने तुरुंगात अडकून पडणे ही काय लहान गोष्ट आहे? त्यातून बाहेर काही हालचाली चालू असत्या तर गोष्ट वेगळी. बाहेर सर्व सामसूम, आणि आम्ही इथे संयम पाळायचा! त्यांची सामसूम आणि आमचा संयम मिळून स्वराज्य मिळेल काय? म्हणून आमचा मार्ग चुकला आहे हे ओळखून आत्म-संशोधनच केले पाहिजे. आमचा आत्मा नीट जसा असायचा तसाच आहे. असे म्हणून या मंडळींनी सोशलिस्ट आणि कम्युनिस्ट साहित्याचा अभ्यास आरंभिला. प्रलयकाळी पृथ्वी जलमय झाली असता एकाकी मार्कंडेय जसा त्या अर्णवात पोहत राहतो, त्याप्रमाणे जेलच्या त्या एकांतवासात तरुण मंडळी समाजवादी साहित्य-सागरात पोहू लागली.

आणि खरोखरच हे साहित्य कोठे खोल कोठे उथळ पण समुद्राप्रमाणेच अपरंपार आहे. काही थोड्यांनी मार्क्स-कृत कॅपिटलच्या अगाध खोलीत अवगाहन केले. पुष्कळसे रशियातून प्रसृत झालेल्या, बेताची खोली असलेल्या, प्रचारकी साहित्यात मज्जन करू लागले. प्राचीन पुराणकालानंतर केवढीही पुनरुक्ती न जुमानता साहित्याचा सतत प्रसार करीत राहण्याचा अदम्य उत्साह आजवर कम्युनिस्टांशिवाय कोणीही दाखविला नसेल. ऐकणारा किंवा वाचणारा कितीही विसरला तरी त्याच्या बुद्धीत काही ना काही संस्कार शेष राहीलच. अशी श्रद्धा त्या पुराण ऋषींची आणि या आधुनिक ऋषिकांची. मेल्यानंतर काही एक स्वर्ग मिळायचा असतो, त्या कल्पनेवर पुराणाचे वाचक तरंगत रहायचे आणि रशियात काहीतरी एक स्वर्ग आला आहे, या कल्पनेवर आमची ही मंडळी या विशाल समाजवादी साहित्याच्या वाचनाची कळ सोसायचे. ४० च्या व्यक्तिगत सत्याग्रहाच्या वेळी जेलमध्ये एक कम्युनिस्ट मित्र मला म्हणाले, "तुम्ही कम्युनिस्ट साहित्य अजून वाचलेले दिसत नाही. ते वाचायला पाहिजे." मी म्हटले, "मी क्रांतीत असतो तेव्हा तुम्हीच मला वाचून दाखवा." तेव्हा त्यांनी त्यांच्या दृष्टीने निवडक असे साहित्य मला वाचून दाखविले. तत्पूर्वी मार्क्सचे कॅपिटल, जी या नवीन विचाराची मूळ संहिता आहे, मी बाहेर असतानाच फुरसतीने वाचून काढले होते. त्यामुळे त्यांनी वाचून दाखविलेले साहित्य निवडक असले तरी त्यांतील पुनरुक्तीचा माझ्यावर चांगलाच ठसा उमटला आहेत. आमच्या तरुण मंडळींची मने या पुनरुक्तीने कंटाळली नाहीत, पण उलट भारली गेली, यात काही नवल नाही.

### ३. गुण-विकास आणि समाज-रचना : दोन निष्ठा

गुण-विकास आणि समाज-रचना या दोन एकांतिक निष्ठा आदीपासून आतापर्यंत चालूच आहेत. गुण-विकास-वादी म्हणतात, गुणांनीच हे जग चालले आहे. माणसाचे जीवनही असेच गुण-प्रेरित आहे. गुणांचा जसजसा विकास होत जातो तसतशी समाजाची घडण सहजच बदलत जाते. म्हणून सज्जनांनी आपले सारे लक्ष गुण-विकासावर केंद्रित केले पाहिजे. समाजरचनेच्या फंदात पडणे म्हणजे नसता अहंकार ओढवून घेणे होय. 'जगद्-व्यापार-वर्ज्यम्' ही भक्तांची मर्यादा आहे. अहिंसा, सत्य, संयम, संतोष, सहकार इत्यादी यम-नियमांची निष्ठा दृढ करणे, हे गुण आपल्या नित्याच्या व्यवहारात उत्तरोत्तर प्रकट होतील असे करणे, एवढेच आपले काम आहे. एवढे केले म्हणजे बाकीचे सारे आपोआप होईल. मुलाला दूध पाज हे आईला सांगावे लागत नाही. दुःख झाले म्हणजे रडावे हे लहान मुलाला शिकवावे लागत नाही. वात्सल्य असू दे, दूध आपोआप पाजले जाईल, दुःख असू दे, सहजच रडले जाईल.

अशी ही एक निष्ठा आहे, जी सर्व संतांच्या हृदयात सहज स्फुरत असते. गीतेत दैवी-संपत्तीचे गुण आणि ज्ञानाची लक्षणे यांची जी यादी आली आहे तीतील एकेका गुणावर आणि लक्षणावर ज्ञानदेवाने इतके जिव्हाळ्याचे विवरण केले आहे त्याच्या मुळाशी हीच निष्ठा आहे.

याच्या नेमके उलट कम्युनिस्टांचे तत्त्वज्ञान आहे. ते म्हणतात, ज्याला तुम्ही विकास म्हणता तो होतो जरी चित्तात, तरी तो चित्ताने केलेला नसतो, परिस्थितीने केलेला असतो. चित्तच स्वतः परिस्थितीचे बनलेले आहे. 'भौतिकं चित्तम्'। लहान मुलाला दाढी-मिशा नसतात याशिवाय दुसरे काय? आईला तशा असत्या तर बिन-दाढीचे सोंग पाहूनच मुलगा दचकता. दुःख झाले की जर रडणे सहजच होते म्हणता, पण सुई टोचली म्हणजे दुःखही सहजच होते. चित्त म्हणून काही स्वतंत्र पदार्थ आहे का? वस्तुतः ते सृष्टीचे एक प्रतिबिंब मात्र आहे. छाया-रूपच आहे. छायेच्या नियमनाने वस्तूचे नियमन होईल, की वस्तूच्या नियमनाने छायेचे होईल? रात्री गाढ झोप आली म्हणजे सकाळी चित्त प्रसन्न होते, सत्वगुण प्रकट होतो. पुढे थोड्या वेळाने भूक लागली म्हणजे रजो-गुण जोर करतो. आणि जेवण झाल्याबरोबर तमो-गुण दाटतो. मग गुणांचा

काय महिमा गाता? योग्य परिस्थिति निर्माण करून दिली की योग्य गुणांचा उदय होणारच. म्हणून परिस्थिति पालटा, आणि ती लौकरात लौकर पालटा, आणि कसेही करून पालटा. मनोवृत्तींची जाळी विणत बसू नका. माणसाचे मन जे आहे ते आहे. ते काही केल्या पशूचे मन होऊ शकत नाही. आणि काल्पनिक देवासारखेही ते बनू शकत नाही. त्याच्या मर्यादेतच ते राहते. परिस्थिति सुधारली म्हणजे ते थोडे सुधारते, बिघडली म्हणजे थोडे फार बिघडते. त्याची चिंता नको. समाजरचना पालटण्यासाठी हिंसा करावी लागली तरी 'सद्‌गुण मेला हो' म्हणून ओरडत बसू नका. वाईट रचना मेली एवढेच समजा. त्यासाठी करावी लागलेली हिंसा ही सामान्य हिंसा नव्हती. ती वरच्या पातळीवरची हिंसा होती. तोही एक सद्‌गुणच होता. असे उमगाल तर तुमचा नीट गुण-विकास होईल.

ही झाली दोन टोके. या दोहोंच्या दरम्यान बाकीच्या सर्वांना बसायचे आहे. आपापल्या सोयीची जागा पाहून जे ते बसत असतात.

कोणी म्हणतात, समाजरचना बदलण्याचेही महत्त्व आहे ही गोष्ट नाकबूल नाही, पण विशिष्ट-गुण-विकासपूर्वकच ते झाले पाहिजे. समाजात काही स्थिर मूल्ये म्हणून असतात. ती गमावून अमुक एक समाज-रचना कसेही करून साधून घेण्याची घाई करणे म्हणजे 'लाहे कारण मूल गवायो' अशातला प्रकार व्हायचा. समाजरचना ही काही शाश्वत वस्तू नव्हे. देश-काल-मानाने ती बदलेल आणि बदलावयास पाहिजे. कायमची एक समाजरचना करणार तरी कोण? मनुष्यच. मग जसा मनुष्य असेल तशीच ती बनणार! म्हणून सौजन्यमर्यादा सांभाळून, इतकेच नव्हे पण उत्तम सौजन्य राखून, सौजन्य वृद्धिंगत करून, सौजन्य-बलानेच समाज-रचनेत पालट घडवून आणला पाहिजे. असा पालट सावकाश झाला तरी त्याची चिंता करण्याचे कारण नाही. सावकाश चावून खाल्लेले पचतेही चांगले. आणि हे सावकाशच शेवटी शीघ्रतम ठरणार आहे. सौजन्य वाढविण्याची गोष्ट आम्ही बोलतो तेव्हा आम्ही देवता बनू पाहतो असे नाही. तो अहंकार आम्हाला नको आहे. आम्ही जर मानवच आहोत, तर आम्ही सौजन्याचा कितीही विकास केला तरी देवता होण्याची आम्हाला धास्तीच नाही. म्हणून अधिकात अधिक गुणोत्कर्ष जितका साधता येईल तितका आम्ही बिनधोक साधावा. समाज-रचना चांगली झाली म्हणजे सद्‌गुणांची वाढ होण्याला मदत होते, ही गोष्ट खोटी नाही; पण सद्‌गुणांची योग्य वाढ झाली तरच समाज-रचना चांगली होते ही त्याहून मूलभूत गोष्ट आहे. सद्‌गुण-निष्ठा हा पाया आहे. समाज-रचना इमारत आहे. पायाच उखडून इमारत मजबूत कशी बनायची?

यावर दुसरे कोणी म्हणतात : समाज-रचना बदलण्याचे काम शाश्वतमूल्ये सांभाळूनच करावे, सद्‌गुण-निष्ठा ढळू देऊ नये हे आम्हासही मान्य आहे. अशाश्वतासाठी शाश्वत सोडू नये हे ठीकच आहे. पण नैमित्तिकासाठी नित्य सोडावे लागते, याचाही विसर होऊ नये. तुम्ही प्रार्थना करून घ्याल. हा नित्य-नैमित्तिक-विवेक म्हणायचा. असाच विवेक सर्वत्र करावा लागतो. क्रांतीसाठी हिंसक साधने वापरलीच पाहिजेत, हिंसेशिवाय क्रांती होऊच शकत नाही. हिंदुस्थानसारख्या देशात आणि लोकशाही राज्यात हिंसक साधनांचा अवलंब न करता केवळ बॅलट-बॉक्सच्या बळाने राज्यक्रांती घडवून आणता येईल असा आम्हाला विश्वास वाटतो. त्यासाठी लोकमत तयार करायला पाच पंचवीस वर्षे लागली तरी आम्हाला हरकत वाटणार नाही. आम्ही धैर्याने लोकमत तयार करीत राहू. पण समजा, सत्ताधारी पक्षाने निवडणुकीचे पावित्र्य राखले नाही, आणि सत्तेच्या जोरावर निवडणुकी लढविल्या गेल्या तर अशा प्रसंगी साधन-शुद्धीचा आग्रह राखणे म्हणजे सतत मार खात राहणेच होईल. म्हणून अगतिकपणे केवळ विशिष्ट प्रसंगापुरता अन्य साधनांचा अवलंब करणे आम्हाला गैर वाटत नाही. आम्हाला तो नैमित्तिक धर्म वाटतो. वाटल्यास तुम्ही आपद्-धर्म म्हणा. पण अधर्म म्हणून नका. एवढीच आमची विनंती आहे. तेवढ्याने शाश्वत मूल्ये ढासळण्याचे कारण नाही. नैमित्तिक कारणापुरता स्क्रू ढिला करून घेतला तर मागाहून चांगला कसता येईल. सत्तांतर झाल्याबरोबर शाश्वत मूल्ये अधिकच पक्की करून घेऊ. हलवून खुंटा बळकट करावा म्हणतात, तसेच हे समजा. अहिंसेच्या लाभासाठीच हा हिंसेचा तात्पुरता अवलंब आहे. एरवी अहिंसा दुरावेल. झाड जोराने वाढण्यासाठीच आपण त्याची कापकूप करतो की नाही? झाडाच्या मुळावर घाव घालणे वेगळे आणि फांद्यांची छाटाछाट करणे वेगळे. भांडवलवाद, साम्राज्यवाद, जाति-वंशवाद, हे सारे अहिंसेच्या मुळावरच घाव घालीत असतात. कम्युनिस्टांच्या सर्रास हिंसेच्या तऱ्हेमुळे, त्यांचाही घाव अहिंसेच्या मुळावरच बसतो. जरी








त्यांचा तसा उद्देश नसतो, तरी फलितार्थ तोच निघतो. म्हणून आम्ही तसल्या प्रकाराला संमती देऊ शकत नाही. पण विशिष्ट गुणांच्या निष्ठेच्या नावाने सबंध समाजाची प्रगती रोखून धरणे, आणि गरीब लोकांची गांजणूक दीर्घकाळ चालू देणे, ही आम्हाला अतिरेकी गुण-निष्ठा वाटते. शिवाय परचक्राच्या निवारण्यासाठी आणि अंतर्गत बंडाळी मोडण्यासाठी शस्त्र वापरावे लागले तर त्याची गणना हिंसेत न करता तो दंड-धर्म समजावा, असे आमचे म्हणणे आहे. एवढे अपवाद वगळता बाकी सर्व प्रसंगी अहिंसक साधनांचा आग्रह राखणे अत्यंत योग्य आहे असे आम्ही समजतो.

संतांची आणि कम्युनिस्टांची भूमिका या दोन नैष्ठिक भूमिका आहेत. या शेवटच्या दोन भूमिकांना आपण नैतिक भूमिका म्हणू. यातली पहिली नैतिक भूमिका या देशात गौतम बुद्ध आणि गांधी यांनी जोरदार मांडली आहे, इतरही काही धर्म-संस्थापकांनी अवलंबिली आहे, थोड्याच स्मृतिवचनांनी मान्य केली आहे. दुसरी नैतिक भूमिका अनेक स्मृतिकारांनी प्रतिपादली आहे. आजच्या घटकेला हिंदुस्थानात बरेचसे काँग्रेसवाले, काँग्रेस-गटवाले आणि भारतीय बाणा बाळगणारे बहुतेक सारे समाजवादी याच भूमिकेवर दिसतात. गांधीवाले म्हणविणारेही पुष्कळसे. आढेवेढे घेऊन याच भूमिकेच्या जवळपास राहत असतात.

या विश्लेषणानुसार, किशोरीलालभाईंच्या या पुस्तकात गांधीजींची सत्याग्रही नैतिक भूमिका आणि कम्युनिस्टांची रचनाग्रही क्रांती-निष्ठा यांची तुलना केली गेली आहे असा अर्थ होतो.

### ४. गांधीवाद आणि साम्यवाद - 'दूरमेते विपरीते विषूची'

महात्मा गांधी आणि मार्क्स महामुनि दोघांच्या विचाराची तुलना. याहून अधिक आकर्षक विषय आजच्या जमान्याला कोणता होऊ शकेल? गेल्या शे-दीडशे वर्षांचे मनुष्य-समाजाचे जीवन आठवून काढल्यास बहुधा हीच दोन नावे हातात राहतील. मार्क्सच्या पोटात लेनिन येऊन जातो. गांधींच्या पाठीशी टॉलस्टॉयची छाया गृहीतच आहे. हे दोन विचारप्रवाह एकमेकांना आत्मसात करण्यासाठी समोरासमोर उभे आहेत. दिसायला जगाच्या अंगणात रशियाच्या नेतृत्वाखाली कम्युनिस्ट आणि अमेरिकेच्या नेतृत्वाखाली लोकशाही पांघरुणा-तले भांडवलवाले दंड थोपटून उभे दिसतात. पण विचारदृष्टीने या दुसऱ्या बेगडी गटात सत्त्व उरलेले नाही. म्हणून लष्करी शक्तीने तो कितीही मिरवत असला तरी कम्युनिस्ट पक्षाच्या प्रतिस्पर्धेला तो उभा नाही असेच मी समजतो. उलट गांधी-विचार संघटित स्वरूपात जरी कुठेच उभा दिसत नसला तरी त्यात विचारांचे सत्त्व असल्यामुळे कम्युनिझमला त्याच्याशीच मुकाबला करावा लागणार आहे. अशा या दोन बलवान दर्शनांची तुलना किशोरलालभाईंनी या लहानशा लेखमालेत केली आहे. विषय इतका अद्यतन रसाने भरलेला आहे की किशोरलालभाईंची 'निरस-विषद' अशी विशिष्ट विवेचन-शैली जमेस धरूनही वाचकांना पुस्तक सबंध वाचल्याशिवाय राहवणार नाही. किशोरलालभाईंनी 'गांधी विचार दोहन' आगाऊच करून ठेवलेले असल्यामुळे गांधी विचाराचे त्यांनी या पुस्तकात केलेले विश्लेषण अधिकृत न मानले गेले तरी त्या वादाला अन्याय होऊ नये अशी त्यात काळजी घेतली गेली आहे असे मला वाटते.

जगाची गोष्ट आपण सोडून देऊ, पण हिंदुस्थानात तरी गांधी-विचार आणि साम्यवाद यांची तुलना एक नित्य चर्चेचा विषय आहे. जो तो आपापल्या परी दोहोंचे मूल्यमापन करीत असतो. गांधी-विचारांभोवती अध्यात्मिक तेजोवलय दिसून पडते. साम्यवादाला शास्त्रीय परिभाषेचे मोठे पाठबळ दिसते. गांधी-विचाराने भारताचे स्वराज्य-संपादनाचे श्रेय पदरात पाडून अव्यवहारतेच्या आक्षेपातून आपली सुटका करून घेतली आहे. साम्यवादाने चीनच्या पुराणपुरुषाला तारुण्य देऊन आपली तात्कालिक शक्ती दाखवून दिली आहे. त्यामुळे दोन्ही विचारांचा शक्यतर मेळ साधावा अशी एक लालसा काही प्रचारकर्त्यांच्या मनात उठत असते आणि मग गांधीवाद म्हणजे हिंसावर्जित साम्यवाद अशासारखे आडाखे बसविले जातात. वस्तुतः या दोन विचारांचा मेळ बसू शकत नाही. त्यांच्यातला विरोध अत्यंत मूलगामी आहे. ते दोन्ही एकमेकांच्या जीवावर उठले आहेत, हे या निबंधात आरशासारखे स्पष्ट झाले आहे.

एकदा 'गांधीवाद आणि साम्यवाद यात एका अहिंसेचाच काय तो फरक', अशासारखी चर्चा चालली असताना मी म्हटले - 'दोन माणसे नाका-डोळ्याने अगदी सारखी होती. इतकी हुबेहुब की एकाचा तोतया म्हणून दुसरा राजकारणाच्या कामी आला असता. फरक इतकाच होता की एकाच्या नाकातून श्वास वाहत होता आणि दुसऱ्याचा श्वास बंद पडला होता.

अनुक्रमणिका








परिणाम हा झाला की एकाच्या जेवणाची तयारी चालली होती आणि दुसऱ्याच्या अंत्यविधीची.' अहिंसा असणे आणि नसणे एवढाच 'किरकोळ' फरक वजा करून उरलेली समानता ही अशासारखी आहे. किशोरलाल भाईंनी तर नाकाडोळ्यातही फरक दाखवून दिला आहे. श्वास चालू असणाऱ्यांच्या आणि नसणाऱ्यांच्या नाकाडोळ्यातही फरक असल्याशिवाय कसा राहील? मग वरून वरून ते कितीही समान का दिसेनात.

साम्यवाद हा उघडच एक आसक्त विचार असल्यामुळे त्याच्या तात्त्विक परिक्षणाची मला कधीच गरज वाटली नाही. जरी या लोकांनी त्याच्याभोवती एका लांबलचक तत्त्वज्ञानाची उभारणी करून ठेवली आहे तरी तत्त्वज्ञान म्हणून तिच्यात काही सार नाही. कारण, ही उभारणी नसून भारणी आहे. कावीळ झालेल्याची ती दृष्टी आहे. उदाहरणार्थ, संघर्ष नावाचे एक परमतत्त्व हे मानीत असतात. सर्वत्र संघर्षाशिवाय या दुनियेत दुसरे काहीच नाही. 'नान्यत् अस्ति' हे वादी लोकांचे बिरुदच आहे. ज्याप्रमाणे तो परमाणूवादी कणाद मरताना 'पीलवः पीलवः पीलवः' परमाणु परमाणु परमाणु असे जपतच मेला, तशासारखे हे संघर्षवादी आहेत. लहान मुलाला आईच्या स्तनांतून दूध मिळते हा चमत्कारही कसा होतो? यांच्या दृष्टीने तो एक महान संघर्षच असतो. आईच्या स्तनाचा आणि मुलाच्या मुखाचा. मी तर हा दृष्टांत विनोदाने दिला, पण हे लोक तो गांभीर्याने पत्करतील. सारांश, ज्याला आम्ही सहकार समजतो, तोही जिथे संघर्ष आहे, तिथे प्रतिकार केवढा संघर्ष होईल! डॉ. रघुवीरच्या भाषेत बोलायचे तर तो एक प्रसंघर्षच होईल. अशा भारलेल्या लोकांशी वाद काय घालायचा? त्यांचे कौतुकच करायचे. इथे तत्त्वज्ञानानुसार आचार रचायचा नाही, ठरविलेल्या आचारानुरूप तत्त्वज्ञान रचायचे आहे.

सृष्टीचे मन बनले आहे की, मनाची सृष्टी बनली आहे, असाही हे लोक एक वाद घालीत असतात. सृष्टीचे मन बनले आहे याबद्दल एका भ्रमिष्टाशिवाय कोणालाच शंका नाही. मनाची सृष्टी बनली असती तर सृष्टीकर्त्या ईश्वराची कुणाला गरज पडली असती? पण सृष्टीचे मन बनले असले तरी सृष्टी आणि मन दोहोंहून वेगळा आत्मा शिल्लकच राहतो. पण त्याचा इथे पत्ताच नाही. आणि पत्ता कुणी दिला तर हे सहजच त्याचा इन्कार करतील. शंकराचार्य अशा माणसाला म्हणतात : 'बाबा, तुझ्याशी माझा वादच नाही. कारण आत्म्याचा इन्कार करणारा जो तू, तो तूच आत्मा आहेस! तू त्याचा स्वीकार करशील तर तुझ्या स्वीकार करण्याने तो सिद्ध होईल. तू त्याचा इन्कार करशील तर तुझ्या इन्कार करण्याने तो सिद्ध होईल.' 'मी जागतो आहे' म्हणणाऱ्याची जागृती जितकी सहज सिद्ध होते, तितकीच मला झोप लागली आहे म्हणणाऱ्याचीही ती सिद्ध होते. सृष्टी आणि मन दोहोंनाही आकार देणारा आत्मा हा तिसरा विचारातच न घेता समाज-रचनेच्या फेऱ्यात सापडल्यामुळे सद्गुणांची स्वतंत्र मातब्बरी उरलीच नाही. ज्यांना आम्ही आध्यात्मिक सद्गुण म्हणतो ते या लोकांच्या दृष्टीने केवळ अर्थशास्त्राची पैदास आहे.

आत्मशून्य विचारात व्यक्ति-स्वातंत्र्याचा प्रश्नच उठत नाही. हजामतीत किती केस कापले जातात याची गणती कोण कशाला करतो! व्यक्ती येतात आणि जातात, समाज कायमचा चालू असतो, तेव्हा समाजालाच अस्तित्व आहे, व्यक्ती शून्य आहे, इतकेच ओळखायचे आहे.

सगर-पुत्राने ज्याप्रमाणे गंगेचा ओघ शोधून काढला त्याप्रमाणे या तत्त्ववेत्त्यांनी सबंध मानवी इतिहासाचा ओघ शोधून काढला आहे. निर्णय हा लागला आहे की ज्याप्रमाणे बाण सुटल्यानंतर त्याची दिशा बदलू शकत नाही, निश्चित दिशेने त्याला जाणे भागच पडते, त्याप्रमाणे आमची स्थिती आहे. पूर्वेतिहासाच्या प्रवाहाने आमच्या कार्याची दिशा ठरवून टाकलेली आहे. आम्हाला क्रिया-स्वातंत्र्य उरलेले नाही. आधी रक्ताच्या नद्या वाहतील, मग दुधा-मधाच्या वाहतील, आणि शेवटी सर्वांची तृष्णा भागविणारी शीतल जलाची नदी दरेकाच्या घरावरून वाहत जाईल, असे सर्व ठरलेले आहे. युक्लिडच्या भूमितीप्रमाणे क्रांतीचे एक सुव्यवस्थित शास्त्र इतिहासाच्या निरीक्षणाने आणि संशोधनाने यांना लाभले आहे. क्रांती आधी कुठे कुठे होईल याचे भाकीतही मार्क्सने करू ठेवले होते. यद्यपि ते खरे झालेले नाही तरी ज्योतिषाची भाकीत वर्तविण्याची ती नजरचूक आहे. तेवढ्याने फल-ज्योतिष्याचे शास्त्र निष्फळ झालेले नाही. यमाची ओढ जशी टळायची नाही, त्याप्रमाणे क्रांतीचे भविष्य टळायचे नाही. अशा स्थितीत तीत भाग घेणे, तिला हातभार लावणे, एवढेच आपल्या हातात आहे आणि एवढेच आपले काम आहे.

अशा या आत्यंतिक निष्ठेत गांधी-विचार बसू शकत नाही हे दाखवून देण्याची गरज भासून त्यासाठी किशोरलालभाईंनी






हा अल्पसा प्रयास केला आहे.

### ५. बुद्धौ शरणं अन्विच्छ

वाल्मिकीने राम-चरित्र आधीच लिहून ठेवले होते म्हणतात. आणि मग राम त्याबरहुकूम अक्षरशः वागले. त्यामुळे रामाला काडीचीही अडचण पडली नाही. बघायचे नि वागायचे. परिणामही लिहून ठेवलेला. त्यामुळे त्याचीही चिंता करायचे कारण नाही. अशी साम्यवाद्यांची स्थिती. मार्क्सने लिहिले, तसे लेनिन वागला. आम्हीही त्याचा मागोवा घेत घेत सरळ मुक्काम गाठायचा. मार्क्सच्या लिहिण्यात आणि लेनिनच्या वागण्यात कुठे तफावत पडल्याचा भास होतो, तेवढी एकवाक्यता करून दाखवायचा प्रयास कधी कधी करावा लागतो. तेही तितके जड काम नसते. कारण श्रुति-वचनानुसार स्मृति असायची असे ठरले असल्यामुळे स्मृतिवचन अधिक स्पष्ट असले तर तदनुरोधाने श्रुति लावून घेतली म्हणजे झाले. इतके केले म्हणजे बाकी सर्व 'लाईन क्लिअर!'

गांधी-विचाराची नेमकी त्याच्या उलट दशा, त्यांची पक्की खंबीर इमारत, यांचे सारे भोंगळवाणे भुयार. गांधीजींची वचने पहावी तर त्या वचनांचाही विकास झालेला. पुढच्यांचे विरुद्ध मागचे वचन निघाले तर त्याची संगती लावत बसू नका. पुढचे घेऊन मागचे सोडा असे सांगून ते मोकळे होतात. त्यांच्या मोठ्यातल्या मोठ्या लढ्यात पूर्व योजना नसायची, तंत्र नसायचे, रचना नसायची. एक पाऊल पुरे म्हटल्यावर दोन पावले देव दाखवतो कशाला? बरे, पुढची वचने तरी प्रमाण मानायची का? तर म्हणतात, वचन प्रमाण मानू नका. आपली अक्कल वापरा. मी असताना मला विचारीत जा. माझ्या मागे सगळे सर्वतंत्र-स्वतंत्रच आहात. त्यामुळे अनुयायांचाही कोणाशी कोणाचा मेळ बसायचा नाही. एक गृहस्थ विनोदाने म्हणाले, 'गांधी गीता-भक्त आणि त्यांचे निकटचे सहकारीही गीता-भक्त, आणि सर्वांनीच गीतेवर काही ना काही लिहिले आहे. पण कुणा एकाचाही गीतार्थ दुसऱ्याच्या गीतार्थाशी मेळ खात नाही.' हा विनोद आपण विसरून जाऊ, कारण त्याने गीतेच्या शब्दांची व्यापकता प्रकट होण्यापलीकडे अधिक काही सिद्ध होत नाही. पण एवढी गोष्ट खरीच आहे की जीवनविषयक कोणत्याही महत्त्वाच्या प्रश्नावर किंबहुना खादीसारख्या सर्वोदय-विचाराच्या मूलभूत मुद्द्यावरही गांधींचे सारे निकट-सहकारी एकच धोरण दर्शवतील असे सांगता येत नाही. यासाठीच गांधीजींनी आपले विचार शास्त्रीय भाषेत मांडावे असे कोणी सुचविले होते. त्यावर त्यांनी उत्तर दिले की एक तर असे करण्याला मला फुरसत नाही, आणि दुसरे माझे प्रयोग अजून चालू आहेत; त्यांतून शास्त्र हळूहळू केव्हा बनायचे तेव्हा बनेल. त्यांनी दिलेली कारणे अगदी समर्पक अशीच होती. पण आणखीही एका कारणासाठी मला त्यांचे उत्तर नेमके पटले. शास्त्रीय परिभाषेला सजवून काय होणार? तर तद्विरोधी शास्त्रीय परिभाषेला उत्तर मिळणार! पण जसे शस्त्र-बलाने खच्ची होत नाही, उलट वाढीला लागते आणि एका समस्येतून अनेक समस्यांना जन्म देते, तसे एका परिभाषेशी दुसरी परिभाषा लढवण्याने उलगडा होण्याऐवजी घोटाळाच वाढतो. म्हणून विचार परिभाषेत ठोकून न बसवता मोकळा राहू देणेच अधिक लाभाचे असते. पण त्यातून विसंवादी सूर निघू पाहतात, आणि बुद्धाच्या अनुयायांसारखी गत होते. त्यांनी जशा चौघांनी चार वाटा धरल्या तसे हे दहाजण दाही दिशेला लागतात. गांधीजींनी म्हटल्याप्रमाणे ज्याने त्याने आपली अक्कल सांभाळून असावे, हाच यावर उपाय आहे.

### ६. तीन गांधी-सिद्धांत

गांधी-विचारांचा मोकळेपणा कायम राखून, त्याला काहीसे व्यवस्थित रूप देण्याचा किशोरलालभाईंनी प्रयत्न केला आहे. वर्ण-व्यवस्था, विश्वस्तवृत्ती, आणि विकेंद्रीकरण या तीन बाबींचा मिळून एक आराखडा बनविला आहे. त्यावर थोडी नजर टाकू या.

(अ) वर्ण-व्यवस्थेच्या जुन्या कल्पनेत नवीन अर्थ भरून अथवा त्या कल्पनेतील मूलभूत विचार लक्षात घेऊन, गांधीजींनी तिचा स्वीकार केला आहे. हा त्यांचा एक अहिंसेचा प्रयोग आहे असे मला वाटते. एखाद्या समाजात आदरणीय झालेले शब्द आणि कल्पना तोडून न पाडता, त्या मान्य करून त्यांच्या अर्थाची वाढ करणे, त्यांना विकसित रूप देणे, त्यात नवजीवन घालणे ही अहिंसेची प्रक्रिया आहे. भारतीय परंपरेतील समन्वयाचा सारा विचार या अहिंसेच्या प्रक्रियेतून निघाला आहे. जुन्या शब्दांत नवीन अर्थ भरल्याची जाणीवही या प्रक्रियेत नसते. जुन्या शब्दांच्या मूळ अर्थाला उजाळा दिल्याचा भास तीत असतो. गीतेने यज्ञादि शब्दांच्या अर्थाचा

विकास करून हा मार्ग घालून दिलेला आहे. या प्रक्रियेत शब्दाची ओढाताण होण्याचे पुष्कळ भय असते. तसे झाल्यास तो अहिंसेचा प्रयोग न होता असत्याचा प्रयोग होतो. शब्दाची ओढाताण न करता मुक्त आदराने शब्दार्थांचे स्वल्पमात्र दोहन केल्यास ती अहिंसेची प्रक्रिया होईल. गांधीजी भारतीय संस्कृतीत जन्मले नि वाढले, आणि त्याच संस्कृतीत मुरलेल्या जनतेसाठी ते बोलत होते म्हणून त्यांनी वर्ण-समाज-कल्पना स्वीकारली आहे असे मला वाटते. निराळ्या भाषेत सांगायचे तर ते जर दुसऱ्या एखाद्या समाजात जन्मले असते आणि त्या समाजासाठी बोलत असते, तर अहिंसक समाज-रचनेचे अपरिहार्य अंग म्हणून वर्णव्यवस्था हा शब्द आणि ही कल्पना त्यांना स्वतंत्रपणे सुचली असती असे सांगता येत नाही. तरीही या कल्पनेचे सार- जे त्यांनी ग्रहण केले आहे ते तेव्हाही दुसऱ्या एखाद्या शब्दाने त्यांना घ्यावेच लागले असते असे म्हणता येईल. मला म्हणायचे हे आहे ज्यांना वर्ण आणि वर्णव्यवस्था हे शब्दच आवडत नाहीत त्यांनी गांधीजींनी हे शब्द वापरले असता बुजून जाण्याचे कारण नाही. येथे शब्दांचा आग्रह नाही, सार घ्यायचे आहे.

१) मजुरीची तुल्यता, २) चढाओढीचा अभाव, आणि ३) आनुवंशिक संस्काराचा लाभ घेणारी शिक्षण-योजना - हे वर्ण-व्यवस्थेचे सार आहे.

आमच्या दृष्टीने अहिंसक समाज-रचनेत एवढेच अभिप्रेत आहे.

(आ) वर्ण-व्यवस्थेप्रमाणे ट्रस्टी-शिपच्या थिअरीची गोष्ट आहे. हाही शब्द अनेकांना आवडत नाही. वर्ण-धर्म शब्द मुळात निःसंशय एका सद्विचाराचा आणि सुयोजनेचा द्योतक आहे. ट्रस्टी-शिपच्या थिअरीसंबंधाने कदाचित खात्रीपूर्वक तसेही म्हणता येणार नाही. म्हणजे हा शब्द जेव्हा जन्मला तेव्हापासूनच त्याचा दुरुपयोगही जन्मला आहे. परंतु कायद्याच्या भाषेत त्याचा चांगला अर्थ संगृहीत आहे. आणि गांधीजी कायद्याचे अभ्यासी म्हणून तो शब्द त्यांना चिकटला. आणि ते सत्योपासकही असल्यामुळे त्यांनी त्याचा मूळ शुद्ध अर्थ आपल्या हृदयात साठविला. मी कायद्याचा अभ्यासू नसल्यामुळे गांधीजींनी हा शब्द वापरला असूनही ज्या अर्थाने तो शब्द उपयोजिला त्या अर्थाविषयी मी गैरसमज करून घेऊ शकलो नाही. गीतेतील अपरिग्रह, समभाव इत्यादी शब्दांनी गांधीजींच्या मनाची फार पकड घेतली आणि या वृत्तींचा व्यवहारात विनियोग कसा करावा याचे चिंतन करीत असताना कायद्यातील ट्रस्टी शब्दाची मदत झाली. गीतेच्या अभ्यासाने ट्रस्टी शब्दाच्या अर्थावर विशेष प्रकाश पडला आणि त्या शब्दाने अपरिग्रहाचे कोडे उलगडले, असे गांधीजींनी आत्म-कथेत निवेदन करून ठेवले आहे. सारांश गांधीजींच्या दृष्टीने समाजातल्या आजच्या परिस्थितीतच नव्हे पण कोणच्याही परिस्थितीत देहधारी माणसाला आपल्यापाशी असलेल्या शक्तींचा ट्रस्टी या नात्याने उपयोग करणे हाच अपरिग्रह साधण्याचा व्यवहार्य उपाय आहे. किशोरलालभाईंनी त्याची जी बारीक छाननी केली आहे ती अगदी मूढ-बोध झाली आहे. तीत गूढ काहीच उरलेले नाही. आणि गैरसमजाला जागा राहिलेली नाही, असे मला वाटते.

संपत्तीची विषमता कृत्रिम व्यवस्थेने निर्माण झालेली म्हणून बाजूस सारली तरी मानवातील बौद्धिक आणि शारीरिक शक्तींची विषमता काही अंशी कमी करता येईल असे आपण मानू. तथापि आदर्श स्थितीतही या विषमतेचा सर्वथा अभाव कल्पिता येणार नाही. म्हणून बुद्धी, शरीर आणि संपत्ती तिन्ही ज्या कोणाला लाभल्या आहेत त्याला त्या सर्वांच्या हितासाठी लाभलेल्या आहेत असेच समजले पाहिजे. यालाच चांगल्या अर्थाने ट्रस्टीशिप म्हणायचे. पण तो शब्द दुर्जनांच्या हातात सापडून इतका पतित झाला आहे की त्याचा उद्धार आता अशक्यप्राय आहे. म्हणून त्याच्याऐवजी 'विश्वस्त-वृत्ती' हे भाववाचक नाम-पद मी योजले आहे. कुणी कुणावर विसंबू नये, हे स्वावलंबनाचे तत्त्व म्हणून आपण सामान्यतः मान्य करू. पण कुणी कुणावर विश्वसू नये असे झाल्यास ती एक नरकाची योजना होईल. आई-बापांनी मुलावर, मुलांनी आईबापावर, शेजाऱ्यांनी शेजाऱ्यावर इतकेच काय पण भिन्न भिन्न राष्ट्रांनी एकमेकांवर विश्वास ठेवला पाहिजे. असा विश्वास जर आपल्यास धोक्याचा वाटला तर आपण मानवतेहून खालच्या पायरीवर विचार करीत आहोत असा अर्थ होईल. अशी 'विश्वस्त-वृत्ती' शिक्षणाने परिपुष्ट करता येईल. तसे करण्याऐवजी साऱ्या समाजाचा एकच मुटका करून टाकू म्हणजे ही विश्वासाची भानगडच उरणार नाही, असे मानणे हा बौद्धिक आळसच होईल.

परस्पर-विश्वासावर आधारलेली समाज-रचना म्हणजे

अनुक्रमणिका






सर्वांच्या विविध शक्तींचे सुसंवादी संयोजन. लोक-संग्रह या शब्दाने आम्ही हा अर्थ दर्शवीत आहोत. व्यक्तिगत अपरिग्रह म्हणजेच विश्वस्त-वृत्तीने शक्तींचा सर्वार्थ उपयोग करणे हे लोक-संग्रहाचे एक मूलभूत तत्त्व आहे. ट्रस्टीशिप शब्द वाटल्यास सोडून द्या, पण हे तत्त्व सोडू नका एवढेच म्हणावयाचे आहे.

(ई) विकेंद्रीकरणाची गोष्ट मात्र अगदीच निराळी आहे. तो शब्द नवीनच असल्यामुळे त्याच्याशी भलेबुरे काहीच भाव अथवा संस्कार चिकटलेले नाहीत. तो शब्द जसा नवीन आहे, तसाच त्याचा अर्थ, म्हणजे त्यामागील कल्पनाही नवीनच आहे. 'यंत्र-युग येण्याच्या पूर्वी सारे विकेंद्रीकरणच होते. मग त्यात नवीन असे काय आहे' असे कोणाला वाटेल. यंत्र-युगापूर्वी विकेंद्रीकरण नव्हते. पण सारे विकेंद्रित होते. खेडोपाडी सारे उद्योग विकेंद्रित स्वरूपातच चालले म्हणजे तेवढ्याने विकेंद्रीकरण होत नाही. विकेंद्रीकरणात विकेंद्रित उद्योगावरोबर समग्र दृष्टीची एक व्यापक योजना गृहीत आहे. तशा योजनेच्या अभावी विकेंद्रित उद्योग म्हणजे विखुरलेले उद्योग इतकाच अर्थ होतो. असे विखुरलेले उद्योग यंत्र-युगापूर्वी होते. साहजिकच यंत्र-युगाच्या पहिल्या फटक्यासरशी ते मोडकळू लागले. विकेंद्रीकरण मोडकळीस येणारे नाही, यंत्र-युगाला मोडून टाकणारे आहे. आजचे यंत्र-युग नावाने तसे असले तरी वस्तुतः ते अत्यंत अयंत्रित आहे. त्याऐवजी साम्यवादी, सुयंत्रित यंत्र-युग चाहतो. पण जशी शस्त्रे तशीच यंत्रेही मानवाने शोधली असली तरी ती स्वतः अमानवत आहेत. त्यामुळे त्यांचे मानवीकरण एका हद्दीपलीकडे होऊ शकत नाही. उलट तीच मानवाला आपल्या हातात खेळवतात. या ठिकाणी शस्त्रे म्हणजे संहारक शस्त्रेच समजावयाची. सर्जनच्या हातातली उपकारक शस्त्रे समजावयाची नाहीत हे उघड आहे. तसेच यंत्रे म्हणजे मानवाला बेकार, आळशी अथवा जड बनविणारी लुटारू यंत्रे समजावयाची आहेत. मानवाच्या मदतीला धावून येणारी, त्याच्या हातात उपकरणासारखी शोभणारी, मानव-स्वभावाने भावित झालेली औजारे समजावयाची नाहीत. एकच उदाहरण द्यायचे तर व्हील-बॅरोचे देता येईल. आम्ही खणत असलेल्या विहिरीतील मलमा वाहून नेण्याच्या कामी तो आम्हाला किती मदत करतो याचा मी दररोज अनुभव घेत आहे. सेनापती बापटांच्या उक्तीने मी मनात म्हणत असतो 'धन्य धन्य हे औजार!' हेही यंत्र-युगानेच दिले आहे; तेव्हा विकेंद्रीकरण यंत्र-युगाला मोडून टाकणार असे जेव्हा आम्ही म्हणतो तेव्हा त्या यंत्र-युगाचा हा असा लाभ घेऊन त्याला मोडून टाकणार असे मला म्हणायचे आहे. असा लाभ घेतल्याशिवाय यंत्र-युग मोडलेही जायचे नाही. अशी शक्ती, म्हणजे यंत्र-युगाला पोटात जिरवून टाकण्याची कुवत जुन्या विकेंद्रित उद्योगात नव्हती. विकेंद्रित उद्योग आणि विकेंद्रीकृत उद्योग या दोहोंमध्ये हा मोठा मूलभूत शक्तिभेद आहे. म्हणून विकेंद्रीकरण हा शब्द आणि त्याने दर्शित कल्पना दोन्ही नवीनच आहेत. हे विश्लेषण लक्षात घेतले तर विकेंद्रीकरणाविरुद्ध येणारे बरेचसे आक्षेप खडकावर चालविलेल्या तरवारीच्या धारेप्रमाणे बोथड झाल्याशिवाय राहणार नाहीत.

पण विकेंद्रीकरण केवळ उद्योगांपुरतेच नसते. विकेंद्रीकरणाची प्रक्रिया राज्य-सत्तेवरही लागू होते. अहिंसक समाज-रचनेची घोषणा करणाऱ्या विचारकांच्याही लक्षातून ही गोष्ट कधीकधी निसटते. ते औद्योगिक विकेंद्रीकरणाचे समर्थन करून त्याच्याच बचावासाठी मजबूत केंद्रीय सत्तेची (बहुधा मधल्या काळापुरती) कधी कधी मागणी करीत असतात. साम्यवाद्यांच्या कल्पनेतही राज्य-सत्ता शेवटी कडक उन्हाळ्यातल्या तुपाप्रमाणे विरघळून जायची आहे. पण तत्पूर्वी त्यांना ती, हिवाळ्यात थिजलेल्या तुपाइतकीच नव्हे तर ट्रॉट्स्कीच्या डोक्यात हाणलेल्या लोखंडी हातोड्याइतकी, त्यांच्या त्या आदरणीय मुद्रेइतकी, घट्ट आणि मजबूत हवी असते. मधल्या काळासाठी ही कोलांट-उडीची योजना अगदी जुन्या काळापासून आजतागाईतचे बहुतेक सगळे 'जबाबदार' महाजन करीत आले आहेत. गांधींनी मात्र मधल्या, आदल्या आणि शेवटल्या तिन्ही काळासाठी सत्तेच्या विकेंद्रीकरणाची योजना कल्पिली आहे. ती वाटल्यास राम-राज्यातली कल्पना म्हणून जुन्या त्रेतायुगात ढकलून द्या, किंवा भावी सर्वोदयाची योजना म्हणून भविष्य काळावर सोपवून द्या, पण तूर्त ही भाषा बोलू नका, असे आमच्या मित्रांचे म्हणणे आहे.

## ७. माऊली आणि गुरु-माऊली

गांधीविचार आणि साम्यवाद यात अनेक मुद्द्यांचर विरोध असला तरी समान अंशही आहेच. आणि तोही महत्त्वाचा आहे. राम-रावणातही कवीला रकार-साम्य आढळले; मग हे तर बोलून-चालून सद्भावनेने प्रवृत्त झालेले लोक-कल्याणेच्छू


अनुक्रमणिका

वाद आहेत. त्यांत समान अंश कसा नसेल? गरीबांचा कैवार हा या दोहोंचा स्थायी भाव आहे. 'गुण-समूहामध्ये एखादा दोष सहजच जिरून जातो, किंबहुना त्यामुळे तो गुण-समूह अधिकच खुलून निघतो' अशा अर्थाचे कालिदासाचे एक वाक्य आहे. पण या उलट एखाद्या उत्कट गुणातही सारा दोष-समूह जिरू शकतो. उत्कटतेची ही थोरवी आहे. गरीबांची आज जगभर अशी दैना आहे की एखाद्या आईच्या कळकळीने त्यांना सावरण्याची, आणि सावरण्याचीच नव्हे तर समुन्नत करण्याची, ज्याने हिंमत बाळगली आणि हाव धरली, तो त्याने जणू सर्वदोषापहारी हरिनामाच्या तोलाचा गुण संपादिला असेच म्हटले पाहिजे.

गांधीविचार आणि साम्यवाद आईच्या कळकळीने गरीबांचा उद्धार करू पाहतात. पण पुष्कळ वेळा आईची वेडी माया त्वरित परिणामास गुंतून स्थायी परिणामाकडे दुर्लक्ष करते. तसा प्रकार साम्यवादाचा झालेला आहे. आईच्या कळकळीनेही प्रश्न सुटू शकत नाहीत, प्रश्न सोडवण्याची उत्कंठा त्या कळकळीतून जन्मास येते. प्रश्न सोडवण्याला गुरूच्या कुशलतेची अपेक्षा असते.

एका उत्कट पण विचार गमावून न बसलेल्या साम्यवाद्याशी चर्चा चालली होती. मी विचारले,

'हिंसा ही आम-जनतेची शक्ती म्हटली जाईल का?'

ते म्हणाले, 'सामान्यतः नाही म्हटली जाणार; पण विशेष प्रसंगी आणि विशेष उपायांनी हिंसेसाठी जनता तयार करता येते.'

मी म्हटले, 'समजा विशेष प्रसंगापुरती तयार करता आली, तरी उपयोग काय? एकदा कमाऊ आणि कायमचे खाऊ असे तर व्हायचेच नाही. जी शक्ती आमच्या स्वभावातली नाही तिचा उसना आव आणला तरी शेवटी ज्यांच्या स्वभावातच ती शक्ती आहे अशा लोकांच्या हातातच सत्ता राहायची. बरे, जनतेचा स्वभावच पालटू म्हटले तर, एक तर ती अशक्य गोष्ट आहे, आणि समजा शक्य झाली, म्हणजे सारा समाज क्रूर-स्वभाव बनला तर ती एक अत्यंत भयानक घटना होईल. अशी घटना की ज़िचे परिणाम तुमच्याही अपेक्षेच्या किंवा कल्पनेच्या पार पलीकडे जातील.'

ते म्हणाले, 'जाऊ देत. काहीही परिणाम होऊ देत. आजची स्थिती पालटू दे, म्हणजे झाले.'

मी म्हटले, 'आजची स्थिती पालटण्याचा भास क्षणभर खुशाल होईल; पण पुढे दुप्पट जोराने तीच स्थिती उलटेल.'

ते म्हणाले, 'उलटली तर उलटली! पुढचे पुढे पाहू.'

मी म्हटले, 'हे वैज्ञानिक बुद्धीचे लक्षण नाही. व्याकुळ बुद्धीचे बोलणे आहे. साम्यवादी वैज्ञानिक बुद्धीचा दावा करीत असतात.'

ते म्हणाले, 'होय, करीत असतात; कारण एकदा सत्ता हातात आल्यावर कायमची व्यवस्था करून टाकू अशी त्यांनी भाषा काढली आहे. कायमच्या व्यवस्थेची भाषा मला पटत नाही; कारण, जगात काहीच कायमचे टिकू शकत नाही. तरीपण श्रीमंतांना एकदा श्रीहत करायला हवेच. पुढचा प्रश्न पुढच्या पिढ्या सोडवित बसतील.'

साम्यवादी लोक या माणसाला कच्चा साम्यवादी समजतील. मी त्याला 'भ्रमिष्टपणातही शुद्धीवर असलेला माणूस' समजतो. कायमच्या व्यवस्थेचा कडेकोट बंदोबस्त जरी साम्यवादी-तत्त्वज्ञानाने रचला असला तरी ती त्याने एक अफूची गोळीच शोधून काढली आहे. सर्वसामान्य साम्यवाद्यांची भूमिका 'त्वरित दान महापुण्य' अशीच असते. माऊलीची व्याकुळता त्यात दिसून पडते, गुरूमाऊलीची कुर्मदृष्टी तीत नाही.

### ८. एकच तरणोपाय

ते कसेही असो, हिंदुस्थानच्या अज्ञान जनतेची आज स्वराज्य प्राप्तीनंतरही अत्यंत केविलवाणी दशा आहे. तिला कसेही करून आपली सोडवणूक हवी आहे. भिन्न भिन्न वादांचा विचार करण्याची तिला शक्ती नाही. फुरसतही नाही. साहजिकच नवसास पावेल तो देव, अशी तिची स्थिती आहे. म्हणून किशोरलालभाईंनी शेवटी दिलेला इशारा विसरून चालायचे नाही. साम्यवादाचा निषेध करून किंवा तिला तात्त्विक उत्तरे देऊन, किंवा सत्तेच्या बळावर त्याचे दमन करून काम भागणार नाही. पावसाळ्यात नदीनाले सगळीकडे तुडुंब भरून येऊन जसे समुद्रात लोटत असतात, त्याप्रमाणे स्वराज्यकाली सर्व सेवकांची सेवा ग्रामीण आणि आपद्ग्रस्त जनतेच्या दिशेने धावत गेली पाहिजे.

सुदैवाने एवढ्या आपत्तीतही जनतेचे हृदय अजून

अनुक्रमणिका






शाबूत आहे. खेडोपाडच्या लोकांची अजून अशीच श्रद्धा आहे की आमची कधी काळी सुटका होणार असेल तर ती गांधींच्या मार्गानेच होईल. आजचे सरकार गांधींच्या सहकाऱ्यांचे सरकार आहे. देशातली सर्वांत मोठी संघटना जी काँग्रेस तीही गांधीजींनीच वाढवलेली आहे. सर्वोदयवाले रचनात्मक कार्यकर्ते तर गांधी विचाराचे बिरुद मिरवणारे आहेत. हिंदुस्थानचे समाजवादी देखील गांधीजींचीच प्रजा आहेत. आणि या देशात सत्याग्रही समाजवाद स्थापन करण्याची त्यांची घोषणा आहे. हे दोघे, तिघे, चौघे सारे एकवटून आपापल्या शक्तीनुसार, आपापल्या वळणास धरून, पण सहविचाराने जनतेच्या सेवेस भिडले तर दैन्य, दारिद्र्य, दुःख कुठे तोंड दाखवू शकेल? पण या चौघांनी आज चार वाटा धरल्या आहेत. आणि तो पाचवा धावून येत आहे. कोण तो पाचवा? उपनिषदांच्या भाषेत 'मृत्युर् धावति पंचमः'.

एक म्हणतो, 'माणसे अक्षरशः उपाशी मरू लागली.' दुसरा उत्तर देतो, 'उपाशी नाही मरत ती, काहीतरी रोगानेच मरताहेत.' उपाशांनाही मरणापूर्वी कोणता तरी रोग गाठतो! रामदासांनी म्हटल्याप्रमाणे :

'काही मिळेना मिळेना मिळेना खायाला।
ठाव नाही रे नाही रे नाही रे जायाला।
हौस कैची रे कैची रे कैची रे गायाला?
कोठे जावे रे जावे रे जावे मागायला?
अशी स्थिती झाली आहे.

पण म्हणून मी कोणाला दोषही देत नाही, आणि निराशही होत नाही. दोष एवढ्यासाठी देत नाही की, देश मोठाच आहे, त्याचे प्रश्नही मोठे आहेत; तर मतभेदही मोठे असल्यास नवल नाही. निराशही होत नाही; माझ्या हातात कुदळी असताना मी निराश का होईन? आमच्या येथे प्रश्न निघाला - ठिकठिकाणी विहिरी खणल्या गेल्या तर अधिक पैदास होऊ शकेल, उपासमार टळेल; सरकारने या दिशेने विचार केला पाहिजे. मी म्हणालो, आपणच तर सरकार! सरकार आणखी कोण आहे? चला लागू या आपणच खणायला. खणायला आरंभ केला. खणणारांना काडीचा अनुभव नव्हता. पण कुदळी आपले काम करीत होती. खणणारांना पाण्याचा थांग नव्हता; कुदळीला तो होता. ती खणतच चालली. बघता बघता पाण्यानेही दर्शन दिले. आसपासचे लोक तीर्थजल म्हणून ते पाणी प्राशन करू लागले. जवळच्या गावचा एक पाटील म्हणाला, 'म्हातारे कोटी बाबादेखील विहिरीवर काम करू लागले, मग आपणही का विहीर खणू नये?' त्याने आपल्या गावात विहीर खणण्यास सुरुवात केली. आणि सुरगावच्या तरुण मुलांनी तर कमाल केली. ते म्हणाले, 'दिवाळीचे दिवस आहेत; आपण बाबाजींच्या विहिरीवर कामाला जाऊ या' आणि पाचपंधरा तरुण आम्हाला अगाऊ न कळवता आमच्या विहिरीवर येऊन हजर झाले, आणि चार तासांचे आश्रमाला श्रमदान देऊन गाजावाजा न करता परत गेले. जनतेच्या हृदयात एवढी दिव्य प्रेरणा, परमेश्वर जागवीत असताना कोणी का निराश व्हावे? रामदास विचारतात - 'कोठे जावे रे जावे रे जावे मागायला?' कोठे मागायला जायचे? अमेरिकेपाशी? दुसऱ्या देशापुढे का हात पसरायचे स्वराज्यातल्या लोकांनी? श्रमदेवतेची करू या उपासना, आणि तिच्याचपाशी मागू या. ती म्हणतेच आहे - 'मागा म्हणजे मिळेल, शोधा म्हणजे सापडेल.'

मला तरी 'कांचन-मोह-मुक्ती' आणि 'शरीर-परिश्रम' या एकाच गोष्टीत आज हिंदुस्थानची सोडवणूक दिसते, गांधीविचाराचे सार दिसते. साम्यवादाशी त्याचा मेळ दिसतो, आणि साम्यवादावर तोडगाही दिसतो, आणि तोडगा दिसतो भांडवलशाहीवरही.



# साम्यवादाचे परीक्षण

कम्युनिझम किंवा साम्यवाद म्हणजे काय? काही लोक हा शब्द ऐकून घाबरतात. कम्युनिस्ट नास्तिक आहेत असे ते म्हणतात. परंतु कम्युनिस्ट व कम्युनिझम् हे शब्द बायबलमधील आहेत. येशूचे शिष्य खाजगी संपत्ती बाळगीत नसत, ते सगळे मिळून एकत्र राहत, त्यांचे एक कम्यून असे - असे वर्णन बायबलमध्ये आहे. 'कम्युनिझम्' शब्द त्यातूनच आला आहे.

**प्रतिक्रियात्मक विचार**

आज 'कम्युनिझम्' ज्याला म्हणतात, त्याचा जन्म

अनुक्रमणिका






युरोपमध्ये एका विशिष्ट परिस्थितीत झाला. युरोपात भांडवलदारी निर्माण झाली. कारखाने व मोठमोठी शहरे निर्माण झाली. जगभरातील संपत्ती तेथे गोळा होऊ लागली. त्यातून मालक-मजुरांची भांडणे होऊ लागली. मालक मजुरांना दाबून ठेवत होते. याच्या प्रतिक्रियेतून साम्यवादाचा जन्म झाला. प्रतिक्रियात्मक विचार संपूर्ण जीवनसिद्धांत बनू शकत नाही. तो नेहमी बदलत राहतो.

समाजवाद हाही स्वतंत्र विचार नाही. साम्यवाद भांडवलशाहीची प्रतिक्रिया आहे, तर समाजवाद व्यक्तिवादाची. दोन्ही प्रतिक्रियात्मक विचार असल्यामुळे त्यांच्यात पूर्ण दर्शन नाही.

कार्ल मार्क्सकडून जगाला एक महत्त्वाचे तत्त्व मिळाले - 'जगातील सर्व गरीब लोक एक आहेत. ते उभे राहू शकतात. स्वतंत्र होऊ शकतात.' इतक्या स्पष्ट व असंदिग्ध शब्दांमध्ये हा विचार पूर्वी कोणी मांडला नव्हता की गरीब मनुष्यही आपल्या शृंखला तोडून उठून उभा राहू शकतो. याचा अत्यंत चांगला परिणाम झाला. परंतु यासोबत एक चुकीचा विचारही स्थिर झाला. तो हा की समाजातील भांडवलदारांना मानवतेची ओळख नाही. म्हणून त्यांच्या विरोधात हा विचार उभा राहिला. दीन बनलेल्या गरिबांमध्ये दैन्याबद्दल प्रतिक्रिया उत्पन्न झाली. फलस्वरूप प्रतिहिंसेची भावना जागृत झाली.

मार्क्सवादाने जगाला जवळपास शंभर वर्षे प्रेरणा दिली. पण शंभर वर्षांपूर्वी त्याचा जो बोलबाला होता तो आज नाही. कारण त्या विचारात अमर अंश कमी व अस्थायी अंश जास्त होता. समाजातील उणिवा व दोष ह्यांची प्रतिक्रिया म्हणून काही विचार निर्माण होतात. आणि असे प्रतिक्रियात्मक विचार त्यावेळेपुरते फारच परिणामकारक असतात व त्याकाळी त्यांचा प्रभावही बराच पडतो. पण ज्या विचारांच्या विरोधात ते उभे असतात तो विचार खतम झाला की हेही खतम होतात. याच न्यायाने साम्राज्यवादाच्या नाशाबरोबर, त्याच्या प्रतिक्रियेतून निर्माण झालेले विचार खतम होत चालले आहेत. लाकडाला विस्तव लावला की ते लाकूड जळून भस्मसात होते, पण तो विस्तवही लाकडासोबत नष्ट होतो. सूर्यकिरणे कोणाला जाळीत नाहीत; कारण ती अक्षीण असतात. परंतु लाकडातून प्रगट झालेली आग प्रचंड नुकसान करू शकत असली तरी त्यासोबत नष्टही होते. याच न्यायाने मार्क्सवादातील उणिवा व चुकांकडे सध्या लोकांचे लक्ष जोराने खेचले जात आहे. मार्क्सच्या विचाराला भारतात पूर्ण उत्तर मिळणार आहे, कारण आमच्याकडे एक अक्षीण विचार चालत आलेला आहे.

मार्क्सवाद हा साम्राज्यवाद व भांडवलशाहीचे उत्तर असल्यामुळे त्यांच्यासोबत तोही क्षीण होत गेला. मार्क्सवाद त्यांचेच अपत्य आहे, म्हणून त्यांच्यावरच तो अवलंबून आहे. त्याचा बराच प्रसार झाला, कारण साम्राज्यवाद व भांडवलशाही यांचा बराच विस्तार झाला होता. त्यामुळे मार्क्सच्या ग्रंथाचाही खूप प्रचार झाला. मार्क्सवाद-प्रेमी लोकांपैकी शंभरातून एखादाच तो वाचत असेल, वाचणाऱ्या शंभरातून एखादाच शेवटपर्यंत टिकत असेल, आणि अशा शंभर लोकांपैकी एखादाच तो समजू शकत असेल. पण एवढ्या कठीण ग्रंथाचाही प्रसार झाला कारण त्यावेळी त्याची गरज होती.

परंतु मार्क्सची भविष्यवाणी खोटी ठरली आहे हे आज आपण पाहतोच. तो वैज्ञानिक होता असे मानले जाते. पण तो खरा वैज्ञानिक असता तर युक्लिडप्रमाणे त्याची वाणी खरी ठरली असती. मार्क्सची भविष्यवाणी खोटी ठरली. याचे कारण असे की कोणीही माणूस सर्वज्ञ नसतो. ज्या परिस्थितीत तो मोठा होतो, तिचा परिणाम त्याच्यावर झाल्याशिवाय राहत नाही. मार्क्स एक ऋषी होता आणि कल्पनाशक्तीच्या जोरावर अनेक गोष्टी समजून घेण्याचा त्याने प्रयत्न केला. भारताबद्दलही त्याने काही लिहून टाकले. परिस्थिती पाहून विचार बनतो व त्याच्या आधारावर योजना बनविली जाते. म्हणून त्यात दोष व उणिवा राहून जातात.

समाजवादही प्रतिक्रियात्मक आहे. म्हणून तोही सतत बदलत आहे. आजही समाजवादाचे नाना प्रकार आहेत. भारतातही एक प्रकारच्या समाजवादाचे स्वप्न पाहिले जात आहे. भांडवलदारांना या समाजवादाची भीती वाटत नाही, कारण त्यांचा प्रायव्हेट सेक्टर कायम राहील असे आश्वासन त्यांना मिळाले आहे. समाजवाद खरोखर कसा असतो हे देवच जाणे! हिटलरदेखील स्वतःला समाजवादी म्हणवून घेत असे.

आजकाल समाजवाद कल्याणकारी राज्याचे रूप घेत आहे. अर्थात्, समाजाची प्रगती करणे हा समाजवादाचा अर्थ होत आहे. अशा प्रकारे समाजवादाचे रूप जागोजागी बदलत आहे.

साम्यवादाचीही अशीच अवस्था आहे. मार्क्सच्या पुस्तकात जो साम्यवाद आहे तो रशियात नाही. लेनिन व स्टॅलिनच्या धोरणांमध्येही फरक होता. आता तर तेथे विश्वशांति व शांतीमय सह-अस्तित्वाबद्दल बोलले जात आहे. या धोरणाला बाधक ठरणाऱ्या लोकांना पदावरून दूर सारण्यात आले आहे. चीनमध्ये वेगळ्याच प्रकारचा साम्यवाद आहे. भारतातील साम्यवाद संविधानाच्या चौकटीत काम करणारा आहे. अशा प्रकारे साम्यवाद बदलत आहे. एखाद वेळेस तो भारतीय संस्कृतीतही सामील होऊ शकेल.

### वितर्कवाद आणि वैतर्किक वस्तुवाद

आजकाल साम्यवाद्यांनीही आपल्या विचाराला तत्त्वज्ञानाचा आधार दिला आहे. डायलेक्टिक्सचा (वितर्कवाद) सिद्धांत ते यासाठी मांडतात. विचारांना तत्त्वज्ञानाचा आधार देणे मला पसंत आहे. परंतु केवळ वरवरच्या विचाराने संतोष मानू नये.

डायलेक्टिकल मटेरिआलिझम्ला मी 'वैतार्किक वस्तुवाद' म्हणतो. 'भौतिकवाद' ही संज्ञा त्यासाठी समर्पक नाही. ज्यांचे जीवन खाणे-पिणे-मौजमजा करणे एवढेच असते ते भौतिकवादी असतात. वितर्कवाद ही एक विचार-पद्धती आहे. त्यातून क्रांती होऊ शकते. आणि उपक्रांतीही होऊ शकते. आंबट लिंबाच्या झाडाला गोड प्रकारच्या झाडाचे कलम केले तर आंबटगोड लिंबे तयार होतात. थीसिस, ॲन्टिथीसिस आणि सिन्थेसिस ही अशीच प्रक्रिया आहे. या सिद्धांतामुळे क्रांतीसाठी उत्साह कसा वाटू शकतो, श्रीमंतांना खतम केले पाहिजे ही गोष्ट त्यातून कशी निष्पन्न होते हे माझ्या लक्षात येत नाही.

प्रत्येक गोष्टीत गुण व दोष दोन्ही असतात. दोष असलेल्या वस्तूवर गुण असलेल्या वस्तूंचे आक्रमण होते तेव्हा एक तिसरीच गोष्ट उत्पन्न होते. जिच्यात दोन्ही वस्तूंचे दोष नसून केवळ गुणच असतात. प्रत्येक व्यक्तीला योग्यतेनुसार वेतन मिळाले पाहिजे हा विचार आज समाजात मान्य आहे. यात हा गुण आहे की यामुळे काम करण्यास उत्साह वाटतो. परंतु यात एक अन्यायही आहे. तो म्हणजे, यामुळे कमजोर व्यक्ती खतम होते. म्हणून या विचाराविरुद्ध समतेचा विचार उभा राहतो. मात्र त्यामुळे आळसाला उत्तेजन मिळते. सगळी संपत्ती आपल्यापाशीच ठेवण्याची जी क्रिया समाजात चालली, तिची प्रतिक्रिया म्हणून आत्यंतिक समतेचा विचार पुढे आला. परंतु त्यातही दोष आहेच. याचा परिणाम म्हणून एक तिसराच विचार निघेल, ज्यात दोन्ही विचारातील ग्राह्य अंश असतील आणि दोन्हीतील त्याज्य अंश नसतील. या नव्या विचारातही काही दोष राहतोच आणि मग त्याविरुद्धही दुसरा विचार उभा राहतो. अशी ही क्रिया सुरू राहते.

वितर्कवाद अशी विचारपद्धती आहे. त्यातून विशिष्ट आचार-प्रणाली निष्पन्न होते असे नाही. मात्र मार्क्सने असा संबंध जोडला आहे. वितर्कवादाच्या विचारपद्धतीतून साम्यवादाचा विचार निघतो आणि वितर्कवादातून साम्यवादच निष्पन्न होऊ शकतो असे त्याने मानले. या धारणेशी मी सहमत नाही.

### अ-सर्ववादी विचार

सर्वोदय वगळता बाकी सर्व विचारप्रणाली 'अ-सर्ववादी' आहेत. जातीयवादीही अ-सर्ववादी असतात. कोणी केवळ ब्राह्मणांची सेवा करतात, तर कोणी फक्त मुसलमानांची सेवा करतात. अशा लहान-लहान समुदायांच्या सेवेपुरते स्वतःला मर्यादित करून घेणाऱ्यांना संप्रदायवादी म्हटले जाते.

साम्यवादीदेखील अ-सर्वदायी आहेत. समाजात दोन वर्ग आहेत असे ते मानतात. एक वर्ग सासऱ्यांचा आणि दुसरा वर्ग जावयांचा! सासरे व जावई यांच्यात विरोध आहे आणि एकाच वर्गाची सेवा करायला हवी असे ते म्हणतात. त्यांच्यात सेवाभाव असतो, प्रेम असते हे खरे, पण ते समाजाचे विभाजन करतात आणि एका वर्गाचे पक्षपाती म्हणून काम करतात.

बिरबल आणि बादशहाची कथा प्रसिद्ध आहे. बादशाहाने सगळ्या जावयांना सुळी देण्याचा हुकूम केला. बिरबलाने लोखंडाचे बरेच सूळ बनवले आणि एक चांदीचा व एक सोन्याचा सूळ बनवला. बादशाहाने हे पाहिले तेव्हा म्हणाला - 'हे चांदी-सोन्याचे सूळ कशासाठी?' बिरबल उत्तरला- 'महाराज, चांदीचा सूळ माझ्यासाठी आणि सोन्याचा आपणासाठी. कारण आपणही कोणाचे तरी जावई आहोतच ना!'

मालकांचा द्वेष जे करतात त्यांनाही मालकी हवी असते. तिकडे मोठी मालकी सोडायची तयारी नाही, आणि इकडे छोटी सोडायचीही तयारी नाही. मोठ्या मालकाबद्दल

द्वेष मात्र आहे. परंतु केवळ मत्सरातून शक्ती निर्माण होत नाही. सर्वांनी मिळून सर्वांची - श्रीमंत आणि गरिबांची, मालक आणि मजुरांची सेवा करायला हवी.

**मत्सर निरर्थक**

श्रीमंतांची सेवा कशाने होईल? त्यांच्या संपत्तीतून त्यांची मुक्तता करण्यातच त्यांची सेवा आहे. लठ्ठ माणसाचे वजन कमी करायला हवे. त्यातच त्याची सेवा आहे. श्रीमंतांचा द्वेष केला पाहिजे असे साम्यवादी म्हणतात. आमचे म्हणणे असे आहे की त्यांची तूपरोटी बंद करून त्यांना केवळ भाजी खायला देणे म्हणजे त्यांच्यावर प्रेम करणेच आहे. प्रेमाला तुम्ही द्वेष का बरे म्हणता?

साम्यवाद श्रीमंतांचा मत्सर शिकवतो. परंतु श्रीमंतांचा मत्सर करणे हा गरिबांचा धर्म होऊ शकत नाही. श्रीमंतांजवळ असे काय आहे की त्यांचा मत्सर करावा? त्यांच्याजवळ नाशिकला छापलेले काही कागदाचे कपटे असतात आणि काही पांढरे-पिवळे दगड असतात, ज्यांना चांदी-सोने म्हणतात. ते घेऊन श्रीमंत लोक श्रमिकांपाशी जातात आणि बंदूक दाखवून वस्तू लुबाडून घ्यावी त्याप्रमाणे त्या दगडांच्या बळावर वस्तू मागतात. आपण जर समजावले की तुम्हाला बंदुकांना भिण्याची गरज नाही आणि त्या पांढऱ्या-पिवळ्या दगडांनाही भिण्याची गरज नाही, तर मग श्रीमंतांना काय मिळणार? कारण लक्ष्मी तर श्रम करणाऱ्यांपाशीच असते. 'यत्र श्रमः तत्र लक्ष्मीः' धनवान असणे वेगळे आणि लक्ष्मीवान असणे वेगळे.

लोक पैशाच्या लोभाने आपल्या वस्तू विकतात, कारण आपल्या जीवनाला लागणाऱ्या नित्य गरजेच्या वस्तू ते निर्माण करीत नाहीत. ते स्वावलंबी झाले तर खरेखुरे श्रीमंत तेच बनतील. केवळ श्रीमंतांचा मत्सर करण्याने काही साधणार नाही. पण बंदुकीचे भय व पैशाचा लोभ सोडावा लागेल. दुधातुपाच्या तुलनेत पैसा कःपदार्थ आहे. हे श्रमिकांना समजेल तर त्याच क्षणी ते श्रीमंत बनतील आणि आज श्रीमंत समजले जाणारे गरीब बनतील. यापुढे कष्ट केल्याशिवाय गत्यंतर नाही हे त्यांना कळून चुकेल. म्हणून श्रीमंतांचा मत्सर करायला शिकविण्यात काहीच लाभ नाही. साम्यवादी जे करू पाहतात तेच मी करीत आहे; फरक एवढाच की ते जे द्वेषाने करू पाहतात ते मी प्रेमाने करतो.

**संपत्तिहीन कोणीच नाही**

खरे तर जगात संपत्तिहीन असा कोणीच नाही. प्रत्येकापाशी जमीन, बुद्धी, संपत्ती, श्रम असे काही ना काहीतरी असतेच. आज जमीनवाला जमिनीचा उपयोग आपल्या घरासाठी करतो, गावासाठी करीत नाही. श्रमिकही आपल्या श्रमशक्तीचा उपयोग केवळ आपल्या घराकरता करतो. बुद्धिमानही असेच करतो. ग्रामदानात आपल्या सगळ्या शक्ती गावाला समर्पित करायच्या असतात. आपल्यापाशी जे काही आहे ते गावाला द्यावयाचे अशी वृत्ती प्रत्येकात जागृत व्हायला हवी. केवळ श्रीमंतांनीच द्यावे, गरिबांनी नव्हे, हा विचार चुकीचा आहे. धर्म किंवा नैतिक कर्तव्य प्रत्येकालाच लागू होते. आपण ज्यांना गरीब म्हणतो ते श्रमाच्या दृष्टीने श्रीमंत असतात, पण ते कंजूषपणे कमीत कमी काम करण्याचा प्रयत्न करतात आणि मालक त्यांना कमीतकमी मोबदला देण्याचा प्रयत्न करतो. अशा रीतीने मालक आणि मजूर एकमेकांना फसवतात आणि दोघे मिळून समाजाला फसवतात. गाडीला दोन बैल जुंपलेले आहेत. एक बैल दुसऱ्यावर भार टाकतो आणि दुसरा पहिल्यावर. अशा पद्धतीने गाडी चालू शकत नाही. म्हणून दोघांनीही आपल्याजवळ जे काही आहे ते मोकळ्या मनाने गावाला समर्पण केले पाहिजे.

**वर्गसंघर्षाची कल्पना**

या प्रक्रियेमुळे वर्गांचे अस्तित्वच राहत नाही. सर्व लोक जेव्हा आपल्या शक्ती गावाला समर्पित करतात, तेव्हा वर्ग राहत नाहीत, सामूहिक जीवनच उरते. अशी ही अत्यंत कुशल योजना आहे. वर्गसंघर्षाची कल्पना करण्यापेक्षा वर्गांचा मुळापासून उच्छेद करणेच श्रेयस्कर आहे. वर्गसंघर्षावर विश्वास असणारे लोक वर्ग संघटित करतात. सर्व मालक आपले शत्रू आहेत असे म्हटल्याने मालक एक होतात. साम्यवादी अशा रीतीने वर्ग संघटित करून मग त्याला नष्ट करण्याचा प्रयत्न करतात. परंतु आम्ही अशा कुशलतेने काम करतो की वर्गांच्या कल्पनेलाच मुळातून छेद दिला जातो. ही साम्ययोगाची कुशलता आहे.

युरोपात एक विकसित औद्योगिक समाज होता.





त्याची एक विशिष्ट रचना बनली होती. ती नष्ट करण्यासाठी वर्गसंघर्षाची कल्पना मांडण्यात आली. तीच कल्पना येथे लागू होऊ शकणार नाही.

समाजात शोषक वर्ग नावाचा एक वेगळा वर्ग असतो असे मी मानीत नाही. जगात शोषण चाललेले असते आणि आपल्यापैकी प्रत्येकजण कोणाचा तरी शोषक आणि कोणाचा तरी शोषित असतो. शोषण नष्ट करण्यासाठी आजच्या समाजरचनेत आमूलाग्र बदल करावा लागेल.

युरोपमधील परिस्थितीच्या आधारावर साम्यवाद्यांनी जो सिद्धांत बनविला, तो भारतात चालू शकणार नाही. भारतात जातिभेद आहे. तो युरोपात नाही. येथे वर्गसंघर्षाचा पुरस्कार केला तर जातिभेद बळावेल.

### हित-विरोध भ्रामक

'व्यक्तीविरुद्ध समाज' किंवा 'भांडवलविरुद्ध श्रम' असा विरोध मानण्याची काही गरजच नाही. व्यक्ती समाजाचाच अंश आहे. व्यक्ती समाजाच्या हिताचा विचार करणार नाही तर तिचेही हित साधणार नाही. आणि व्यक्तीचा विकास झाला नाही तर समाजाचाही विकास होणार नाही. त्याप्रमाणे व्यक्ती आणि समाज एकमेकांवर अवलंबून असतात. समाज व व्यक्ती यांचा संबंध ताण्याबाण्यासारखा आहे. त्यांचे हित वेगवेगळे नाही.

कोणा एकाचे हित दुसऱ्या कोणाच्या हिताविरुद्ध असूच शकत नाही. कोणाही समाज, वर्ग किंवा देश ह्याच्या हिताविरुद्ध दुसरा समाज, वर्ग किंवा देश ह्यांचे हित असू शकत नाही. त्यांच्या हितात विरोध आहे ही कल्पनाही चुकीची आहे. एकाच्या हितात दुसऱ्याचेही हित आहे. दोघांच्या हितात केव्हाही विरोध नसतो. मात्र अहिताला आम्ही हित मानून घेतले तर विरोध असू शकतो. हितांत विरोध मानला तर हिताबद्दलची मूळ कल्पनाच मिथ्या ठरेल.

भांडवल व श्रम यांच्यात विरोध आहे असेही मानले जाते. परंतु भांडवल म्हणजे तरी काय? जो श्रम पूर्वी झाला, त्याचे भांडवल बनले आणि जो श्रम आज केला जात आहे तो श्रम आहे. कालचा श्रम व आजचा श्रम यांच्यात विरोध असू शकत नाही. पण भूतकाळातील श्रम पैशाच्या रूपाने मूठभर लोकांच्या हाती आला. या प्रकारे युरोपात केंद्रीकरण होत गेले. म्हणून भांडवल झगडून हिरावून घेऊ व श्रमशक्तीला वर आणू, असा वाद निर्माण झाला. युरोपातील विशिष्ट परिस्थितीमुळे साम्यवादाचा जन्म झाला.

चुकीच्या शिक्षणामुळे वाईट सवयी लागतात, तसेच चुकीच्या समाजशास्त्रामुळे हितविरोध निर्माण होतात. माझ्या घराला आग लागण्यात माझे जसे नुकसान आहे तसे माझ्या शेजाऱ्याचेही आहे. ही अगदी साधी गोष्ट आहे. हितांमध्ये परस्परविरोध मानून समाजाची रचना केली तर ती कृत्रिम होते.

### साम्यवाद्यांची ग्रंथनिष्ठा

साम्यवाद्यांच्या बाबतीत एक मोठीच अडचण आहे. वैदिकांना जशी वेदाबद्दल आसक्ती वाटते, वेदांमधले एक अक्षरही इकडे-तिकडे होऊ नये असा त्यांचा प्रयत्न असतो, त्याचप्रमाणे साम्यवाद्यांमध्येही त्यांच्या ग्रंथाबद्दल आसक्ती आहे. म्हणून ते ग्रंथिक झाले आहेत. त्यांच्या बुद्धीत ग्रंथी बनली आहे.

मार्क्सचा 'कॅपिटल' ग्रंथ मी वाचला आहे. तो ज्याला समजेल तो युनिव्हर्सिटीचा चॅन्सलरच होईल! इतका तो कठीण ग्रंथ आहे. या लोकांना तो ग्रंथ समजत नाही. आणि क्रांती त्या पद्धतीने होईल असे ते जपत मात्र राहतात. वाल्मिकीने रामायण प्रथम लिहिले आणि त्यांबरहुकूम रामाचे जीवन चालले अशी आपल्याकडे समजूत आहे. तसे हे लोकही मार्क्सच्या शब्दांबरहुकूम चालतात. परंतु जी एका निश्चित पद्धतीनेच होईल, तिला क्रांती म्हणता येईल काय? कोणाच्या भविष्यवाणीनुसार होईल ती क्रांतीच नव्हे. क्रांती देशकाल परिस्थितीवर अवलंबून असते. आपण पुस्तकनिष्ठ किंवा शब्दनिष्ठ बनू तर क्रांती होणार नाही.

साम्यवादी कार्ल मार्क्सच्या वाक्याला वेदवाक्याप्रमाणे प्रमाण मानतात. पण मार्क्स 'मार्क्सवादी' नव्हता. मार्क्स आज असता तर नव्या परिस्थितीचा विचार करून त्याने नवीन गोष्टी सुचवल्या असत्या. आजची अणुशक्ती, शस्त्रास्त्रे हे त्याने पाहिले असते तर त्याने ज्या पद्धतीने लिहिले आहे त्या पद्धतीने लिहिले नसते. शंभर वर्षांपूर्वी, त्याच्या काळी जी परिस्थिती होती तिचे सूक्ष्म निरीक्षण करून त्याने जगाला एकत्र करण्याचा विचार मांडला. ही मोठी महत्त्वाची गोष्ट

आहे. मात्र आज त्याने आपले विचार निश्चितच बदलले असते.

साम्यवादी ग्रंथ प्रमाण मानतात; परिस्थिती व बुद्धी सोडून देतात. वस्तुतः ग्रंथ, परिस्थिती व बुद्धी या तिन्हींचा समन्वय झाला पाहिजे.

### भारतीय विचारांचे ज्ञान नाही

भारतात दहा हजार वर्षांपासून जे विचारप्रवाह चालत आले आहेत, त्यांच्याबद्दल साम्यवाद्यांना माहिती नाही. त्या विचारात काही दोष असले तरी ते समजण्यासाठी त्या विचाराचे ज्ञान असले पाहिजे. तेव्हा साम्यवाद्यांमध्ये मला दोन मुख्य दोष दिसतात. एक तर ते पुस्तकपूजक आहेत आणि दुसरे म्हणजे येथील विचारप्रवाहांचे त्यांना काहीही ज्ञान नाही.

वेदांत समजून घेतल्याखेरीज येथे कोणत्याही प्रकारची क्रांती होऊ शकणार नाही. तुम्ही जर आत्म्याचे तुकडे कराल, वर्ग निर्माण कराल, कटुता व द्वेष पसरवाल, तर त्याने येथे क्रांती होणार नाही.

### सत्ययुगवादी व सत्ययुगकारी

काही लोक म्हणतात की पूर्वी सत्ययुग होते. तेव्हा शासनाची गरज नव्हती, आणि ते नव्हतेही. काही लोक म्हणतात की सत्ययुग पूर्वी कधी नव्हते, पण ते येईल, त्याची आवश्यकता आहे. भूतकाळात सत्ययुग होते असे जे मानतात ते पुराणमतवादी आहेत. भविष्यकाळात सत्ययुग येईल असे ज्यांना वाटते ते साम्यवादी आहेत. पुराणमतवादी व साम्यवादी, दोघेही सत्ययुगवादी आहेत. पुराणमतवादी लोक कल्पना करतात की सत्ययुग पूर्वी होते आणि साम्यवादी कल्पना करतात की सत्ययुग येईल. आमचे काय म्हणणे आहे?

आमचे म्हणणे आहे की भूतकाळ आणि भविष्यकाळ हे दोन्ही आपल्या हातात नाहीत. वर्तमानकाळातच सत्ययुग साकार करण्याचा प्रयत्न करीत आहोत. पुराणमतवादी भूत-सत्ययुगवादी आहेत, साम्यवादी भविष्य-सत्ययुगवादी आहेत. आणि सर्वोदयवाले वर्तमान-सत्ययुगकारी आहेत. 'वादी' हा शब्द मी वापरत नाही.

सत्ययुग काय आहे याच्या व्याख्येबाबत मतभेद नाहीत. आदर्श समाज कसा असावा याबाबत मतभेद नाहीत. बारीकसारीक मतभेद सोडून द्या. पुराणमतवाद्यांचे स्वर्गाचे चित्र आणि साम्यवाद्यांचे भावी समाजाचे चित्र यांत काही फरक नाही. पुराणमतवाद्यांना आम्ही विचारतो - 'तुमचा स्वर्ग तर आकर्षक आहे. तो कसा मिळेल?' तर ते म्हणतात - 'त्यासाठी मरावे लागेल.' मेल्यानंतर तो स्वर्ग मिळणार! म्हणून, तो स्वर्ग कितीही आकर्षक वाटला तरी आपण त्यात पोहचू शकत नाही. साम्यवाद्यांना आम्ही विचारतो, - 'तुमचा स्वर्ग चांगला आहे. त्याच्यापर्यंत पोचायला कोणती शिडी आहे?' ते म्हणतात, 'त्यासाठी आज परिपूर्ण हिंसेची तयारी ठेवावी लागेल.' एकजण म्हणतो, मेल्यानंतर स्वर्ग मिळेल, दुसरा म्हणतो - मारल्यानंतर स्वर्ग मिळेल. या दोन्ही गोष्टी आमच्यासाठी कठीण आहेत.

### रशियातील प्रयोग

रशियात साम्यवादाच्या अथवा समाजवादाच्या नावाने प्रयोग सुरू झाला. आधी ती कल्पना विश्वव्यापी कल्पिलेली होती. पण ती मोडकळून मागाहून तिला राष्ट्रबद्ध स्वरूप प्राप्त झाले. लष्करी शक्तीवरच्या विश्वासात ते इतरांसारखेच. तत्त्वविहीन कार्यसाधु डावपेच त्यांनाही वर्ज्य नाहीत.

रशियात झालेली क्रांती अल्पावधीतच विटली. तिचे मूळचे आकर्षक स्वरूप प्रायः उरलेले नाही. असे होण्याचे कारण, केंद्रीकरण, यंत्रपूजा, शस्त्रनिष्ठा आणि पिळणूक ह्या भांडवलशाहीतील चार गोष्टींपैकी पहिल्या तीन कायम राखून चवथी टाळण्याच्या प्रयत्न समाजवादाने योजिला, हे होय. म्हणजे हे एक मोहचक्र आहे. पहिल्या तिहींबरोबर चवथे टाळले तरी येतेच, हे लक्षात ठेवणे कठीण नसावे. पण केंद्रीकरणाने दिलेली क्षमता, यंत्रपूजेने लाभलेला आराम आणि शस्त्रनिष्ठेने देऊ केलेला बचाव ह्यांचा मोह इतका जबरदस्त आहे की पिळणूक थांबविण्यासाठी ह्या तिहींपैकी एकाचाही त्याग करण्याची कल्पना मोहचक्रात सापडलेल्या आरामप्रिय मनाला जमत नाही.

रशियातील वाद सद्हेतुमूलक असला तरी भ्रांत असल्यामुळे सर्वांचे तर नाहीच, पण बहूंचेही हितरक्षण करण्यास तो असमर्थ झालेला आहे. रशियातील ध्येयवादात बहुजन-समाजाच्या हिताची जी दृष्टी आहे, ती वस्तुतः सर्वोदयाच्या विरुद्ध नाही. बहुजनसमाजाच्या हितातच इतर सर्वांची हिते





सुरक्षित असू शकतात, ही हितैक्य-दृष्टी गृहीत धरून झाली ह्याहून अधिक स्थिर क्रांती होऊ शकली असती. पण हितैक्य-दृष्टीपेक्षा हित-विरोधाची दृष्टी अधिक जोरदार आणि शीघ्र परिणामकारी असे मानून अवलंबिली गेली, त्यामुळे कार्य शीघ्र झालेले दिसले, परंतु तेच मग सावरता सावरता राष्ट्राभिमानाच्या पायावर उभे करावे लागले.

जनतेला समत्त्वयुक्त आणि विवेकी दृष्टी शिकविण्याऐवजी जोरदार भासणारी आवेशी दृष्टी शिकविण्याचा मोह क्षिप्रकारी नेत्यांनाही आवरत नाही, ह्याचे रशियातील बहुजनहितवाद हे एक उदाहरण आहे.

### संपत्तीची प्रयोजने

संपत्तिमानांची संपत्ती त्यांच्याकडून हिरावून घेण्याची भाषा अगदी विनाकारण बोलली जाते. वस्तुतः संपत्तिमानांची संपत्ती त्यांना केवळ संचयासाठी नको असते. त्यांना प्रतिष्ठा, सौख्य, भावी जीवनाची शाश्वती, संतानाची काळजी आणि दानशूरतेचा लौकिक, ह्यापैकीच काहीतरी, किंवा सर्व, हवे असते. ही सर्व मिळण्याची सोय राहून वर पुन्हा निश्चिंत राहण्याची युक्ती साधल्यास, ती नको म्हणणारा कोणीच सापडणार नाही. आजसुद्धा संपत्तिमानाची संपत्ती अनेक सहकाऱ्यांच्या, मुनिमांच्या आणि अशाच इतर मंडळींच्यामध्ये विभागलेली असते. मुनिमांच्या ताब्यात संपत्ती राखून सदर मुनीम आपल्याला फसवितात, तरी फार फसवीत नाहीत अशा चिंतेत आणि समाधानात त्यांना राहावे लागते. त्याच्याऐवजी सदर पैसा समाजाच्या कामात वापरला जात आहे, आपली चिंता मिटून लोकोपयोगी चिंतन आपल्याला लाभत आहे, आणि त्याच्या बरोबरच आणि बदल्यात प्रतिष्ठादि सर्व वस्तू पूर्वीपेक्षा कमी नाही, पण पुष्कळ अधिक आणि यथार्थ लाभत आहेत, असे दर्शन राज्यपद्धतीने समर्थांना करून दिले पाहिजे.

### मालकीचे विसर्जन

ईशावास्य उपनिषदात लिहिले आहे -

ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्।
तेन त्यक्तेन भुंजीथाः मा गृधः कस्य स्विद् धनम्।।

याचा अर्थ हा की हे सर्व जगत् ईश्वरमय आहे, व त्याला समर्पण करून मगच सर्व गोष्टींचा उपभोग घेतला पाहिजे. याहून अधिक चांगला संदेश कोणत्याही शास्त्रात दिला गेला नाही. कम्युनिझम्‌मध्येही ही भावना आहे, पण ती थोड्या प्रमाणात आहे. कारण तो ईश्वराचे अस्तित्व मानतच नाही. म्हणून त्याच्यात दानाची कल्पना नाही. तर हिसकावून घेण्याचे तत्त्व आहे. तो ईश्वराला समर्पण करीत नाही, हेच कम्युनिझमचे न्यून आहे. बाकी ईशावास्यात जे तत्त्व परिशुद्ध व निर्दोष स्वरूपात व्यक्त झाले आहे, तेच कम्युनिझममध्ये आहे. आजवर या तत्त्वाचे चिंतन झाले. पण त्यावर समाजाची रचना करण्याचा विचार झाला नाही. आजच्या समाजात वैयक्तिक मालकी-हक्काला मान्यता मिळालेली आहे. आपले सरकार, राज्य-घटना व कायदे हे सर्व याच आधारावर बनविले गेले आहेत. पण हा विचार मुळापासूनच बदलण्याची आमची इच्छा आहे. 'अपहर्त्याचे अपहरण' या कम्युनिस्टांच्या तत्त्वाऐवजी आम्ही अस्तेय व अपरिग्रहाचा विचार मांडतो.

### स्वतःपासून आरंभ

साम्यवादी म्हणतात - 'मालकीचे विसर्जन ही गोष्ट ऐकायला चांगली वाटते, परंतु व्यक्तिगत त्यागाने हे काम होणार नाही. म्हणून व्यक्तिगत प्रयत्नावर आमचा विश्वास नाही. सगळ्या समाजातून मालकी नष्ट होईल तेव्हा आम्हीही मालकी सोडू. कायद्याने खाजगी संपत्ती नष्ट करण्याचा आम्ही प्रयत्न करू. आणि ते साध्य होईपर्यंत आमची संपत्ती कायम राखू.'

साम्यवाद्यांबद्दल आमची अशी तक्रार आहे की ते तत्त्वज्ञानी आहेत, परंतु त्यांना मार्गाचे ज्ञान नाही. त्यांच्याजवळ स्वर्गाची कल्पना आहे, तेथपर्यंत पोचायला शिडीच नाही. त्यांचा शिडीवर विश्वासच नाही. शिडी चढणे ही दीर्घ प्रक्रिया आहे. त्यांना तर पक्ष्यासारखे उड्डाण करायचे आहे. सर्वोदय व साम्यवादाच्या विचारात हा एक मोठा फरक आहे. सर्वोदय म्हणतो की एखादी गोष्ट जर चांगली आहे, सत्य आहे, तर ती तत्काळ अंमलात आणली पाहिजे आणि मग शेजाऱ्यांला आणि समाजाला समजावून सांगितली पाहिजे. त्यानंतर सरकारवरही दबाव टाकता येऊ शकतो. आरंभ स्वतःपासून झाला पाहिजे. साम्यवाद्यांना आरंभ सरकार व कायद्यापासून करायचा असतो. आणि शेवट स्वतःत करायचा असतो. सर्वोदय-विचार मानतो की आरंभ स्वतःपासून व्हावा आणि शेवट






सरकारच्या कायद्यात व्हावा.

गांधी-विचारात हीच तर मोठी अडचण आहे! त्यात स्वतःपासून सुरवात करावी लागते. साम्यवाद्यांपुढे ही अडचण नाही. व्यक्तिगत त्याग ते करतात खरे, परंतु तशी जबाबदारी ते मानीत नाहीत. व्यक्तिगत दानावर त्यांचा विश्वास नाही. त्यांच्या दृष्टीने जे काही व्हायचे ते स्टेट लेव्हल (राज्यसत्तेचा स्तर) वर होईल. जमिनीचे वाटप सरकारी पातळीवर होईल. व्यक्तिगत पातळीवर करण्याचे ते काम नव्हे. त्यागाशिवाय तर ते लोकांपाशी जाऊ शकत नाहीत. पण ते म्हणतात - 'व्यक्तिगत त्यागामुळे फार झाले तर कोणी संत, सत्पुरुष बनेल, पण त्यामुळे समस्या सुटेल असे दिसत नाही. म्हणून व्यक्तिगत त्यागाला आम्ही महत्त्व देत नाही.' ते स्वतः त्याग करतात, लोकांपर्यंत पोचतात, लोकांप्रमाणेच गरिबीने जगतात. मात्र त्यांच्या तत्त्वज्ञानात याला अवकाश नाही.

**क्रांतीची प्रक्रिया**

हृदय परिवर्तनावर साम्यवाद्यांचा विश्वास नाही. त्याची ते चेष्टा करतात. मी त्यांना सांगतो की तुम्ही स्वतःच तर हृदयपरिवर्तनाचे उदाहरण आहात; मार्क्सचा ग्रंथ वाचून तुमचे हृदय-परिवर्तन झाले. माणसाचे हृदय अशुद्ध नाही याबाबत साम्यवाद्यांनाही शंका नाही. कारण राज्यसत्ता नाहीशी होण्याची वेळ येईल असे ते मानतात. असे जो मानतो, त्याचा मानव हृदयावर विश्वास आहे हे निःसंशय. अन्यथा राज्यसत्तेच्या लयावर विश्वास असू शकत नाही.

साम्यवाद्यांचा जोर समाज-परिवर्तनावर असतो. पूर्वीच्या साधुसंतांनी व्यक्तींच्या हृदय-परिवर्तनाचा प्रयत्न केला, तो फसला असे साम्यवाद्यांचे म्हणणे असते. ते म्हणतात की आम्ही समाजपरिवर्तनाचा प्रयत्न करतो, त्याच्या प्रवाहात व्यक्ती येऊन जातात. त्यांनी मला विचारले - 'तुमचे जे कार्य चालले आहे ते व्यक्ति-परिवर्तनाचेच आहे. पूर्वीच्या संतांना यश मिळाले नाही. मग तुम्हाला कसे मिळणार?'

मी त्यांना एक उत्तर असे दिले की गौतमापासून गांधींपर्यंत कोणी अयशस्वी झाले नाहीत. ते नसते तर आपण जनावर राहिलो असतो. माणूस बनलो आहोत. तेव्हा त्यांच्या कार्याला यश आले नाही असे म्हणता यावयाचे नाही.

दुसरे उत्तर असे की त्या काळी एकच प्रहार होत होता की स्वार्थ सोडा, अहंता-ममता सोडा, समर्पण करा, म्हणजे तुम्हाला पारमार्थिक उन्नतीचा लाभ होईल. लोक म्हणत की पारमार्थिक उन्नती तर पुढची गोष्ट आहे, आमच्या ऐहिक उन्नतीचे काय? आता मी जे सांगतो त्याने पारमार्थिक उन्नतीबरोबर ऐहिक उन्नतीचाही रस्ता सापडतो.

तिसरी गोष्ट ही की पूर्वी संतांना विज्ञानाची मदत उपलब्ध नव्हती. गांधींनाही ती मदत झाली नव्हती. विज्ञान धावून आले आणि गांधीजी परलोकाला गेले. आम्हाला आज विज्ञानाची मोठी मदत मिळत आहे. तेव्हा आम्ही यशस्वी होणार.

मी साम्यवाद्यांना हे देखील सांगतो की तुम्ही समजता तशी आमची प्रक्रिया केवळ हृदयपरिवर्तनाची नाही. हृदय-परिवर्तनाची प्रक्रिया संतांची, विचार-परिवर्तनाची प्रक्रिया आचार्यांची, म्हणजे तत्त्वज्ञान्यांची - मग तो शंकर असो, ॲरिस्टॉटल असो की कार्ल मार्क्स असो. आणि समाजपरिवर्तनाची प्रक्रिया तुमची म्हणजे साम्यवाद्यांची. या तिन्ही प्रक्रिया मिळून सर्वोदयाची प्रक्रिया बनते.

हृदय परिवर्तन आणि विचार-परिवर्तन व्यक्तींना लागू होते. आणि अशा व्यक्ती एकत्र आल्यानंतर समाजपरिवर्तन उपस्थित केले म्हणजे कार्य पूर्ण होते. ही तिन्ही कार्ये आम्हाला एकत्र करावयाची आहेत. तिन्हींची गरज आहे.

'आम्ही वर्गसंघर्ष मानणारे आहोत, तेव्हा हृदय-परिवर्तनाने हे कार्य होऊ शकेल असे आम्हाला वाटत नाही,' असे जे म्हणतात त्यांनी आपले निश्चित मत बनविले आहे. हे निश्चित मत त्यांनी कोणत्या तरी विचारावर किंवा अनुभवावर आधारलेले असले पाहिजे. पण सृष्टीत नित्य नवे अनुभव येत असतात. क्रांतीच्या नित्य नव्या प्रक्रिया चालू असतात.

माझे म्हणणे असे आहे की वर्गसंघर्षानेच क्रांती होते असे विचारांती ज्याला मान्य झाले आहे, त्याने अनुभवाला थोडा अधिक अवसर दिला तर हृदय-परिवर्तनाने किंवा विचार-परिवर्तनानेही क्रांती होऊ शकते हाही अनुभव त्याला येऊ शकेल. मोहग्रस्तांचे हृदयपरिवर्तन करावे लागते व सज्जनांचे विचार-परिवर्तन करावे लागते. दोन्ही मिळून क्रांतीची प्रक्रिया पूर्ण होते. आमचा कार्यक्रम असाच दुहेरी आहे. एका बाजूने आम्ही विचार समजावून देत राहतो व दुसऱ्या बाजूने आमचे तप चालू राहते. समजावून देण्याने विचार-परिवर्तन होते






आणि तपाने हृदय-परिवर्तन घडून येते. या दोहोंच्या बरोबर त्यांचाच परिणाम म्हणून आणखीही एक गोष्ट येते. ती म्हणजे परिस्थिती-परिवर्तन. अशा प्रकारे क्रांतीचा एक त्रिकोण बनतो. परिस्थिती-परिवर्तनासाठी काय केले पाहिजे असा प्रश्न कुणी विचारील. कायद्याने हे परिवर्तन होऊ शकेल असे काहींचे मत आहे. पण कायदा बनविण्यासाठी काय करायला हवे? सत्ता हाती कशी घेणार? लोकांना समजावून देऊन, त्यांचे विचार-परिवर्तन घडवून आणूनच. - लोकशाहीत हेच उत्तर शक्य आहे. म्हणजे विचार-परिवर्तनाचा मार्ग अखेर उरतो.

संघर्षात घर्षण होते व दोन्हीही बाजू क्षीण होतात. संघर्षाने क्रांती नव्हे, तर क्षय होतो. तरीही संघर्षाचाच प्रसंग आला तर मी विचार-प्रचारासाठी संघर्षही करेन, टाळणार नाही. संघर्ष हीदेखील एक युक्ती आहे. तिची गरज पडली तर तिचाही स्वीकार करू. परंतु क्रांती विचार-प्रचारानेच होत असते.

आमच्यापाशी तर विचार-परिवर्तनाबरोबर हृदय-परिवर्तनाचा, म्हणजे तपस्येचाही मार्ग आहे. तपस्येचे अनेक प्रकार संभवतात. गावोगाव पायी फिरणे हाही तपस्येचा एक प्रकार आहे. या मार्गाने आपण जनतेला समजावून सांगू शकतो की त्यांनी पापाचे वाटेकरी बनू नये. आज ठिकठिकाणी बेदखलीचे प्रकार चाललेले आहेत. बेदखलीमधील अन्याय आपण जमीनदारांना पटवून देऊ शकतो. पण त्यांनी तो पटवून घेतला नाही तर असहयोग आहेच. आमच्या क्रांतीच्या प्रक्रियेत असहयोग व सत्याग्रह तर येतातच, पण त्यात कायदाही येऊ शकतो. चौथा मार्ग आहे रक्तरंजित क्रांतीचा. पण तो तर मुळी मार्गच नव्हे. व तो क्रांतीही असू शकत नाही.

कायदा बनविण्याचा मार्ग आम्ही अडवीत नाही. मात्र कायदा असा बनवला पाहिजे की ज्यामुळे आपल्या पदरी मूर्खपणा येणार नाही. कारण धनवान लोक कायद्यातून हुशारीने सुटण्याचा प्रयत्न करतात. आता राहिला असहयोग व सत्याग्रह. हा मार्ग न्यायाचा व धर्माचा आहे. सत्याग्रहाचे सामर्थ्य प्रेमात आहे. ज्या गोष्टीमुळे द्वेष उत्पन्न होतो, त्याची सत्याग्रहात गणनाच होऊ शकत नाही. प्रेमाची शक्ती ही साधारणपणे सहयोगाच्या रूपात व विशेषप्रसंगी असहयोगाच्या स्वरूपात प्रकट होत असते. आई मुलाला सन्मार्गावर आणण्यासाठी कधी थप्पडही मारील. थप्पड मारण्याची गोष्ट निघाली आहे तेव्हा मी सांगतो की एखाद्याचे धान्य बेकायदेशीर रीतीने दुसऱ्याच्या घरात भरले असले तर ते लुटून आणणेही अहिंसेत बसते. या साऱ्या प्रेमाच्याच गोष्टी आहेत. असे प्रेम प्रकट करण्यासाठी विचार समजावून दिला पाहिजे. त्याने काम साधले नाही तर आमच्यापाशी शस्त्रे अशी आहेत की जी दुसऱ्यांना पीडा देत नाही. उलट त्यांची हृदयशुद्धी घडवून आणतात.

### केंद्रीकरण व हिंसा

भांडवलशाहीतील केंद्रीकरणाचा विचार साम्यवादाने कायम राखलेला आहे. आधी संपत्ती एके ठिकाणी एकवटावयाची आणि नंतर ती पुन्हा समान वाटावयाची, ही एक योजना साम्यवादी मांडीत असतात. परंतु त्यात तिहेरी धोका दिसतो, एकतर संपत्ती एकवटून पुन्हा समान विभागावयाची ही दुहेरी प्रक्रिया, सहजच संपत्ती उत्पत्तीद्वाराच समान विभागली जाण्याच्या एकेरी योजनेपेक्षा, आर्थिक दृष्ट्या अधिक महाग पडावयाची, हा एक धोका. सदर एकवटलेल्या संपत्तीच्या रक्षणाची स्वतंत्र योजना करावी लागावयाची, आणि इतकेही करून परकीय आक्रमणाला ती सहजच बळी पडावयाची, हा दुसरा धोका, शिवाय त्यामुळे समाजरचना इतकी व्यामिश्र आणि गुंतागुंतीची अथवा अति अन्योन्यावलंबी व्हावयाची की, सारे यंत्र अति घर्षणाने केव्हा कोलमडून पडेल, ह्याचा नेम रहावयाचा नाही, हा तिसरा धोका. सारांश, संपत्ती एकवटून विभागण्याच्या सर्व योजना राज्यव्यवस्थेला फार ताण देणाऱ्या आणि शेवटी हिंसाश्रित होऊन बसतात.

सर्वोदयाच्या विकेंद्रीकरणाच्या योजनेमुळे हे धोके टळतात.

### साध्य-साधन-विवेक

क्रांती ही संक्रांती असली पाहिजे व तिची साधनेही चांगली असली पाहिजेत. हिंसेने क्रांती होऊच शकत नाही. हिंसा ही अशी मूढ शक्ती आहे की, ती क्रांती करू शकणार नाही. ती असा काही तडकाफडकी बदल करून टाकते की त्यामुळे कितीतरी नव्या अनिष्ट गोष्टी त्यातून उत्पन्न होतात. म्हणून खरी क्रांती अहिंसेनेच होऊ शकते.

आम्ही जर शस्त्र धारण करू, तर ज्याविरुद्ध आम्ही लढू, त्याचेच उद्दिष्ट आम्ही ग्रहण करतो. म्हणून आमच्या


अनुक्रमणिका

उद्दिष्टांचा परिणाम उलटा होतो. चांगले उद्देश राखूनही तुम्ही जर जुनी अवजारे व शस्त्रे वापरून दुर्जनांशी लढाल तर मी म्हणेन, तुमची उद्दिष्टे चांगली आहेत, पण तुम्ही भोळे आहात. ज्या शस्त्रांनी भांडवलवाले लढतात, त्याच शस्त्रांनी जर आपण त्यांच्याशी लढू तर त्यांचा जय ठेवलेलाच आहे.

समाजातील विषमता आम्हाला अहिंसेनेच दूर करावयाची आहे. समानता तर कम्युनिस्टही इच्छितात. परंतु समानतेची त्यांची कल्पना आमच्या कल्पनेहून भिन्न आहे. दरेक गाव व दरेक व्यक्ती स्वावलंबी झाली पाहिजे ही वस्तू त्यांच्या कल्पनेत नाही. चांगल्या उद्दिष्टांसाठी वाटेल ती साधने वापरण्यास हरकत नाही असे ते मानतात. भारतात जर या कल्पनेला मान्यता मिळाली तर सर्वोदय दूरच राहिला, आपले स्वराज्यही धोक्यात येईल.

### सद्विचार व जबरदस्ती

चांगली गोष्ट जबरदस्तीने जरी थोपली तरी परिणाम चांगलाच होईल असे साम्यवाद्यांना वाटते. समजा, एखाद्या मुलाचे पोट दुखत आहे, एरंडेल प्यायला तो तयार नाही. तेव्हा त्याचे नाक दाबून त्याला एरंडेल पाजलेच पाहिजे. जबरदस्तीने जरी एरंडेल पाजले तरी पोट तर साफ होणारच.

साम्यवाद्यांची ही कल्पनाही मी समजू शकतो. पण शारीरिक व्याधी व मानसिक व्याधी यात फरक आहे. मानसिक व्याधी लोकांना समजावून सांगण्यानेच दूर होऊ शकते. याबाबत जबरदस्ती केली जाऊ शकत नाही.

जबरदस्ती करून चांगले काम केले जाऊ शकते हा भ्रम आज पसरलेला आहे. शिक्षक विद्यार्थ्यांना विषय समजावून सांगण्यासाठी पुस्तकाएवढाच मारावर भरवसा ठेवतात. जबरदस्तीने धर्मांतर देखील करवले जाते. शिक्षकांचा विश्वास मारण्यावर, धर्मवाल्यांचा विश्वास जबरदस्तीवर आणि साम्यवाद्यांचाही जबरदस्तीवरच विश्वास! ही सगळी चुकीची पद्धती आहे. सद्विचाराचा प्रसार जबरदस्तीने होऊ शकत नाही.

### हिंसेवरची श्रद्धा ढळली

आता हवा बदलली आहे. साम्यवाद्यांचाही पूर्वी होता तसा आज हिंसेवर विश्वास राहिलेला नाही. आमच्याप्रमाणेच त्यांनाही विश्वशांतीची आवश्यकता वाटू लागली आहे. जगात आज परिस्थितीच अशी निर्माण झाली आहे की, प्रत्येकाला विचार करणे भाग पडत आहे. अणुबाँब, हायड्रोजन बाँब इत्यादि भयानक अस्त्रे निघाली आहेत. ती मानवजात नष्ट करू शकतात. अशा स्थितीत कोणताही देश प्रगती करू शकत नाही. अविकसित देशांना तर शांततेची गरज प्रकर्षाने जाणवत आहेच, विकसित देशांनाही शांततेची गरज भासत आहे. आजची स्थितीच कायम राहील तर प्रत्येक देशातील नागरिक भयभीत राहतील. म्हणूनच भारतातील साम्यवाद्यांच्या मनातही शांततेबद्दल श्रद्धा उत्पन्न झाली आहे.

परंतु ही श्रद्धा कच्ची आहे. खरे म्हणजे, त्यांच्या मनात श्रद्धा निर्माण झाली आहे असे म्हणण्यापेक्षा, अशांततेवर, हिंसेवर जी श्रद्धा होती, ती उखडली गेली आहे असे म्हणणे जास्त सयुक्तिक ठरेल. हिंसेने काम होईल अशी श्रद्धा राहिलेली नाही आणि अहिंसेवर पूर्ण श्रद्धा बसलेली नाही, अशा मधल्या स्थितीत ते आहेत.

रशिया, अमेरिका इत्यादी मोठ्या राष्ट्रांचाही हिंसेच्या परिणामकारकतेवर विश्वास राहिलेला नाही. तरीही ते हिंसेचा त्याग करण्याऐवजी शस्त्रास्त्रे वाढवीत आहेत. हा विरोधाभास त्यांच्या लक्षात येत नाही. मात्र त्याबद्दल आम्ही त्यांना दोष देत नाही, कारण एखाद्या देशातील एखादी मोठी समस्या अहिंसेने सोडवता येऊ शकते हे आम्ही अजून सिद्ध केलेले नाही.

### जडवादीच नव्हे तर जडबुद्धीही

भारतीय साम्यवाद्यांबद्दल माझा एक आक्षेप हाही आहे की ते नुसते जडवादीच नाहीत, तर जडबुद्धी आहेत. जडवाद ही एक विचारसरणी आहे. तेव्हा ते नुसते जडवादी असते तर काही हरकत नव्हती. पण ते रशियात काय होते आहे हे पाहून सगळे काम करीत असतात. रशियाचे तिकडे रूप बदलले की इकडे यांचेही रूप बदलते.

### साम्यवाद नंबर दोनवर

साम्यवादाबद्दल हे सगळे आक्षेप असूनही मी मानतो की आमचे काम साधले नाही तर साम्यवाद हा 'नेक्स्ट बेस्ट' आहे असे खुशाल समजावे. त्याचे भय बाळगू नये. लाख रुपये मिळविण्यासाठी आपण प्रयत्न केला तर दहा हजार






मिळाले तर फार बिघडत नाही.

सर्वोदयाचे स्थान पहिले आहे. नंबर दोन साम्यवाद आणि नंबर तीन स्टेटस्‌को (यथास्थिती). यथास्थितीला दुसरा नंबर देणे चुकीचे आहे.

साम्यवाद हासुद्धा विश्वव्यापक विचार आहे. त्यात करुणा आहे, पण वैज्ञानिक चिंतन नाही. तो जुनाट झाला आहे. कार्ल मार्क्सला जे दर्शन होते, ते जुने दर्शन होते, त्यामुळे त्याची दृष्टी सीमित आहे. साम्यवाद तत्पूर्वीच्या विचाराची प्रतिक्रिया आहे. म्हणजे तो सिन्थेसिस नाही, ॲन्टी-थीसिस आहे. तत्पूर्वी जो भांडवलवाद आणि व्यक्तित्वाचा थीसिस होता त्याच्या विरुद्ध प्रतिक्रियास्वरूप तो निर्माण झाला आहे. तो संवाद नाही. चौथी गोष्ट म्हणजे ती उधारी आहे. नगद आहे सरकार मजबूत करणे, राज्याचा क्षय हळूहळू होईल. हे अवैज्ञानिक चिंतन आहे.

शिवाय ते हिंसेचा आश्रय घेतात. परंतु त्यांनी लक्षात ठेवले पाहिजे की हिंसा जनतेची - मासेस्‌ची - शक्ती नाही, क्लासेस्‌ची, म्हणजे विशिष्ट वर्गाची शक्ती आहे.

असे आक्षेप असले तरी मी त्यांना दुसरा नंबर देईन, तिसरा नव्हे.



## उक्ति-कृतीतील अंतर : एक चर्चा

**विनोबा -** तुम्ही तोंडाने भांडवलशाहीला विरोध करता. मग आचरणाने तिला पोषण का देता? हेच पहा - तुमच्या शरीरावर गिरणीचा कपडा आहे, ज्यामुळे प्रतिवर्ष प्रतिव्यक्ती पंधरा रुपयांचा कर भांडवलदारांना मिळतो आहे. भांडवलदार मजुरांचे शोषण करीत आहेत. त्यात तुम्ही सहभागी का होता? त्याऐवजी खादी वापरून भांडवलदारांना मिळणारा कर बंद का करीत नाही?

**साम्यवादी -** कारण आम्ही विज्ञान व यंत्रीकरणाचे समर्थक आहोत. खादी हा मध्ययुगीन जुनाट विचार आहे. कारखाने सरकारी व्हावेत यासाठी आम्ही आंदोलन करतो. कारखान्यांचे राष्ट्रीयीकरण झाले तर मजुरांचे शोषण आपोआपच बंद होईल.

**विनोबा -** 'नेहमी गिरणीचा कपडा वापरावा की खादी?' हा मुद्दा क्षणभर बाजूला ठेवा, आणि विचार करा की तुमच्या म्हणण्याप्रमाणे जोपर्यंत गिरण्यांचे राष्ट्रीयीकरण होत नाही, तोपर्यंत तरी खादी वापरून भांडवलदारांना सहकार्य देणे बंद का करू नये? यामुळे गिरण्यांचे राष्ट्रीयीकरण लवकर होण्यास मदतच होईल. तुम्ही भांडवलदारांविरुद्ध बोलता खूप, पण प्रत्यक्षात त्यांना मदत करता. मी मात्र तोंडाने एक शब्दही न उच्चारता त्यांची रसद तोडतो. शब्द व कृतीतला विरोध तुमच्या ध्यानात का बरे येत नाही?

**साम्यवादी -** खादीचा वापर केल्याने प्रगतीच्या घड्याळाचे काटे उलटे फिरतील. विज्ञानयुगाकडे पाठ फिरवून आपण मध्ययुगात जाऊ. शिवाय नजीकचा भविष्यकाळ व सुदूर भविष्यकाळ यांच्यात विरोध उत्पन्न होईल.

**विनोबा -** असे तर तुम्ही एकदाच नव्हे तर हजारदा करता. कम्युनिस्ट पार्टी उत्पादक-साधनांवरील व्यक्तिगत मालकीच्या विरुद्ध आहे. परंतु केरळमधल्या कम्युनिस्ट सरकारने १५ एकर ओलीत जमिनीचे सीलिंग सुचवणारे बिल मांडले होते. केरळमधील १५ एकर ओलीत जमीन म्हणजे येथील ७५ एकर ओलीत जमीन किंवा किमान ३०० एकर कोरडवाहू जमीन. तेथे इतकी कमी जमीन व जास्त लोकसंख्या आहे. मी त्यावेळी ग्रामदानाचा म्हणजे मालकी-विसर्जनाचा प्रचार करीत होतो. आणि कम्युनिस्ट सरकार तत्त्वतः मालकीच्या विरुद्ध असूनही तात्कालिक धोरण म्हणून १५ एकर ओलीत जमिनीची मालकी कायद्याने पक्की करीत होते. याचप्रमाणे, यांत्रिकीकरणाचा विचार मान्य करूनही, गिरण्यांचे राष्ट्रीयीकरण होईपर्यंत संक्रमणकाळात खादी का वापरत नाही? शिवाय, खादी-विचार तुम्ही समजता तसा मध्ययुगीन किंवा

अनुक्रमणिका






विज्ञान-विरोधी नाही. पूर्वी लोक हाताने सूत कातत. मग टकळी चालवू लागले. नंतर चरखा आला. आणि आता तर अंबर चरखा आला आहे. दुसरा उद्योग मिळाल्यावर आणि शोषणमुक्त स्थितीत अंबरचरखा विजेवरही चालवता येईल.

**साम्यवादी -** मग तुम्हाला काय म्हणायचे आहे? आम्ही सूत कातावे काय?

**विनोबा -** निश्चितच. अर्धा तास, तासभर, फुरसतीच्या वेळी जरूर तुम्ही सूत काता. कताई हे प्रतीक आहे. फुरसत मिळाली नाही तर विकत घेऊन खादी वापरण्यासही हरकत नाही. मात्र गिरणी-मालकांना जो मलिंदा देत आहात तो बंद करा. तुमच्या उक्ती आणि कृतीत अंतर असल्यामुळेच गिरणीमालक तुमच्या बडबडीची मुळीच पर्वा करीत नाहीत. म्हणूनच समाजव्यवस्थाही बदलत नाही. एखादी व्यक्ती लवकर मरावी असे तोंडाने म्हणावे आणि प्रत्यक्षात मात्र त्याला पौष्टिक खुराक खाऊ घालावा, तसे हे आहे. यामुळे भांडवलदारांना पोषण मिळते.
असो. आता हे सांगा की तुमचा कल मॉस्कोकडे आहे की बेइजिंगकडे?

**साम्यवादी -** आम्ही तटस्थ आहोत.

**विनोबा -** तुम्ही आपली बुद्धी मॉस्को किंवा बेइजिंगकडे गहाण न ठेवता आजच्या जागतिक व देशातील परिस्थितीला अनुरूप धोरण का ठरवत नाही, हे माझ्या लक्षात येत नाही. आज अणुयुग चालू आहे. रशिया युद्ध टाळण्याबाबत बोलत आहे, तसेच आचरणही करत आहे. हा नवीन जागतिक संदर्भ आहे. भारतात भयानक बेकारी आहे. अशा स्थितीत तुम्ही खादीचा पुरस्कार का करीत नाही? उद्या गिरण्यांचे राष्ट्रीयीकरण झाल्यावर आणि लोकांना दुसरा उद्योग मिळाल्यावर चरखा खुशाल इंधन म्हणून वापरा. पण तोपर्यंत काय?

**साम्यवादी -** कारखान्यांचे राष्ट्रीयीकरण करण्याच्या आमच्या मागणीला तुम्ही पाठिंबा द्याल काय?

**विनोबा -** अवश्य! दहा-बारा वर्षांपूर्वीच मी या गोष्टीला पाठिंबा दिला आहे. सर्वोदय-योजना प्रकाशित झालेली आहे. त्यात म्हटले आहे की मोठे कारखाने, गिरण्या, खाणी राष्ट्राची संपत्ती होतील. परंतु तुम्ही लोक तर आजकाल तुमचेही साहित्य तेवढे वाचत नाही, जेवढे वीस वर्षांपूर्वी वाचत होता. मग आमच्या साहित्याची काय कथा! सर्वांचेच अध्ययन आज कमी झाले आहे.



# भूमिसमस्या, साम्यवादी आणि भूदान

येथील कम्युनिस्ट बंधुंनी मला मानपत्र देऊन भूदान यज्ञाच्या यशाबद्दल शुभकामना व्यक्त केली ही आनंदाची गोष्ट आहे. मानपत्रात त्यांनी म्हटले आहे - 'या आंदोलनाने एका महत्त्वाच्या प्रश्नाला चालना मिळाली आहे आणि आम जनतेत भूमीचा हा संदेश पोचत आहे.' त्यांनी पुढे असेही म्हटले आहे की हा प्रश्न शांततेच्या मार्गाने सुटला तर त्यांना आनंद होईल.

मीदेखील असेच मानीत होतो की कम्युनिस्टांना वाईट पद्धतीचा अवलंब करण्यात आनंद वाटतो असे नाही. देशातील गरीब बांधवांसाठी त्यांचा जीव तळमळतो. त्या तळमळीमुळे चुकीच्या मार्गाचा त्यांनी अवलंब केला तर तेवढ्या-वरून तो मार्ग त्यांना पसंत आहे असे म्हणता येणार नाही. आम्ही ज्याला योग्य मार्ग समजतो तो यशस्वी झाला तर त्यांना आनंदच होईल. आमच्या चांगल्या पद्धतीवर कम्युनिस्टांचा सहजासहजी विश्वास बसणार नाही हे उघड आहे. याचे मला आश्चर्य वाटत नाही. चांगला मार्ग यशस्वी करून दाखवणे हेच आपले काम आहे. यासाठी आपण कसून प्रयत्न केला नाही व केवळ सद्भावना व्यक्त करीत राहिलो तर तेवढ्याने होणार नाही. दुःखी जनता फार काळ धीर धरू शकणार नाही. म्हणून ज्यांचा अहिंसक पद्धतीवर विश्वास आहे त्यांनी






ती पद्धती यशस्वी करून दाखवली पाहिजे, हा त्यांचा धर्म आहे.

माझा प्रयत्न हाच आहे. यात सर्वांनी मदत करावी असे मला वाटते. या पद्धतीने भूमी समस्या सुटणार नाही असे जरी कम्युनिस्ट मानीत असले तरीही त्यांनी यात मदत करावी अशी माझी इच्छा आहे. ते जर या कार्यात मदत करू इच्छित असतील तर ते कशाप्रकारे मदत करू शकतील याचे थोडे दिग्दर्शन मी आज करू इच्छितो.

### सगळ्या जमिनी पापाने मिळवलेल्या नाहीत

त्यांनी मानपत्रात म्हटले आहे - 'भूमिहीनांना जमिनी मिळाल्या तरच ही समस्या सुटू शकेल.' माझेही असेच मत आहे. मात्र पुढे त्यांनी म्हटले आहे - 'या सगळ्या जमिनी जमीनदारांना सामंतशाहीच्या काळात त्यांचे हस्तक असल्यामुळे मिळाल्या आहेत.' येथे त्यांच्या व माझ्या सांगण्याच्या पद्धतीत फरक पडतो. त्यांचे म्हणणे पूर्णपणे चुकीचे आहे असे नाही, परंतु सगळ्या जमिनी जमीनदारांनी अन्यायानेच मिळवल्या आहेत असे म्हणणेही बरोबर नाही. पूर्ण माहितीच्या अभावी आपल्या पूर्वजांबद्दल ठामपणे बोलणे योग्य नाही. गरिबांनी जमिनी केवळ भलेपणामुळे गमावल्या अशी स्थिती नसून पापामुळेही त्यांनी जमिनी गमावल्या आहेत. दारूचे व्यसन, उधळपट्टी, कोर्टकचेऱ्या इत्यादी दोषांमुळेही ते बर्बाद झाले आहेत. तसेच, जमीनवाल्यांनाही केवळ पापामुळे नव्हे तर पराक्रम आणि पुण्यामुळेही जमिनी मिळाल्या आहेत.

### भूमिपती नव्हे, भूमिपुत्र

मी तर एक पाऊल पुढे जाऊन म्हणतो की साऱ्या जमिनी त्या लोकांना त्यांच्या पराक्रमाने व पुण्याने मिळाल्या असल्या तरी आज जमीन मूठभर लोकांजवळच राहणे चालणार नाही. प्रतिव्यक्ती जमिनींचे प्रमाण दिवसेंदिवस कमी होत आहे, उद्योगधंदे नष्ट झाले आहेत. तेव्हा जे जमीन मागतात त्यांना ती मिळालीच पाहिजे. म्हणून जमीनदारांना जमीन मागताना मी हा परमेश्वरी न्याय समजावून सांगतो की जमीन त्यांची स्वतःची नाही, ती ईश्वरी देणगी आहे. मी त्यांना सांगतो की, तुम्ही कम्युनिस्टांना नास्तिक म्हणता, परंतु तुम्ही ईश्वरावर श्रद्धा असल्याचा दावा करता आणि त्याने निर्माण केलेल्या जमिनीवर आपला अधिकार सांगता, मग तुम्हाला आस्तिक कसे म्हणायचे? हवा, पाणी, सूर्यप्रकाश या गोष्टी ईश्वराने सर्वांसाठी निर्माण केल्या आहेत. तो सर्वांना जन्म देतो. प्रत्येक मूल, मग ते राजाचे असो की भिकाऱ्याचे, नागवेच जन्माला येते. श्रीमंताचा मुलगा काही दागिने घालून जन्माला येत नाही. मेल्यानंतर सर्वांच्या शरीराची राखच होते. यावरून ईश्वराला समानता हवी आहे हे स्पष्ट आहे. आपण समान जन्म घेतो, समान मरतो, मग मध्येच भेद का असावा? म्हणून जमीनदार-भूमिहीन, मालक-मजूर, उच्च-नीच हे सगळे भेद ईश्वरी इच्छेविरुद्ध आहेत.

काही लोक स्वतःला 'भूमिपती' म्हणवतात. हा शब्द वापरणे किती चुकीचे आहे! आम्ही रोज प्रार्थनेत 'विष्णुपत्नि नमस्तुभ्यम्' असे म्हणतो. पृथ्वीचा स्वामी तर परमेश्वर आहे. आपण त्या पृथ्वीमातेची लेकरे आहोत - 'माता भूमिः पुत्रोऽहम् पृथिव्याः।' मी त्या लोकांना सांगतो की भूमिपती हा शब्द चुकीचा रूढ झाला आहे. जमिनीवर सर्वांना समान अधिकार असला पाहिजे, कारण सर्वांना जमीन हवी आहे. जगण्यासाठी, मरण्यासाठी, प्रत्येकच कामासाठी जमिनीची गरज पडते. प्रत्येक कामाला जमिनीचे अधिष्ठान लागते, म्हणून जमिनीवर सर्वांचा अधिकार असला पाहिजे. त्यासाठी ज्यांना जमीन हवी असेल, त्या सर्वांना जमीन मिळवून देणे हे प्रत्येकाने आपले कर्तव्य मानले पाहिजे.

### इतिहास उकरत बसू नका

जमीनदारांना हे सगळे समजावून सांगण्याऐवजी 'जमिनी मिळवणारे तुमचे पूर्वज बेईमान होते' असे म्हणत राहणे आवश्यकही नाही आणि योग्यही नाही. आपण एक शुभ काम करण्यासाठी निघालो असताना त्यात अपशकुन नकोत. परंतु कम्युनिस्ट नेमके तेच करतात. ते वर्गसंघर्ष निर्माण करण्याचा प्रयत्न करतात. एखाद्या प्रश्नाच्या मागे जेवढी द्वेषभावना उभी करता येईल, तेवढी करण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. ही पद्धती मला योग्य वाटत नाही. इतिहासातल्या गोष्टी उकरून काढण्याची मला गरज वाटत नाही. परंतु कम्युनिस्ट आणि कम्युनलीस्ट (साम्यवादी आणि संप्रदायवादी) या दोघांनाही इतिहासातल्या गोष्टी उकरून काढण्याची हौस आहे. जुन्या घटनांच्या आठवणी देऊन ते लोकांमधील द्वेषभावना

अनुक्रमणिका

भडकवतात. इतिहासाचा असा उपयोग केला जाऊ नये कारण खरा इतिहास आपल्याला माहीतच नसतो. म्हणून, इतिहासाच्या भानगडीत न पडता एखादी गोष्ट आजच्या परिस्थितीत न्याय्य आहे की नाही, एवढेच आपण पहावे.

कम्युनिस्ट बंधू माझे हे म्हणणे मान्य करतील तर जुना इतिहास उकरण्यात काही लाभ नाही हे त्यांच्या लक्षात येईल. आपल्यासाठी वर्तमानकाळच पुरेसा आहे. आज कोणी न्याय्य काम करीत असेल तर त्याचे पूर्वज कितीही अन्यायी असले तरी त्याच्या कामाला दोष देता येणार नाही. उलट, आज कोणी अन्याय्य काम करीत असेल तर त्याचे पूर्वज कितीही न्यायी असले तरी त्याचा काही उपयोग नाही. ही गोष्ट लक्षात आली तर विनाकारण झगडे निर्माण होणार नाहीत, आणि आपल्या कामासाठी सद्‌भावना असलेल्या लोकांचे सहकार्य आपण मिळवू शकू. या तऱ्हेने कम्युनिस्टही माझ्या कामाला मदत करू शकतात. जर ते जुन्या गोष्टी उकरून काढणे सोडून देतील तर त्यांच्या बद्दलही लोकांच्या मनात सद्‌भाव निर्माण होईल.

### गरिबांचे संघटन

जोपर्यंत गरीब संघटित होत नाहीत, तोपर्यंत जमिनीचा प्रश्न सुटणार नाही, असे कम्युनिस्टांचे म्हणणे आहे. यात तथ्य आहे हे मी मान्य करतो. त्याबरोबर मी हेही सांगू इच्छितो की मी गरिबांना संघटित करण्याचेच काम करीत आहे.

आमची गरीब जनता केवळ भूमिहीनच नाही, तर ती मूकही आहे. त्यांची वकिली मी उत्तम प्रकारे करीत आहे. मी भीक मागत नसून भूमिहीनांचा अधिकार मागत असतो. मोठ्या जमीनदारांकडून किरकोळ दान घेण्याला नकार देण्याचे व गरिबांचे अत्यल्प दान प्रेमाने स्वीकारण्याचे अनेक प्रसंग भूदानयात्रेत येत असतात. ही पद्धती मजुरांना संघटित करणारी आहे, आणि ते संघटित होत आहेत असे दृश्यही दिसत आहे.

### भूदान ही मजुरांची चळवळ

मी जे काम उचलले आहे ते मजुरांसाठीच आहे. सर्वात दुर्बल, भूमिहीन आणि वाचाहीन असे जे लोक आहेत, त्यांच्यासाठी चालविलेली ही चळवळ आहे. बहुधा मजुरांच्या चळवळी शहरांत होतात. खेड्यांतील मजूर अत्यंत असंघटित आहेत. त्यांच्यात जागृती नाही, त्यांना धड शिक्षण नाही, शेतीशिवाय दुसरा उद्योग नाही. ज्या शेतीत ते काम करतात, तिच्यावर त्यांचा अधिकार नाही. समाजातील अतिशय निकृष्ट श्रेणीतील हे लोक आहेत. त्यांचा प्रश्न मी हाती घेतला आहे. सर्वात खालच्या श्रेणीतील लोकांचा प्रश्न हाती घेणे हेच सर्वोदयाचे किंवा अहिंसेचे लक्षण आहे. अगदी खाली पडलेल्याला वर उचललेच पाहिजे. तो उठला की बाकीचे आपोआप उठतात. त्यांच्यासाठी वेगळी चळवळ करावी लागत नाही. सर्वोदयाची आणि अहिंसेची रीतच अशी आहे की तिच्या योगाने सर्व थरांतले लोक आपोआप वर उठतात.

एकाने मला विचारले - 'मध्यमवर्गाच्या किंवा शहरातल्या मजुरांसाठी तुम्ही काय करीत आहात?' मी गमतीने उत्तर दिले - 'जगातल्या सर्व समस्या सोडवण्याचा ठेका मी घेतलेला नाही!' परंतु हा विनोद झाला. खरे म्हणजे एक साधे सब साधे, सब साधे सब जाय' म्हणून माझे काम एक वातावरण निर्माण करण्याचे आहे. त्या योगाने समता, न्याय, भूतदया, सहानुभूती यांची हवा पसरेल आणि बाकीचे सर्व प्रश्न आपोआप सुटतील. न सुटले तरी थोड्याशा प्रयत्नाने सुटून जातील.

### हिंसक मार्ग हानिकारक

जगात अनेक ठिकाणी शेतकरी-कामगारांची आंदोलने झाली. परंतु भारतात कोणी त्याकडे लक्ष दिले नाही. केवळ कम्युनिस्टांनी तेलंगणामध्ये तशी चळवळ केली. इतरत्र ज्या चळवळी झाल्या त्या फक्त शहरातील मजुरांच्या झाल्या. आपापल्या पद्धतीने जगातल्या राष्ट्रांनी हा प्रश्न सोडवण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याचा रस्ता वाकडा होता. त्याने जगाचे काही भले झाले नाही आणि होणारही नाही. मजुरांचा प्रश्न एकांगी आणि हिंसक पद्धतीने सोडवू पाहणारांना कधीच यश यायचे नाही. मी अशा कुशलतेनं काम करतो की समता साधते, मजुरांचे दुःख नाहीसे होते आणि क्षमतेसह इतर गुणही दाखल होतात.

### आमची दृष्टी

आम्हाला मजुरांना केवळ अन्न-वस्त्रच द्यायचे आहे असे नाही. ही समस्या केवळ भौतिक नाही. कोणतीही समस्या

केवळ आर्थिक समस्या असत नाही असे माझे मत आहे. खोलात जाऊन पाहिले तर दिसून येईल की भौतिक समस्या आध्यात्मिक आणि नैतिकच असतात.

मजुरांची शक्ती वाढावी अशी आमची इच्छा आहे. प्रश्न असा आहे की ती कशी वाढेल? त्यांच्यात शक्ती आहे, पण त्यांना तिची जाणीव नाही. ती तेव्हाच होईल, जेव्हा ते एकमेकांना मदत करू लागतील. गरीब गरिबांची चिंता करू लागतील तर त्यामुळे त्यांची नैतिक शक्ती वाढेल. जोपर्यंत ते त्याग करावयास शिकत नाहीत, तोपर्यंत त्यांची शक्ती वाढणार नाही.

माझी तर इच्छा आहे की मजूर आणि मालक हा भेदच नाहीसा व्हावा. जो मालक असेल तो मजूरही असेल आणि जो मजूर असेल तो मालकही असेल. काही लोक बुद्धि-प्रधान शरीरश्रम करणारे असतील तर काही श्रम-प्रधान बुद्धीचे काम करणारे असतील. ईश्वराची तशी योजना नसती तर त्याने काही लोकांना फक्त डोकीच दिली असती. आणि काही लोकांना फक्त हातच दिले असते. परंतु त्याने प्रत्येक मनुष्याला सर्व अवयव दिले आहेत. म्हणून, प्रत्येकाने परिपूर्ण जीवन जगावे अशीच त्याची योजना असली पाहिजे.



# साम्ययोगाचे समग्र दर्शन

भूदान-यज्ञाच्या मागे जो विचार आहे, त्याचे नाव मी 'साम्ययोग' ठेवले आहे. याच साम्ययोगाच्या आधारावर आम्ही सर्वोदय-समाज निर्माण करू इच्छितो. सर्वोदय-समाजाच्या बाबतीत आपणाला हे माहीत आहे की, तो बहुसंख्यांचे नव्हे, तर सर्व समाजाचे हित इच्छितो. ज्या साम्ययोगाच्या आधारावर हा विचार उभा आहे, तो मी अधिक विस्ताराने विशद करू इच्छितो. आज जगात तीन विचारसरणी प्रचलित आहेत, हे आपणास माहीत आहे. एक जुना-पुराणा भांडवलवाद आहे. क्षमता वाढविण्याचा आमचा हेतू आहे असे भांडवलवाद म्हणतो. दुसरा लोकशाही समाजवाद व तिसरा साम्यवाद. सर्वांच्या जीवनावश्यक गरजांची पूर्ती आम्ही समभावाने करू इच्छितो असा साम्यवादाचा दावा आहे.

### क्षमतावादी भांडवलवाद

जगात प्रचलित असलेल्या या तीन विचारसरणींपैकी प्रथम भांडवलवादाचा विचार करू. भांडवलवाद हा मी आताच सांगितल्याप्रमाणे क्षमतावादी आहे. त्याचे असे म्हणणे आहे की काही लोकांची योग्यता कमी आहे, तेव्हा त्यांना कमीच मिळाले पाहिजे. काही लोकांची योग्यता अधिक असते, तेव्हा त्यांना अधिक मिळाले पाहिजे. योग्यतेप्रमाणे श्रमाचा मोबदला देऊन समाजात क्षमता उत्पन्न करण्याची त्यांची इच्छा आहे. यामुळे काही लोकांचे जीवनमान खूपच वरच्या पातळीवर गेले आहे, तर बाकी सगळ्या लोकांचे जीवनमान दरीत पडल्याप्रमाणे खोल गेले आहे. यावर भांडवलवादापाशी कोणताच उपाय नाही. त्याचे तर सरळसरळ असे म्हणणे आहे की, जे नालायक आहेत, त्यांना नालायकीवाचून दुसरी गती नाही आणि जे लायक आहेत त्यांनी जगातले सगळे सुखोपभोग घ्यावेत हे अपरिहार्य आहे. म्हणूनच आज सर्वसामान्य जनता दुःखी आहे आणि भांडवलदारांचे समर्थकही अगदी कमी आहेत. अजून ती विचारसरणी चालू आहे. मात्र आज ना उद्या ती नष्ट होणारच आहे.

### लोकशाही समाजवाद

लोकशाहीत प्रत्येकाला एकेक मत असते. तेथे सारे काम मतांच्या आधारे चालते. त्यात बहुसंख्यांकांचेच रक्षण होते. अल्पसंख्यांकांचे नव्हे. लोकशाही समाजवादाचे असे म्हणणे आहे की, त्यात सर्वांचे रक्षण होते. पण त्यांतून उत्पन्न होणाऱ्या अनिष्ट गोष्टींवर काही इलाज समाजवादापाशी नाही. जोवर बहुसंख्यांकांच्या निर्णयावर अल्पसंख्यांकांच्या हिताचे रक्षण केले जाणार तोपर्यंत पूर्ण समाजवाद येणे शक्य नाही.

### वर्गसंघर्षवादी साम्यवाद

कम्युनिझम किंवा साम्यवाद यांचे म्हणणे हे आहे की, आजच्या समाजातील उच्च वर्गाचा नाश केल्याखेरीज समता निर्माण करणे शक्य नाही. ज्यांच्या हातात सत्ता आहे त्यांना नष्ट केल्याशिवाय व वर्गसंघर्षाशिवाय दुसरा काही उपाय नाही. एवढी हिंसा ही धर्मरूप व अवश्य अशीच हिंसा आहे. पण याही विचारसरणीने जगात शांतता निर्माण होऊ शकणार नाही हे स्पष्ट आहे, कारण हिंसेमुळे प्रतिहिंसा निर्माण










होते. ती काही काळ दबून बसल्यासारखी वाटली तरी अखेर वर उसळून येतेच. एवढेच नव्हे तर हिंसेमुळे मानवतेची प्रतिष्ठा व मानवतेची मूल्ये ही क्षीण होऊन जातात.

### आत्मवादावर आधारलेला साम्ययोग

साम्ययोगाचे असे म्हणणे आहे की प्रत्येक मनुष्यात एकच आत्मा समान रूपात वास करीत आहे. साम्ययोग मानवा-मानवात भेद करीत नाही एवढेच नव्हे तर मानवातील आत्मा व इतर प्राणिमात्रातील आत्मा यांतही मूलभूत भेद मानीत नाही. तो एवढेच मान्य करतो की, मानवी आत्म्यात जो विकास संभवनीय आहे, तो दुसऱ्या प्राण्यांच्या आत्म्यात संभवू शकत नाही. मानवातही शिक्षणाने विकास होत असला, तरी सर्वांचा विकास सारखा होत नाही. पण प्राण्यांत शिक्षण देऊनही विकास संभवनीय नाही. सृष्टिमात्रात एकच आत्मा वसत असल्यामुळे शक्य तोवर सर्वच प्राण्यांचे रक्षण करण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

'साम्यवाद' व 'साम्ययोग' यांच्यात हा भेद आहे की, साम्यवादाला आत्म्याची एकता मान्य नाही आणि साम्ययोगाला ती मान्य आहे. एवढेच नव्हे, तर या आधाराने साम्ययोग अधिक खोलवर जाऊ इच्छितो. म्हणून नैतिक, आर्थिक, सामाजिक व राजकीय क्षेत्रात या विचाराचे क्रांतिकारक परिणाम होतात. एकदा आधारभूत असा आध्यात्मिक विचार ग्रहण केला की, जीवनाच्या अनेक शाखांत आपला प्रवेश होतो. आपल्या बुद्धि-शक्तीचे धनी आपण नाही, तर परमेश्वर आहे. आपले सर्व गुण हे समाजासाठीच असल्यामुळे आपल्या साऱ्या शक्ती ईश्वराची देणगी समजून समाजाला अर्पण केल्या पाहिजेत. आपण आपल्या शरीराचेही मालक नाही. तर केवळ विश्वस्त आहोत. साम्ययोगाचे म्हणणे हे आहे की, कोणत्याही रूपातील संपत्तीचे मालक आपण नाही. साम्यवाद व साम्ययोग यांच्यामध्ये हाच मोठा भेद आहे.

### 'ट्रस्टीशिप' चा क्रांतिकारक विचार

आजवर लोक स्वतःस संपत्तीचे मालक समजत आले आहेत. त्यामुळे वेगवेगळ्या हितांमध्ये विरोध निर्माण होतो. पण 'विश्वस्तवृत्ती'चा विचार पुढे आला की पूर्ण वैचारिक क्रांती होते. आपापल्या गोष्टीवर आपली स्वतःची मालकी आहे असे जे आपण मानतो ते चूक आहे. आपल्यापाशी ज्या ज्या शक्ती आहेत, त्या समाजसेवेसाठीच आहेत; व्यक्तिगत स्वार्थ साधण्यासाठी नव्हे. आपला स्वार्थ समाजाच्या चरणी अर्पण करणे यातच खरा व्यक्तिगत स्वार्थ आहे. सगळ्या समाजाला आपला स्वार्थ अर्पण करणे व समाजाच्या हितासाठीच सतत झटणे यातच आपला खरा स्वार्थ आहे. साम्ययोगातून हेच नैतिक वैशिष्ट्य निर्माण होते.

### साम्ययोगाची अर्थनीती

साम्ययोगामुळे आर्थिक क्षेत्रात कशी क्रांती होते हे आता आपण पाहू. आपणापाशी ज्या शक्ती आहेत, त्या आम्ही स्वतःच्या मालकीच्या समजत नाही. जी व्यक्ती आपल्या पूर्ण सामर्थ्याने समाजाचे काम करील, तिला भोजनाचा हक्क प्राप्त होईल. एखाद्या आंधळ्याने आपले हे व्यंग असतानाही आपल्या पुऱ्या शक्तीने बनेल तेवढे काम केले, तर डोळस माणसापेक्षा त्याचे काम कमी भरले तरी त्याला भोजनाचा हक्क प्राप्त होईल. शक्ती जशी कमी-जास्त असेल, तिच्या प्रमाणात काम कमी-अधिक होईल यात शंका नाही. पण पोषण ही भौतिक वस्तू आहे व सेवा ही नैतिक वस्तू आहे. नैतिक वस्तूची किंमत भौतिक वस्तूने होणार नाही. एखाद्या बुडणाऱ्या माणसाला वाचविण्यासाठी केलेली दहा मिनिटांची सेवा, दिवसाच्या नेहमीच्या कामाच्या मापाने मोजली जाऊ शकेल काय? आई आपल्या मुलाची सेवा करते, मुलगा बापाची सेवा करतो व मंत्री समाजाची सेवा करतो. पण या सर्वांच्या कामाची किंमत पैशाने मोजली जाऊ शकणार नाही. ज्या कार्यात मनुष्य हृदय ओततो, त्या कामाची किंमत पैसा कशी करू शकणार? मुलगा आईला जे देतो, विद्यार्थी गुरूला जे देतो किंवा शेतकरी समाजाला जे देतो, त्याचे मोल पैशात मापता येणे शक्य नाही

नैतिक मूल्यांप्रमाणेच आर्थिक क्षेत्रातही श्रमाचे मूल्य समानच मानले गेले पाहिजे. पण, आज अगदी उलट दिसून येते. आज शारीरिक कार्यापेक्षा बौद्धिक कामाला जास्त मजुरी दिली जाते. त्याला प्रतिष्ठाही जास्त मिळते. पण अशा तऱ्हेचा भेदभाव करण्याला काहीच आधार नाही. साम्ययोगाचा विचार हा आत्म्याच्या समतेवर आधारित असल्यामुळे आर्थिक क्षेत्रातही तो काही भेद मानीत नाही. जी सेवा आई करू शकते, ती

मुलगा करू शकत नाही. जी सेवा स्वामी करू शकतो, ती सेवकाला करता येत नाही, व जी सेवक करू शकतो, ती स्वामीला जुळत नाही. भाऊ जी सेवा करील ती बहिणीला करता येणार नाही व बहिणीचे काम भावाला येणार नाही. याप्रमाणे व्यक्तिभेदानुसार व शक्तिभेदानुसार सेवेतही भेद होत असला, तरी सर्वांची काळजी मात्र सारखीच घेतली पाहिजे. हाताची सर्व बोटे सारखे काम देत नाहीत. एका बोटाने जे काम होते ते दुसऱ्या बोटांनी झाले नाही, तरी ती सगळी समानच असतात. याचप्रमाणे समाजात प्रत्येकाची सेवा भिन्नभिन्न प्रकारची असली तरी तिचे आर्थिक मूल्य मात्र समानच असले पाहिजे.

साम्ययोगाच्या सिद्धांतानुसार नैतिक मूल्यांत जर भेद नाही, तर आर्थिक क्षेत्रातही भेद राहता उपयोगी नाही. प्रत्येकाला विकासाची पूर्ण संधी मिळावी व शिक्षणाला अवसर मिळावा. विद्यार्थी आपल्या ग्रहणशक्त्यनुसार शिक्षण घेतील. एखादा मुलगा गरीब आहे म्हणून त्याच्या शिक्षणाची सोय होऊ नये व दुसरा मुलगा श्रीमंताचा आहे म्हणून त्याच्या शिक्षणाची उत्तम सोय व्हावी असा भेद उपयोगी नाही. अशी विषम समाजाची मूल्ये जर आपण ठेवली तर सर्वांचा विकास होऊ शकणार नाही. समान संधी मिळाल्यानंतर ज्याची जशी योग्यता असेल, त्याप्रमाणे तो त्या त्या धंद्यात शिरेल. मजुरी कमी जास्त मिळण्याचा परिणाम असा होईल की, विकास चुकीच्या दिशेने होईल. आणि इतर क्षेत्रांविषयीचे आकर्षण व्यर्थच वाढेल. आज हेच होत आहे. समान वेतनामुळे ही वृत्ती नाहीशी होईल.

### विकेंद्रीकरण

या विचाराचा आर्थिक क्षेत्रात असा परिणाम होईल की, प्रत्येक खेडे पूर्ण स्वावलंबी बनेल. अन्न, वस्त्र, दूध, तूप इत्यादी प्राथमिक गरजेच्या वस्तू प्रत्येक खेड्यात तयार होतील व प्रत्येक खेडे स्वयंपूर्ण बनेल. हेही पूर्ण व तेही पूर्ण होईल. दोहोंच्या पूर्णतेमुळे समता निर्माण होईल. हेही अपूर्ण व तेही अपूर्णच राहिले तर दोहोंच्या अपूर्णतेमुळे समता निर्माण होऊ शकणार नाही. नेहमीच्या आवश्यक वस्तू खेड्यातच तयार झाल्या पाहिजेत. परमेश्वराने सर्वांना परिपूर्ण बनविले आहे. बुद्धी व शक्ती ह्या कमी-अधिक दिसू शकतील. पण देवाची योजना इतकी विकेंद्रित आहे की तिच्यामुळे सगळ्यांचा विकास होऊ शकतो. तशीच विकेंद्रित योजना आम्हाला अभिप्रेत आहे. आर्थिक क्षेत्रांत समता आली नाही तर उच्चनीचत्वाचा भेद वाढत जाईल. परावलंबन उत्पन्न होईल, व एक आत्मा दुसऱ्या आत्म्याचा गुलाम बनेल. म्हणूनच आम्हाला विकेंद्रित अर्थव्यवस्था पाहिजे आहे.

### साम्ययोगाची राजनीती व समाजनीती

याचप्रकारे राजकीय क्षेत्रातही आपली मूल्ये बदलत जातील. आम्हाला केवळ शोषणविरहितच नव्हे तर शासन-मुक्त समाजरचना हवी आहे. साम्ययोगाच्या कल्पनेनुसार शासन खेड्या-खेड्यात वाटले जाईल. खेड्या-खेड्यांचे स्वतःचे राज्य होईल. मुख्य केंद्रात नाममात्र सत्ता तेवढी राहील. याप्रमाणे होता होता शासनमुक्त-समाज आकारास येईल.

सामाजिक क्षेत्रातही जातिभेद किंवा उच्चनीच-भेद राहणार नाही. एखाद्यात ब्राह्मणाचे गुण असले तर तेवढ्यामुळे इतरांपेक्षा स्वतः उच्च समजण्याचे त्याला कारण नाही. तसेच मेहतर, चांभार, इत्यादी लोक नीच समजले जाणार नाहीत. त्यांच्या वाचूनही समाजाचे काम चालू शकत नाही.

### क्रांती : नैतिक मूल्यांत परिवर्तन

अशा प्रकारे नैतिक, आर्थिक, राजकीय व सामाजिक या सर्वच क्षेत्रात परिवर्तन घडविण्याची साम्ययोगाची इच्छा आहे. यालाच क्रांती म्हणतात. आजकाल लोक हिंसेलाच 'क्रांती' समजतात. पण जेथे मूलभूत गोष्टीत क्रांती होत नाही, तेथे वरवरच्या परिवर्तनाला क्रांती म्हणणे हे चूक आहे. ज्या वेळी आपण आपल्या नैतिक जीवनात परिवर्तन करतो, तेव्हाच खरी क्रांती होते. साम्ययोग हा नैतिक मूल्यांत परिवर्तन घडवीत आहे, असा आमचा दावा आहे. कारण त्याचे मूलतत्त्व आध्यात्मिक आहे व तो जीवनाच्या सर्वच शाखा-उपशाखांत आमूलाग्र क्रांती घडवून आणतो.

### साम्ययोगाची व्यापक दृष्टी

भूदान ही एक फाचर आहे. विचार समजण्यासाठी मोह-ममतेतून मुक्त होण्याचा हा प्रारंभिक विचार आहे, पण मुक्तता कशी मिळवायची? जमिनीच्या मालकीपासून मुक्तता

करण्याचे काम हाती घेऊनच हा आरंभ केलेला आहे. दान देणे म्हणजे कोणावर उपकार करणे नव्हे. आमची शेवटची पायरी तर ही आहे की, गावची सारी जमीन ही सगळ्या गावकऱ्यांच्या सार्वजनिक मालकीची असावी. त्यापुढे जाऊन आम्ही असे सांगू की, एखाद्या प्रांतात जमीन कमी असेल व लोकसंख्या जास्त असेल, तर त्या जास्त लोकसंख्येने दुसऱ्या प्रांतात वस्ती करावी. अखेर सगळी पृथ्वीमाताच पूर्णपणे मुक्त आहे. ज्याला जेथे रहावेसे वाटेल तेथे त्याने रहावे व ज्याला जेथे सेवा करावीशी वाटेल तेथे त्याने करावी. याप्रमाणे आम्ही विश्वाचे नागरिक बनू इच्छितो, व आर्थिक, सामाजिक व राजकीय भेद नाहीसे करू इच्छितो. जमीन कमी असो की जास्त असो, ती परमेश्वराची देणगी आहे. आम्ही तिचे मालक बनू शकत नाही. हिंदुस्थानचे लोक हे हिंदुस्थानचे मालक, व जर्मनीचे लोक हे जर्मनीचे मालक, ही विचारसरणीच चुकीची आहे. या जगातील सारी हवा, सारे पाणी, सगळा प्रकाश, व सर्व जमीन; ही सगळी सर्वांच्या मालकीची आहेत. हीच साम्ययोगाची व्यापक दृष्टी आहे.



# सर्वोदयात सर्वांचे हित

आपल्याला पश्चिमेकडून पुष्कळ गोष्टी शिकावयाच्या आहेत. विशेषतः विज्ञान शिकावयाचे आहे. परंतु समाजशास्त्राच्या बाबतीत मात्र आम्हाला त्यांच्याकडून पार कमी शिकावयाचे आहे. तसे पाहिल्यास समाजशास्त्राच्या बाबतीतही पाश्चिमात्यांच्या भाषेत पुष्कळ साहित्य लिहिलेले आहे. परंतु आमची संस्कृतीच निराळी आहे. भारतीय संस्कृतीचे वैशिष्ट्य संयम हे आहे. ज्यांनी आपल्या इंद्रियांवर प्रभुत्व मिळविले त्यांची प्रज्ञा स्थिर आहे, हे आपण स्थितप्रज्ञाच्या लक्षणांत ऐकले आहे. हे फक्त येथील धर्मशास्त्रानेच नव्हे तर राजनीती शास्त्रानेही सांगितले आहे. 'प्रजेची मुख्य शक्ती इंद्रियनिग्रह आहे' असे कौटिल्याने लिहिले आहे. कौटिल्य हा धर्मशास्त्राचा लेखक नाही. तो एक अर्थशास्त्रज्ञ आणि राजनीतीशास्त्रज्ञ होता. संयमाने समाज बनतो आणि ज्या समाजात लोक संयम राखीत नाहीत तेथे समाजात फूट पडते, हे यातील तथ्य आहे.

## प्रायवेट आणि पब्लिक सेक्टरचा वाद

आज सर्वच समाजवादाच्या गोष्टी करतात. आम्हाला समाजवादी समाजरचना केली पाहिजे असे काँग्रेस म्हणते. ही फार आनंदाची गोष्ट आहे. परंतु प्रत्येक व्यक्ती संयमशील होते तेव्हा समाजवाद बनतो. जेथे समाजवादातील प्रत्येक मनुष्य स्वतःला समाजाहून भिन्न समजतो तेथे समाजवाद साकार होऊ शकत नाही. 'समाजदेवो भव' मानणाऱ्या व्यक्तीच समाजवादी होऊ शकतात. मला आपली सर्व शक्ती समाजाला समर्पित करावयाची आहे असे प्रत्येक व्यक्ती मानील तेव्हा समाजवाद होऊ शकतो.

आजकाल देशासाठी आर्थिक योजना तयार करण्याची खूप चर्चा चालू आहे. प्रायवेट आणि पब्लिक सेक्टर यांना किती किती महत्त्व देण्यात यावे, किती कामे समाजाच्या हाती आणि किती व्यक्तीच्या हाती द्यावी; याबद्दल तेथे भांडणे चालली आहेत. किती कामे बोटांनी आणि किती हातांनी करावी असा प्रश्न आहे. जनतेच्या हाती अधिक काम दिले तर भांडवलदार घाबरतात आणि व्यक्तीच्या हाती अधिक काम दिले तर समाजवादी घाबरतात. मग दोघांत तडजोडीची भाषा सुरू होते. प्रायवेट सेक्टरमध्ये ५०टक्के आणि पब्लिक सेक्टरमध्ये ५० टक्के शक्ती लागावी असे बोलले जाते. नंतर व्यक्तीच्या हातून हळूहळू काम कमी करीत करीत समाजाचा हिस्सा वाढवीत असावे म्हणजे शेवटी व्यक्तीचा हिस्सा शून्य होऊन समाजाचा १०० टक्के होईल.

## सर्वोदयाची योजना

सर्वोदयाची योजना काय आहे, असे लोक विचारतात. आम्ही सांगतो, सर्वोदयात व्यक्तीच्या हाती शेकडा शंभर आणि समाजाच्या हातीही शेकडा शंभर शक्ती ठेवण्याची व्यवस्था आहे. दोन्ही मिळून शंभर! हे आमचे सर्वोदय गणित आहे. हे युनिवर्सिटीत शिकविले जात नाही. ज्याप्रमाणे कुटुंबात प्रत्येक व्यक्तीच्या हाती शेकडा शंभर शक्ती असते - बाप, मुलगा आणि आई यांच्या सत्तेत वाटणी होत नाही, कुटुंबातील व्यक्ती आणि कुटुंब यांच्या दरम्यान काही भेद नसतो, तद्वत व्यक्ती आणि समाज यांत काही भेद नाही. हा भारतीय संस्कृतीचा विचार आहे. व्यक्ती आपली सर्व सेवा समाजाच्या स्वाधीन

अनुक्रमणिका

करील आणि समाजही प्रत्येक व्यक्तीला पूर्ण स्वातंत्र्य देईल. त्यांच्या विकासाची संपूर्ण योजना समाजात असेल. हीच सर्वोदय योजना आहे. येथे 'ग्रेटेस्ट गुड ऑफ दि ग्रेटेस्ट नंबर' अधिकातल्या अधिकांचे अधिकाधिक भले करणे, हा दृष्टिकोन चालत नाही. येथे 'सर्वभूतहिते रताः' हा कार्यक्रम आहे. आम्ही भिन्न भिन्न व्यक्तीत विरोध निर्माण करून समाजरचना करू इच्छित नाही. 'सा रे ग म प ध नी सा' हे सात स्वर असूनही यात काही विरोध नाही. सर्वांचा योग्य उपयोग करून आम्हाला उत्तम संगीताचा लाभ होतो. क ख ग घ या वर्णांत काही विरोध नाही. सर्व मिळून उत्तम साहित्य आणि ग्रंथ तयार होतात. षड्रसांत काही विरोध नसतो. सर्व मिळून उत्तम भोजन तयार होते. योजना करण्याची कुशलता आमच्यात असली पाहिजे. कुशलतेने योजना केली तर समाजाला प्रत्येक व्यक्तीची सेवा मिळेल. परंतु आम्ही पाश्चिमात्त्यांचे समाजशास्त्र आणि राजनीतीशास्त्र स्वीकारले आहे. म्हणून मेजॉरिटी - बहुसंख्यांक आणि माइनॉरिटी - अल्पसंख्यांकांचेच प्रश्न उभे राहिले आहेत. परिणामतः सर्व जगात नवीन जाती उभ्या राहिल्या आहेत. सर्व मिळून काही ठरविण्याची सोयच राहिली नाही.

### पाश्चिमात्त्यांची सदोष चिंतनपद्धती

पश्चिमेकडून आणलेले समाजशास्त्र आणि राज्यनीतीशास्त्र यांचा हा परिणाम आहे. त्यात समाजाला सेवा कशी अर्पण करावी याऐवजी समाजावर वजन कसे टाकावे याचाच विचार होत असतो. यांत चिंतन कर्तव्यप्रधान नसून हक्कप्रधान आहे. एक मजेदार गोष्ट आपल्याला सांगतो. आपल्या संस्कृत भाषेत हक्कासाठी काही शब्दच नाही. हक्क शब्दाचा अनुवाद अधिकार असा करण्यात येतो. परंतु संस्कृतात अधिकाराचा अर्थ कर्तव्य असा आहे. 'मनुष्याधिकारं कर्म' म्हणून संस्कृतचा अधिकार शब्द कर्तव्यवाचक आहे. आमच्याकडे कुटुंबात आई, वडील, मुले यांच्या हक्कांचा विचार करण्यात येत नाही. त्यांच्या कर्तव्यांचा विचार करण्यात येतो. आमची भारतीय चिंतनपद्धती हीच आहे. याउलट पश्चिमेकडून आलेल्या पद्धतीमुळे परस्परविरोधी हितसंबंध तयार होतात. परिणामतः आज गुरुशिष्यांचे हितसंबंध परस्परविरुद्ध होऊ लागले आहेत. विद्यार्थ्यांच्या आपल्या गुरूविरुद्ध फेडरेशन सारख्या संस्था बनतात. अखिल भारतीय विद्यार्थी संघ तर तयार झाला. आता अखिल भारत बेटा संघच व्हावयाचा राहिला आहे.

अशा प्रकारे पश्चिमेकडील या चिंतनाने आमच्या देशांचे तुकडे तुकडे होऊ लागले आहेत. 'सर्व समाज एक कुटुंब आहे' ही भावनाच आम्ही विसरून गेलो आहोत. जुन्या काळात जातिभेद होते, त्यांच्या जोडीला आता वर्गभेदही आला. पूर्वी कुंभार, चांभार, तेली इत्यादींच्या हितसंबंधात विरोध नव्हता. त्यांची परस्परांत स्पर्धा होऊ नये, अशी योजना होती. परंतु आज जातिजातींत उच्चनीचतेची भावना आली. त्यामुळे हिंदुस्थानात भेद वाढतच राहण्यात त्यांची परिणती झाली आहे.

### भूदानात भारतीयतेचा गुण

सर्वोदय समाजरचना वेगळ्याच प्रकारची आहे. आमचा एकच भारतीय धर्म आहे. आम्ही सर्व जगाची आमच्या पद्धतीने सेवा करू इच्छितो. आम्ही जगाला लुटू इच्छित नाही. आणि जगाकडून स्वतःला लुटवूही इच्छित नाही. बाहेरच्या सर्व देशांना स्वातंत्र्य असावे आणि आमच्या देशालाही स्वातंत्र्य असावे, यासाठी आमचे प्रयत्न असतील. एकाच्या स्वातंत्र्याचा दुसऱ्याच्या स्वातंत्र्याशी विरोध असू शकत नाही. असा समाज कर्तव्यप्रधान असेल आणि त्याचा आधार संयम आणि जितेंद्रियता असेल. त्यांत प्रत्येक व्यक्ती आपली सर्व सेवा समाजाला समर्पण करण्यासाठी नित्य उत्सुक असेल.

आम्ही जनतेला भोग नव्हे तर त्याग करायला शिकवतो. म्हणून आमचे हे भूदान-आंदोलन इतके लोकप्रिय झाले आहे. ही काही क्षुल्लक घटना नव्हे. हिंदुस्थानच्याच नव्हे तर जगाच्या इतिहासात कधी चार लाख लोकांनी भूमिदान दिलेले नाही. या घटनेने साऱ्या जगाचे ध्यान आकर्षित केले आहे. कोठल्याही प्रकारची जबरदस्ती या कामी करण्यात आली नाही. प्रेमाने विचार समजावण्यात आला आणि इतके दान मिळाले. दान देण्याला नकार देणारा एकही इसम आम्हाला अद्याप भेटला नाही. 'मी दान देऊ शकत नाही' असे मोहामुळे कोणी म्हटले असेल परंतु 'दान देणे उचित आहे' हे सर्वच मानतात. मोह जाण्यालाही काही वेळ लागणारच. परंतु जेथे आम्ही गेलो तेथे तेथे जनतेने आमचे म्हणणे शांतीने आणि उत्साहाने ऐकले. भारतीयता म्हणून काही वस्तू आहे आणि तिचा गुण या आंदोलनात प्रकट होत आहे, हेच याचे कारण




आहे. या कार्यात तरुणांना फार उत्साह वाटला पाहिजे, असे आम्हाला वाटते, कारण ज्या जीवनात त्यागाला जागा नाही, ते जीवन नीरस असते.

### कम्युनिस्टांचे वीस एकरांचे सीलिंग

कायद्याने जमिनीचा प्रश्न सोडविण्यास आम्हाला सांगतात. मी कधी निवडणुकीला उभा राहिलो नाही. आणि राहणारही नाही असे मी सांगतो. निवडणुकीच्या वेळीही गंगेच्या प्रवाहाप्रमाणे आमची पदयात्रा चालू राहिली. अशा प्रकारे आमचा निवडणुकीशी काही संबंध आला नाही. पण तुम्ही सरकार निवडले आहे. त्याच्याकडून तुम्ही कायदा करवून घेऊ इच्छित असाल, तर करवून घ्या. आम्ही तुम्हाला अडवीत नाही. परंतु सरकार काय करू शकते? सध्या तर राज्य काँग्रेसच्या हातात आहे, परंतु समजा गरिबांचे कैवारी समजले जाणाऱ्या कम्युनिस्टांचे उद्या राज्य आले तर तेही वीस एकर बागाईत जमिनीचे सीलिंग असावे असे म्हणतात. गोदावरी-कृष्णाकाठच्या वीस एकर जमिनीचा अर्थ आहे एक लाख रुपयांची मिळकत. या 'सीलिंग' ने गरिबांना काय मिळेल याचा आपण विचार करावा. परंतु विनोबा म्हणतो, जसे हवा, पाणी, सूर्यप्रकाश यांचा कुणी मालक नाही, तसा जमिनीचाही कुणी मालक असू शकत नाही. म्हणून शेती करू इच्छिणाऱ्या गावांतील सर्व लोकांना जमीन मिळाली पाहिजे. या सर्वांना देऊन काही उरली तर मग कोणाजवळ दोन-चार एकर जास्त राहिली तरी हरकत नाही.

वास्तविक, भूमी आमची माता आहे आणि आम्ही तिचे सेवक आहो. त्याऐवजी आम्ही जमिनीचे मालक झालो तर तो अधर्म आहे. परंतु सांप्रत हेच चालले आहे. नंतर लोकांनी पैशासाठी जमिनी विकावयाला सुरुवात केली त्यामुळे जमीन सावकार आणि व्यापारी यांच्या हातात गेली. जमिनीची किंमत ठरू लागली. वस्तुतः जमीन खरेदी विक्रीची वस्तू नाही. तिची किंमत पैशाने ठरत नाही. येथील जमीन फार महाग आहे, पाच हजार रुपये एकर जमिनीचा येथे भाव आहे, असे आम्हाला सांगण्यात येते. परंतु या प्रकारे जमिनीची किंमत करणे चूक आहे. तुम्ही तुमच्या आईची अशा प्रकारे किंमत लावता काय? महाराष्ट्रात आईची जितकी किंमत आहे त्यापेक्षा अधिक किंमत आमच्या आईची आहे, कारण महाराष्ट्राची आई कुरूप आहे आणि आमची आई सुंदर आहे. अशा प्रकारे जी मुले आपल्या आईची किंमत रुपयांत करीत असतील ते आपल्या आईची काय सेवा करणार? आई कुरूप असो अथवा सुरूप, तिची किंमत रुपया पैशात होऊ शकत नाही. ती अमूल्य आहे. तिचे प्रेम कुरूप नसते. रूप पाहून तिची किंमत करण्यात येत नाही. म्हणून जमिनीत पीक कमी निघो अथवा अधिक ती आमची आई आहे आणि ती अमूल्य आहे.



## साम्ययोगाचा अर्थ-विचार

आर्थिक समता हा साम्ययोगी समाजाचा एक महत्त्वाचा पैलू आहे. अहिंसक समाजरचनेसाठी शोषणमुक्ती अनिवार्य आहे.

समाजात हित-विरोधी निर्माण होतात, तेव्हा शोषण होते. वास्तविक समाजात परस्पर-विरोध नाहीतच. हितसाम्य हा सर्वोदयाचा सिद्धांत आहे. हित-विरोधी नष्ट करून आम्हाला साम्ययोगाच्या दिशेने जावयाचे आहे.

सर्वोदय-विचारातील साम्याला हाताच्या पाच बोटांची उपमा देता येईल. हाताची बोटे अगदी समान नसतात आणि फार जास्त असमानताही त्यांच्यात नसते. तेवढी असमानता समाजात राहू शकेल.

सर्वांचे पोट भरले पाहिजे. हा सर्वांचा अधिकार आहे. मात्र पेटी भरण्याचा कोणालाही अधिकार नाही. याचा अर्थ असा नाही की आम्हाला संपत्ती नको. संपत्ती अवश्य असावी. परंतु ती घरात नको, तर समाजात असावी. कबीराने म्हटले आहे -

पानी बाढ़ो नाव में, घर में बाढ़ो दाम<br>
दोनों हाथ उलीचिये, यही सयानो काम।

घरात संपत्ती वाढू लागली तर धोका आहे. अशा परिस्थितीत संपत्तीच्या वाटपाशिवाय तरोणोपाय नाही.

### लक्ष्मी आणि पैसा

वास्तविक संपत्ती म्हणजे काय हे देखील समजून

अनुक्रमणिका

घेण्याची गरज आहे. नाशिकच्या छापखान्यात छापल्या जाणाऱ्या नोटा म्हणजे लक्ष्मी नव्हे. तो पैसा तर लफंगा आहे. तो आज एक बोलतो, तर उद्या दुसरे काही बोलतो. त्याचे मूल्य घटत-वाढत राहते. लक्ष्मीचे मूल्य तेच राहते. एक शेर धान्यात पूर्वी होती तेवढीच शक्ती आजही आहे. परंतु रुपयाचे मूल्य कमी होत चालले आहे. खरी 'श्री' तीच, जी श्रमाद्वारे शेतात पैदा होते. वित्ताला द्रव्यही म्हणतात. द्रव्य म्हणजे वाहणारे. वित्त द्रव्य बनेल तेव्हाच ते निर्मळ आणि स्वच्छ राहील. सामाजिक दु:खांच्या निवारणासाठी वित्ताने द्रव्य बनले पाहिजे, आणि शेतात श्री निर्माण करण्यासाठी सर्वांनी शक्ती लावली पाहिजे.

### पैशाचे भ्रमजाल

साम्ययोगी समाजात संग्रहाचेही एक शास्त्र असेल. निरुपयोगी वस्तूंचा संग्रह तेथे होणार नाही, केवळ लक्ष्मीचाच संग्रह होईल. पैसा लक्ष्मी नसून पिशाच्च आहे. तो कमीत कमी राहील. आंबे, केळी, भाज्या, धान्य, दूध - हीच खरी लक्ष्मी. बंदूक दाखवून एखाद्याची वस्तू घेऊन जाणे ही जशी चोरी, तशीच नोट दाखवून वस्तू घेऊन जाणे हीदेखील चोरीच. पैसा हे राक्षसांचे अवजार आहे. लक्ष्मी देवता आहे. 'उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मी:' - उद्योग करणाऱ्यांना लक्ष्मी मिळते. 'कराग्रे वसते लक्ष्मी' - लक्ष्मी हाताच्या बोटांत असते. हातांनी परिश्रम केल्याने लक्ष्मी प्राप्त होते.

पैशाने चोरी सुलभ होते. शहरवाल्यांनी खेड्यांना लुटण्यासाठी पैशाचे भ्रमजाल उभे केले आहे. खेड्यांत सर्व गोष्टी निर्माण होतात आणि शहरवाले कागदाचे कपटे देऊन त्या घेऊन जातात.

### अर्थशुद्धीची गरज

संपत्तीला इंग्रजीत 'प्रॉपर्टी' म्हणतात. अर्थात जी प्रॉपर आहे तीच प्रॉपर्टी असू शकते. आमच्या शास्त्रात इतर शुद्धीप्रमाणे अर्थशुद्धीही सांगितली आहे. जोपर्यंत व्यवहारशुद्धी होत नाही, तोपर्यंत आध्यात्मिकता अपूर्णच राहते. अस्तेय आणि अपरिग्रह मिळून अर्थशुचित्व पूर्ण होते. सत्य आणि अहिंसेचा आर्थिक क्षेत्रात आविर्भाव अस्तेय व अपरिग्रहाच्या द्वारेच होऊ शकतो.

### योजनेची दिशा

समाजात अपरिग्रह असावा अशी आमची इच्छा आहे. अपरिग्रह म्हणजे दारिद्र्य नव्हे, अपरिग्रह म्हणजे क्रमयुक्त संग्रह. संग्रहाचा क्रम खालीलप्रमाणे असला पाहिजे. १. उत्तम अन्न, २. पुरेसा कपडा, ३. चांगली घरे, ४. काम करण्यासाठी अवजारे, ५. ज्ञानाची साधने, आणि ६. संगीतादि मनोरंजनाची साधने.

सर्वांच्या प्राथमिक गरजांची पूर्ती झाली पाहिजे. ज्यांना मदतीची सर्वाधिक गरज आहे, त्यांना प्रथम मदत मिळाली पाहिजे. गांधीजी नेहमी असाच विचार करीत. यातूनच चरख्याचा उद्भव झाला. खादी-ग्रामोद्योग हे गांधीजींचे क्रांत-दर्शन आहे.

साम्ययोगी समाजात सर्वजण उत्पादक परिश्रमात भाग घेतील. शारीरिक आणि बौद्धिक श्रमाचे मूल्य समान राहील. सर्वांना काम आणि सर्वांना भाकर मिळेल. यासाठी गावात निर्माण होणाऱ्या कच्च्या मालाचे गावातच पक्क्या मालात रूपांतर करून क्षेत्रीय स्वावलंबन साधावे लागेल.

### ट्रस्टीशिपचा विचार

गांधीजींनी ट्रस्टीशिपचा क्रांतिकारी विचार दिला. हा एक व्यापक विचार आहे. तो जीवनाच्या सर्व अंगोपांगांना स्पर्श करतो. हा विचार फक्त भांडवलदारांकरिता नाही. भांडवल, व्याज, भाडे, नफा इत्यादीपुरता हा विचार सीमित नाही. आज भांडवलदार व मजूर दोघेही आपापल्यापुरते पाहतात. स्वार्थाचा संघर्ष होतो. मजुरांमध्ये जेव्हा बंधुभाव, सामाजिक जाणीव, एकमेकांसाठी त्याग करायची तयारी, या गोष्टी विकसित होतील तेव्हाच खरी क्रांती होऊ शकेल. शोषणात सहकार्य मुळीच दिले जाऊ नये.

मोठमोठे उद्योग चार-दोन लोकांच्या हाती असण्यात धोका आहे. खाजगी मालकीमुळे मालकांना प्रेरणा मिळेल असे मानणे हा अधर्म-विचार आहे. जमीन जशी गावाच्या मालकीची असावी, तसेच मोठ्या उद्योगांचे राष्ट्रीयीकरण झाले पाहिजे.

आपल्यापाशी जे काही आहे ते समाजासाठी आहे हा विचार पसरेल तेव्हा सर्वांच्या बुद्धीचा लाभ देशाला होईल. म्हणून उद्योगपतींनी पुढे सरून ट्रस्टी बनले पाहिजे.

विश्वासशक्तीशिवाय साम्ययोगाची स्थापना होऊ शकत नाही. समाजाच्या विविध घटकांमध्ये परस्परविश्वास

असायला हवा. 'ट्रस्ट'साठी संस्कृत शब्द आहे विश्वास; ट्रस्टीशिप म्हणजे विश्वस्तवृत्ती. ट्रस्टीशिपच्या विचारात संपूर्ण वैचारिक क्रांती निहीत आहे. आपली सारी शक्ती समाजाला समर्पित करून आपल्या आवश्यकतेपुरतेच समाजाकडून घेणे म्हणजेच साम्ययोग.

### ग्रामीण अर्थनीती

भारत कृषिप्रधान देश आहे. या देशाची अर्थनीती प्रामुख्याने ग्रामीण अर्थनीतीच राहणार. शेतीसाठी खेडी अनिवार्य आहेत. खेडी राहणारच हे लक्षात ठेवून उद्योगांबद्दल विचार करावा लागेल.

साम्ययोगाची अर्थनीती मुख्यतः ग्रामीण अर्थनीती असेल. तीही कृष्णाची अर्थनीती. याचा अर्थ हा की खेड्याच्या प्राथमिक गरजांची पूर्ती खेड्यातच व्हावी. त्यासाठी खेड्याला परावलंबी व्हावे लागू नये. लोणी विकून मथुरेतून पैसा आणण्याची नीती कृष्णाला मान्य नव्हती.

सर्वांना काम द्यायचे असेल तर ग्रामोद्योगांशिवाय दुसरा उपाय नाही. याबाबतीत उधारी चालू शकत नाही. भुकेलेल्याला आजच खायला मिळाले पाहिजे. तेसुद्धा केवळ शरीर टिकून राहण्यापुरते नव्हे. मानवी मूल्ये कायम राहणे महत्त्वाचे आहे. मनुष्याला दीन बनवले जाऊ नये. बेकारी-भत्ता देणे नैतिक दृष्टीने हानिकारक आहे. म्हणून गावागावात उद्योग उभे झाले पाहिजेत. गावात निर्माण होणाऱ्या कच्च्या मालापासून गावातच पक्का माल बनला पाहिजे.

### यंत्रविवेकाचे स्वरूप

आज विज्ञानयुग आहे. नवनवी यंत्रे निर्माण होत आहेत. स्वाभाविकच प्रश्न निर्माण होतो की सर्वोदयाचा यंत्रांना विरोध आहे काय?

याबाबतीत एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे - यंत्र वेगळे आणि विज्ञान वेगळे. विज्ञानाचे तर सदैव स्वागतच आहे. परंतु यंत्रांच्या बाबतीत विवेक करावा लागेल.

यंत्रे तीन प्रकारची असतात. संहारक यंत्रे, समय-साधक यंत्रे आणि उत्पादक यंत्रे.

संहारक यंत्रे म्हणजे मशीनगन्स, तोफा इत्यादी. अशा संहारक यंत्रांना सर्वोदयात मुळीच स्थान नाही. त्यांना सर्वथा विरोधच आहे.

समयसाधक यंत्रे म्हणजे मोटर, रेल्वे, विमान इत्यादी. ही यंत्रे आम्हाला मान्य आहेत. त्यांना विरोध नाही.

उत्पादकयंत्रे दोन प्रकारची असतात. एक प्रकार म्हणजे श्रमाची पूर्ती करणारी यंत्रे. हाताने जी कामे आपण करू शकत नाही, ती करण्यासाठी त्यांची मदत होते. त्यांना पूरकयंत्रे म्हणता येईल. हाताने सूत कांतता येत नाही, टकळी, चरखा यांच्या मदतीने कातता येते. अशा पूरक यंत्रांचे आम्ही स्वागतच करतो.

मात्र काही यंत्रे जास्त उत्पादन करतात व मजुरांची जागा घेतात. अशी उत्पादक यंत्रे मारक आहेत. त्यांना सर्वोदयात स्थान असू शकत नाही.

कोणते यंत्र पूरक आहे आणि कोणते मारक आहे याचा निर्णय देशकाल परिस्थितीनुसार बदलेल. आजचे मारक उद्या पूरक यंत्र ठरू शकेल.



## साम्ययोग : समग्र व अविरोधी विचार

### श्रेष्ठ आदर्श

आपल्या जीवन-विचारांमध्ये संपत्तिमात्राला ईश्वरीय वस्तू मानण्यात आले आहे. 'ईशावास्यमिदं सर्वम्' हा मंत्र आपल्याला हाच आदर्श शिकवतो. महात्मा गांधींनीही या मंत्राचा महिमा गाईला आहे. हा आदर्श कम्युनिझमहून यत्किंचितही कमी नसून उलट श्रेष्ठतर आहे. आम्ही लक्ष्मीला ईश्वरच मानले आहे. लक्ष्मी आणि विष्णू यांना माता-पित्याप्रमाणे समजणे हा आमचा आदर्श आहे.

### साम्ययोगाचे अधिष्ठान

साम्ययोगात परमेश्वराशी योग आहे. याचा अर्थ आहे प्रत्येक गोष्टीला परमेश्वराशी जोडणे. 'सर्वत्र परमेश्वर आहे' असे मानून त्या आधारावर आम्ही समाजाची उभारणी करू इच्छितो. यालाच आत्मौपम्य म्हणतात. जी गोष्ट मला हवी असते ती सर्वांनाच मिळाली पाहिजे, हा आत्मौपम्याचा अर्थ आहे. तहान लागल्यावर कोणी पाणी पाजले तर बरे वाटते. भूक लागल्यावर कोणी खाऊ घातले तर बरे वाटते, म्हणून तहानलेल्याला पाणी पाजले पाहिजे, भुकेलेल्याला खाऊ



अनुक्रमणिका

घातले पाहिजे. आपल्याला हेच आत्मौपम्य. प्रत्येकाने अशी दृष्टी ठेवली तर पृथ्वीवर स्वर्ग अवतरेल.

जे लोक सुखी आहेत त्यांनी आम्ही सांगतो की तुमच्यासारखेच गरीब मजुरांनाही सुख हवे आहे. तुम्हाला सुखी रहायचे असेल तर तुम्ही त्यांनाही सुखी केले पाहिजे. हे तुमचे कर्तव्य आहे. या दृष्टीतून काम केले तर समाज सुखी होईल. या दृष्टीतूनच आम्ही हिंसेचा अस्वीकार करतो. साम्यवादी मात्र असे मानत नाहीत. एका मोठ्या वर्गाला नष्ट करायला हवे असे ते मानतात. आम्ही मात्र मानतो की आम्हाला जगायची इच्छा असते, म्हणून दुसऱ्यांनाही जगवले पाहिजे.

### आत्मवादावर आधार

समाजात समानता आणण्याच्या दृष्टीने आम्ही जे करीत आहोत ते पाहून वाटेल की आम्ही साम्यवाद्यांच्या बरेच जवळ आहोत. गरिबांची उन्नती व्हावी असे दोघांनाही वाटते. मात्र एक मोठा फरक आहे. साम्यवादी अनात्मवादी आहेत. त्यांच्या विचारात कोणतेही क्रांतिकारी तत्त्व नाही. त्यात शरीराला प्राधान्य दिले गेले आहे. मात्र आम्ही शरीराला प्राधान्य देत नाही. भौतिक वस्तू शरीराशी निगडित असतात. म्हणून त्या मूलभूत मानता येत नाहीत. मनुष्य एका वेगळ्या, उंच स्तरावर आहे. शरीराहून वेगळे असे त्याचे एक रूप आहे असे आम्ही मानतो. साम्ययोगाचा आधार यावरच आहे.

आत्मवादी असण्याचा हा अर्थ आहे की प्रत्येकाच्या हृदयात आत्मा आहे, म्हणून प्रत्येकाचे हृदयपरिवर्तन होऊ शकते यावर आमचा विश्वास आहे. प्रत्येकात आत्मा आहे असा विश्वास असेल तरच हृदय-परिवर्तन , विचार-परिवर्तन आणि या दोहोंच्या आधाराने परिस्थिती-परिवर्तन, ही त्रिकोणात्मक प्रक्रिया टिकेल.

### मूल्य-परिवर्तन

सर्व संपत्ती समाजाची आहे हा विचार व्यक्तिगत संपत्तीच्या तत्त्वाच्या विरुद्ध आहे, म्हणून संविधानाच्या विरुद्ध आहे असे काही लोकांना वाटते. जणू काही संविधान परमेश्वराने बनवले आहे. चोर शिरजोर झाला की त्याला समाजात प्रतिष्ठा मिळते. मामुली चोऱ्या करणाऱ्याला तुरुंगात टाकले जाते आणि दिवसा-उजेडी दरोडे घालणाऱ्यांची लूटमार समाजाला जाणवत नाही. ही मूल्ये आम्हाला बदलायची आहेत. साम्यवादीही याला चोरी समजतात आणि श्रीमंतांना चोर म्हणतात. परंतु चोरांचे अपहरण ते चोरी करूनच करतात. ही पद्धती चुकीची आहे. चोरांचा सामना चोरीने करणे योग्य नाही. परशुरामानेही असला प्रयोग केला होता. त्याने एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय करण्याचा प्रयत्न केला. परंतु पृथ्वी काही निःक्षत्रिय झाली नाही. याचे कारण हे की स्वतः परशुरामच कृतीने क्षत्रिय बनले. मग ते क्षत्रियांना नष्ट कसे करू शकणार? आज साम्यवादी चोरीने चोरी आणि हिंसेने हिंसा नष्ट करू पाहतात. पण यामुळे चोरी व हिंसा वाढतातच.

आम्ही तर म्हणतो की जुनी मूल्ये तुम्ही क्षणार्धात नष्ट करू शकता.

श्रीमंतांजवळ असे आहे तरी काय की जे हिसकावून घेण्याची इच्छा करावी? त्या कागदाच्या कपट्यांची, हिरेमोत्यांची काय किंमत आहे? सर्व काही तर शेतकऱ्यांपाशीच आहे. तेच खरे श्रीमंत आहेत.

साम्यवाद्यांच्या हे लक्षात येत नाही. आणि चोरीने चोरी नष्ट करण्याच्या दुश्चक्रात ते अडकतात. वाईट कामे चांगल्या हेतूने केली असली तरी ती जर त्यामुळे चांगली मानली तर वाईट कामांना प्रतिष्ठा मिळते.

आम्हाला जुनी मूल्ये बदलायची आहेत. आम्ही केवळ चोरीलाच पाप मानत नाही, तर अधिक संग्रहालाही पाप मानतो. या तऱ्हेने चोरीचे कारणच आम्ही नाहीसे करतो, कारण संग्रहामुळेच चोरीची प्रेरणा होते. अशा प्रकारे नवी मूल्ये आम्हाला स्थापन करावयाची आहेत.

### दोन एकांगी प्रयत्न

जगात ईश्वराच्या राज्याची स्थापना करावयाची आहे ही घोषणा दोन हजार वर्षांपूर्वी येशू ख्रिस्ताने केली. त्यापूर्वीही हा विचार मांडण्यात आला होता. त्याला 'धर्मराज्य' म्हटले गेले होते.

काही लोक म्हणाले की ईश्वराचे राज्य तुमच्या आंतच आहे. (किंगडम ऑफ गॉड इज विदिन यू.) याचा अर्थ असा नाही की ईश्वर आतच आहे, बाहेर नाही. मात्र ईश्वर आत असेल तरच बाहेर येऊ शकतो, म्हणून जगात ईश्वराला आणायचे असेल तर आधी त्याला आपल्या आत आणावे लागेल. असा विचार त्यांनी मांडला. चित्तशुद्धी झाली तर हे काम सुलभ होईल.

अनुक्रमणिका

ईश्वराच्या राज्याची आपल्या आत स्थापना करण्याचा प्रयत्न करणारे लोक बाहेरच्या परिस्थितीबाबत उदासीन राहिले. परंतु बाहेर दुसऱ्या कोणाचे राज्य असेल तर आत येशूचे राज्य येणे संभवत नाही. त्या लोकांचा प्रयत्न एकांगी होता. बाह्य परिस्थिती बिघडलेली असली तरी आतल्या परिस्थितीत फरक पडत नाही असे त्यांनी मानले. याउलट, बाह्य परिस्थिती सुधारावी अशी इच्छा असली पण हृदयशुद्धीचा प्रयत्न केला नाही तरीही उपयोग नसतो. साम्यवादी बाह्य परिस्थिती बदलण्याचा प्रयत्न करतात. लक्ष्मी, सरस्वती आणि शक्ती या तीन देवी तर आहेतच, साम्यवाद्यांनी 'व्यवस्था' नावाच्या आणखी एका देवीची भक्ती सुरू केली आहे! त्यांना हृदय बदलण्याची गरज वाटत नाही. बाह्यव्यवस्था तेवढी बदलली म्हणजे झाले! असा हा एकांगी विचार आहे. एकीकडे धर्मसंस्थावाले केवळ अंतःशुद्धीकडे लक्ष देतात तर दुसरीकडे साम्यवादी केवळ बाह्य परिस्थितीकडे लक्ष देतात.

### सर्वोदयाचा सर्वांगीण प्रयत्न

हे दोन्ही प्रयत्न एकांगी आहेत आणि त्यांच्यात परस्परविरोध आहे. खरे म्हणजे दोहोंची युती व्हायला हवी होती. त्यांनी एकत्र येऊन काम करायला हवे होते. परंतु एक अंतःशुद्धीच्या कामात लागला आणि दुसरा बाह्यशुद्धीच्या. आणि दोघेही एकमेकांच्या विरोधात उभे राहिले. सर्वोदय या दोघांच्या मधे उभा आहे. त्याला दोन्ही गोष्टी हव्या आहेत. म्हणून दोन्ही बाजूंची टीका त्याला सहन करावी लागत आहे.

मदुराई जिल्ह्यात आम्हाला काही ग्रामदाने मिळाली, तेव्हा आम्ही म्हटले की नवनिर्माणाच्या दृष्टीने काही गावे कॉंग्रेसवाल्यांना देऊ. काही समाजवाद्यांना देऊ, काही साम्यवाद्यांना देऊ आणि सांगू की आता बनवा तुमच्या योजना. साम्यवाद्यांचे मी नाव घेतल्याबरोबर लोक घाबरले व म्हणू लागले की, 'साम्यवाद्यांच्या हाती ग्रामदान सोपवले तर ते देवाला खतम करतील.' साम्यवाद्यांचे नाव घेतल्याबरोबर लोक घाबरतात!

दुसरीकडे आम्ही जेव्हा परमेश्वराचे नाव घेऊन सांगतो की, 'जमीन ईश्वराची आहे', तेव्हा साम्यवादी म्हणतात, 'हा ईश्वर कोठून आणला? तुम्ही लोकांना अर्थशास्त्राचा विचार समजावून सांगत नाही आणि लोकांमधल्या भक्ती व श्रद्धेच्या भावनेचे शोषण करता.'

अशा रीतीने दोन्हीकडून आम्हाला प्रहार सहन करावे लागतात! परंतु सर्वोदयासाठी हा गौरवाचा विषय आहे. आम्ही जाणतो की दोघांचेही उद्देश चांगले आहेत, मात्र दोघेही एकांगी आहेत. म्हणून दोघेही टिकाव धरू शकणार नाहीत. अंतःशुद्धी आणि बाह्य परिस्थिती बदलण्याचा प्रयत्न या दोन्ही गोष्टी एकाच वेळी एकत्रितपणे झाल्या पाहिजेत. यासाठी आत्मज्ञान आणि विज्ञानाची मदत मिळू शकते. त्यांच्या मदतीने सर्वांगीण विकास साधणे, म्हणजेच सर्वोदय.

### अविरोधी दृष्टी

आपल्या येथे आत्म्याचा विचार अखंड चालत आला आहे. हा प्रवाह कधीच खंडित होऊ शकत नाही. म्हणून साम्ययोगाच्या व्यवस्थेसाठी कृत्रिम उपायांची गरज भासण्याचे कारण नाही. जेव्हा तत्त्वज्ञान बळकट असते, तेव्हा समाजशास्त्र, राजकारण, आर्थिक धोरण इत्यादी सगळ्या गोष्टी तदनुकूल बनतात. आपली समस्या संघर्षाच्या तत्त्वांनी नव्हे, तर संग्रहाच्या तत्त्वांनी, अर्थात लोकसंग्रहाने, सुटू शकेल. जो सर्वांना संग्रहित करतो, कोणाला छिन्न-भिन्न होऊ देत नाही, तोच धर्म अशी गीतेची शिकवण आहे. म्हणून आमच्या सामाजिक सेवेच्या सफलतेचा आधार वर्गसंघर्ष नसून सर्वोदय आहे. आम्हाला सर्वांमध्ये अविरोध निर्माण करावयाचा आहे. साम्यवाद व्यक्तीची पर्वा करीत नाही, साम्ययोग व्यक्तीची उपेक्षा करू शकत नाही. जे साम्ययोग मानीत नाहीत, ते व्यक्ति-स्वातंत्र्यावरच विश्वास ठेवीत नाहीत. खोल विचार केला तर ध्यानात येईल की मनुष्याला आत्मविकास करण्याचे स्वातंत्र्य जोपर्यंत मिळत नाही, तोपर्यंत त्याला सुख कदापि लाभू शकत नाही.

### भांडवलवादाची प्रतिक्रिया नव्हे

साम्ययोग हा असा समग्र, सर्वांगीण जीवनविचार आहे. त्याचा कोणत्याही वादाशी विरोध नाही आणि कोणत्याही वादाचा तो परिपोषही करत नाही. तो कोणाच्याही प्रतिक्रियेतून जन्मलेला नाही.

एकदा आमच्या एका सहकाऱ्याने म्हटले की, विनोबांचे कार्य हा भांडवलशाहीशी लढण्याचा मोर्चाच आहे, भांडवलवादाशी त्यांचे वैर आहे. हे म्हणणे बरोबर आहे. पण पहिला भांडवलवादी शत्रू म्हणजे आपले शरीरच आहे. भांडवलवादी व्यवस्थेत ते वाढले आहे. त्याला काही सवयी जडलेल्या आहेत. त्या सोडाव्या लागतील. आपल्या हाताने






मॅ. यांनी टिळकांचेकडून जामीन मागितला, त्यासारखी भाषणे कायद्याच्याच दृष्टीने गर्ह्य नाहीत असे जर या खटल्याने जनतेच्या निदर्शनास आले आहे तर या खटल्याचा परिणाम हितकरच झाला असे म्हटले पाहिजे. टिळकांचा जामीन दूर केला या दृष्टीने जितके महत्त्व या निकालास आहे, त्यापेक्षाही कोणती भाषा, कोणते ध्येय, कोणते उपाय समोर ठेवून होमरूलची चळवळ कारणे साध्य आहे, हे या निकालाने प्रतिपादित केले, ही गोष्ट जास्त किंमतीची आहे. तसेच खऱ्या होमरूलच्या प्रतिपादनास अनुकूलता केवळ उघडपणे न दिली तरी आपण प्रतिकूल आहो असे सरकारकडूनही या कामी दाखविण्यात आले नाही, ही महत्त्वाची कामगिरी या खटल्याने घडवून आणली.

परंतु याहीपेक्षा विशेष महत्त्वाची एक गोष्ट या खटल्यात घडून आली. 'सरकार' या शब्दाची व्याख्या काही प्रसंगास अनुलक्षून पीनलकोडमध्ये घातली आहे. टिळकांचे भाषणांतील रोख असा होता की, अदृश्य शक्ती हे सरकार व तसेच त्यांचे मूर्त स्वरूप म्हणजे आपणांवर राज्य करणारे तक्तारूढ राजे व पार्लमेंट आणि तत्समान अधिकारी हे सरकार समजले जावेत; तदितर नोकरांत गणावे. परब्रह्म व माया यांचा दृष्टांत टिळक यांनी उदाहरणार्थ घेतला आहे. हिंदी जनतेच्या कल्पनेने सायुध सशक्तिक मूर्ती ईश्वररूप खरी; परंतु मूर्ती भंगली अगर हरवली म्हणून उपास्य दैवत नाहीसे झाले असे कधीही व कोणीही परम-भक्तही मानीत नाही. तद्वतच नोकरांपैकी एखादा नको म्हणणे अगर अमुक लक्षणाचा तो पाहिजे म्हणणे राजास दूषणात्मक नाही, असे सांगण्याचा कटाक्ष होता. प्रस्तुत हायकोर्टाचे ठरावांत राजदेवतेची अंगे म्हणजे विशिष्ट नोकरी ही देवताच समजावी व काही विशिष्ट नोकरीविषयीचे उद्‌गार हे राजनिष्ठापूर्वक असावे हे बरे, असे ध्वनित केले आहे. हा वादग्रस्त मुद्दा लवकरच कायदे-कौन्सिलपुढे येऊन त्याची छाननी झाली पाहिजे. तथापि हायकोर्टाचे ठरावांत, या खटल्यांत कायद्या संबंधाने विशेष नडीचे प्रश्न नसूनही, हकीकत - घडलेल्या गोष्टी - अगर लेखांचा अर्थ यांचीच छाननी होण्यासारख्या दर्ज्याचा हा खटला आहे असे समजण्यात आले आहे.

असे जरी असले तरी आणखी एका गोष्टीबद्दल प्रशंसापर उद्‌गार काढल्यावाचून राहवत नाही. रा. टिळक यांचे बोलल्याचा रोख सिव्हिल सर्व्हिसवर विशेष होता व आहे; व ना. न्या. सर एस. बॅचलर हे त्यामधील प्रस्तुतचे कामगारांपैकी श्रेष्ठतमांमधील एक आहेत असे असून, प्रत्यक्ष त्या सर्व्हिसबद्दल अस्पृहणीय उद्‌गार ज्या भाषणांत प्रसंगानुसार आले असे खुद्द ना. न्या. यांचे कयासास आले, त्या भाषणाबद्दल केवळ न्यायाच्या समतोल काट्याने परीक्षण व तोल करण्याचे नाजूक काम इतके चोख रीतीने न्यायमूर्तींनी केले, ही गोष्ट सर्व न्यायकोर्टास उदाहरण घालून देण्यासारखी झाली, यात संदेह नाही, म्हणूनच रा. टिळकांचाच नव्हे तर सर्व रयतेचा ब्रिटिश राज्याविषयीचा आदर वाढत्या प्रमाणावर आहे हे उघड आहे. ब्रिटिश सरकारच्या सहानुभूतीनेच आम्हास स्वराज्य मिळवावयाचे आहे असे राजनिष्ठ देशभक्तीचे उद्‌गार टिळकांचे भाषणातून निघाले, त्यालाही हा आदरच कारणीभूत असला पाहिजे.

एकंदरीत स्वराज्याचे (होमरूलचे) ध्येय, उपाय व परिभाषा ही एकसमयावच्छेदेकरून जगास कळविण्यास या खटल्याच्या साग्र व 'इथंभूत' इतिहासाचे अवलोकन साधनीभूत होईल. रा. टिळक यांस त्यांचे ६१ वे वाढदिवसासंबंधाने उद्याच एक लक्ष रुपये नजर केले जाणार आहेत, त्या अर्थी त्यांजकडून भरभक्कम रकमेचा जामीन मागण्यास सबळ कारण आहे, अशा अर्थाची फिर्यादी पक्षाची विनंती हास्योत्पादक दिसते. जामीनकीची रक्कम वाढविण्याचे कामी महाराष्ट्र व मध्यप्रांत यांनी प्रेमपुरस्सर टिळकांच्या देशभक्तीकरिता त्यांस केलेली नजर उपयोगात आणली जाईल, असे कोणाचे स्वप्नही नव्हते. तसेच ज्यादिवशी ही प्रेमाची नजर जनतेने करावयाची, त्याच दिवशी सकाळी ही करडी 'नजर' फिर्यादी पक्षाकडून झाली, हाही एक समय कवीने एका ठिकाणी वर्णिलेल्या उदयास्ताचे समयाची आठवण करून देणारा झाला. त्यातूनही सकाळी अशा प्रकारची 'नोटीस' दाखल झाली, तरी त्याची किंचितही छटा रा. टिळकांच्या एकंदर आचरणावर त्यादिवशी किंवा नंतर खटला चालू असता मुळीच नव्हती, याचे खरे कारण रा. टिळकांच्या मनात वसत असलेली ब्रिटिश न्यायप्रियतेवरील व अपण अंगीकारलेल्या ध्येयावरील श्रद्धा व मनाची खंबिरी ही होत यांत मुळीच संशय नाही.

लघुलेखनपद्धती अद्यापि पूर्णत्वास पोचली नाही. अर्थातच बोलण्याच्या ओघात जलद उच्चारलेली वाक्ये अगर उद्‌गारवाचक अथवा काक्वर्थी वाक्ये जशीच्यातशी उतरून घेणे अशक्य होते, अशा स्थितीत आक्षेपार्ह भाग तसेच आहेत




की कसे, हा प्रश्न उत्पन्न होतो. तथापि, रा. टिळक यांनी त्या सबबीचा अंगीकार प्रस्तुत कामी केलेला नाही हे ध्यानात ठेवण्यासारखे आहे. भाषांतरे क्वचित प्रसंगी हेलकाव्याची झाली आहेत, हे जरी खरे असले, तरी एखादे वाक्यावरून अगर शब्दावरून सर्व भाषणाचा परिणाम ठरविणे वाजवी नाही, हे हायकोर्टाचे निवाड्यातील तत्त्व अत्यंत महत्त्वाचे आहे. ज्या गृहस्थाने मूळ भाषांतर केले त्याहून कमी दर्जाच्या त्याच ऑफिसातील दुसऱ्या नोकराने त्याचे यथार्थत्व सिद्ध करण्यास कोर्टात यावे हा प्रकार ठीक वाटण्यासारखा नव्हता. भाषांतरावरून सदोषपण अगर निर्दोषपण ठरविण्याचा प्रघात जसजसा कमी होईल तसतसा न्यायकोर्टावरील प्रजेचा विश्वास जास्त जास्त वाढत जाईल.

हायकोर्टात तपासणी-अर्जाचे काम चालले त्या तारखेस सरकारचे बाजूने नामदार ॲडव्होकेट जनरल असून शिवाय बॅरिस्टर मि. बिनिंग, मि. स्ट्रॉंगमन व मि. पटवर्धन आणि सरकारचे नेहमीचे हायकोर्ट वकीलही होते, इतकेच नव्हे, तर पोलिस खात्यातील मि. गायडर हजर असून पुण्याचे सरकारी प्रासिक्यूटर खा. ब. दावर हेही होते. नामदार ॲडव्होकेट जनरल यांस सल्ल्याचे बळ इतक्या माणसांकडून का पाहिजे होते, हा प्रश्न मुग्ध आहे. पुढे केव्हातरी खुलासा होईल.

डि. मॅ. कोर्टात काम चालले त्यावेळी एक प्रकार साहजिक रीत्या घडला. रा. टिळक यांनी खटल्याचे उपयोगाकरिता आपल्या तिन्ही भाषणांच्या कोर्टातून खऱ्या करून घेतलेल्या नकला सोयीसाठी छापून काढल्या होत्या, त्यापैकी काही प्रती कोर्टाच्या नजरेस आल्या तेव्हा डि. मॅ. यांनी सूचनापर उद्‌गार काढले की जर ही भाषणे क. १०८ खाली येणारी आहेत, तर त्यांच्या प्रती वाटल्या न जातील अशी दक्षता ठेवावयास पाहिजे. त्या प्रसंगास जरूरीचे कायदेशीर उत्तर देतांना रा. केळकर यांनी कळविले की, न्यायकोर्टातील यथातथ्य हकीकत प्रसिद्ध करण्यामध्ये कायद्याचे उल्लंघन होत नाही. वास्तविक पाहता त्यापूर्वीच इतर म्हणजे क्रॉनिकलसारख्या वर्तमानपत्रांनी सदर भाषणांचा उद्धार केलेला होता.

खटल्यातील हकीकतीवरून ना. न्यायमूर्तींचे आदरपूर्वक आभार मानण्यात येतात, ते वास्तविक आहे हे जसे दिसून येते, तसेच हा खटला निर्भिडपणे व यथाशास्त्र कोर्टापुढे मांडण्यात ना. बॅरिस्टर जिना व रा. टिळकांचे मित्र व होमरूललीगचे प्रेसिडेंट बॅरिस्टर मि. बाप्टस्टा यांनी कौशल्य दाखविले, ते अनुकरणीय आहे हेही विसरता कामा नये.'

या सिंहावलोकनाचा शेवटचा परिच्छेद महत्त्वाचा आहे. डिस्ट्रिस्ट मॅजिस्ट्रेटने आपल्या निकालपत्रात अनुदार उद्‌गार काढले होते. काही वर्तमानपत्रांना लो. टिळकांचा उपहास करावयास त्यानी संधी मिळाली होती. हायकोर्टाच्या निर्णयानंतर त्यांना मुकाट्याने आपली भाषा बदलावी लागली.

टाइम्स ऑफ इंडियाने लिहिले -

'टिळकांच्या जामीनकीच्या खटल्यात डिस्ट्रीक्ट मॅजिस्ट्रेटने 'अप्रीती' शब्दाचा 'प्रीतीचा अभाव' असा अर्थ करण्यात मोठी चूक केली. इंग्रजी भाषेत Dosaffection अप्रीती याचा absence of affection प्रीतीचा अभाव असा अर्थ होत नाही. टिळकांच्या तीनही भाषणांचा परिणाम सरकारविरुद्ध अप्रीती उत्पन्न करण्यात होत नाही असे न्यायमूर्ती बॅचलर व शहा यांचे मत पडल्याने, मॅजिस्ट्रेटच्या निकालास अनुसरून आम्ही टिळकांवर ता. १५ ऑगस्टच्या अंकात जी टीका केली होती तीबद्दल आम्हास दिलगिरी वाटत असून आम्ही आमची ती टीका आता सपशेल परत घेतो.'

आपल्या सिंहावलोकनात दादासाहेब करंदीकर यांनी शेवटच्या परिच्छेदात कायदेपंडिताच्या दक्षतेने खालील विधान केले आहे.

'खटल्याचा निकाल सांगताना न्यायाधिश यांनी पक्षकारास (प्रसंगी आरोपीस) काही बोलावे की कसे, हा मुद्दा दृष्टिआड होण्यासारखा नाही. आपला ठराव पुढे वरिष्ठ कोर्टात फिरला तर आपले पक्षकारांस लागून बोलणे अगर समजावून सांगणे विद्रूप दिसते ही गोष्ट बरेच न्यायाधीश ध्यानात घेऊन वागल्यास नडीचा प्रसंग बहुतकरून टळेल.'

❖❖❖

(आपण सर्वांनीच - जनता, मिडिया, न्यायाधीश - यांनी या शेवटच्या परिच्छेदापासून योग्य तो बोध घेणे उचित होईल.

- देवदत्त दाभोलकर)

# सुसंवाद हवा : वितंडवाद नको

अमर्त्य सेन
(अनुवाद : सुमन दाभोलकर)

अर्वाचीन भारतात निधर्मी (इहवादी) राज्याची कल्पना स्वराज्यप्राप्तीनंतरच कायदेशीर-रीत्या प्रस्थापित झाली. आपल्या राज्यघटनेत निधर्मी विचारांच्या विविध छटा दिसून येतात.

निधर्मी किंवा इहवादी हा विचार दोन दृष्टिकोनांतून पाहता येतो. त्यापैकी पहिला दृष्टिकोन म्हणजे, विविध धर्मांविषयी तटस्थ दृष्टिकोन; व दुसरा म्हणजे धार्मिक संस्थांना (Associations) राज्य कारभारात मज्जाव. म्हणजेच व्यक्तिगत धार्मिक आचार, विचार कोणतेही असोत, त्या विचार-आचारांनुसार राज्यकारभारांतील कुठल्याही व्यवहारांत मांडणी करता येणार नाही. (हा विचार फ्रेंच राज्यघटनेत आहे). भारतातील निधर्मी आचार-विचारांचा तटस्थपणावर भर आहे, संपूर्ण बंदीवर नाही.

फ्रान्समधील बंदीविषयी अधिक सांगावयाचे झाले तर, नुकत्याच उत्पन्न झालेल्या प्रश्नाविषयी बोलता येईल. फ्रेंच असेंब्लीने असे ठरविले की, फ्रान्समधील मुस्लीम विद्यार्थिनींना डोक्यावर रुमाल बांधता येणार नाहीत, कारण त्यामुळे फ्रान्स हे निधर्मी राष्ट्र राहू शकत नाही. ही बंदी जर वेगळ्या कारणांसाठी घातली असती, उदाहरणार्थ, फक्त विद्यार्थिनींवर अशी बंदी घालणे म्हणजे विद्यार्थी विद्यार्थिनींत भेद करणे होय, आणि त्यामुळे बऱ्याच विद्यार्थिनींना ते मान्य होत नाही; किंवा विद्यार्थिनी, विशेषतः लहान वयाच्या विद्यार्थिनी घरातील वडील मंडळींच्या जुलुमाला बळी पडतात, आणि कुठला ड्रेस घालावा व कुठला घालू नये याविषयी त्यांना मुकाट्याने मोठ्या माणसांना शरण जावे लागते. आणि ही मोठी माणसे म्हणजे बहुतेककरून घरातील पुरुष असतात इत्यादी पडसाद देशभरातील मतदारांमध्ये उमटत आहेत.

धर्मनिरपेक्षतेच्या आधारे अशा प्रकारची बंदी भारतात घालणे हे योग्य ठरणार नाही, हे स्पष्ट आहे. याचे कारण असे की भारतात धर्मनिरपेक्षता म्हणजे अलिप्तता असे मानले जाते. शासनसंस्था ही सर्व प्रकारच्या धार्मिक श्रद्धांपासून अलिप्त आहे असे मानल्यामुळे कोणाचा पोषाख कसा असावा हे फर्मावता येणार नाही. भारतात निरनिराळ्या श्रद्धांना एकच वागणूक दिली जाते. सम्राट अशोकने तीन हजार वर्षांपूर्वी आपल्या शिलालेखावर असे लिहून ठेवले आहे की सामंजस्य राहण्यासाठी दुसऱ्या धर्माच्या लोकांना त्यांच्या धर्माप्रमाणे जे मान्य आहे, ते केवळ लक्षांत घेऊनच नव्हे, तर त्याचे सहानुभूतीपूर्वक भान ठेवून त्याप्रमाणे आपले वर्तन ठेवले पाहिजे. हा जो विचारशीलतेचा वारसा आपल्याला मिळालेला आहे, तो आपण आत्मसात केला पाहिजे आणि तरच धर्मनिरपेक्षतेचा खरा आशय आपल्याला साध्य होणार आहे.

ही पूर्वापार चालत आलेली सुसंवाद परंपरा (dialogic tradition) भारताच्या राजकारणात प्रभाव पाडत आलेली आहे. मी तर असा वाद घालायला तयार आहे की ह्या परंपरेला धुडकावून लावण्याचे कितीही प्रयत्न भेदभाव पाळणाऱ्या राजकारण्यांनी (sectarian politicians) केले, उदाहरणार्थ, वादविवादांत गप्प बसविणे, भय दाखविणे किंवा कधीकधी मारून टाकणे; तरीही ही परंपरा समाजात, राजकारणीजनांत, आणि बुद्धिमंतांतही घट्ट रुजून राहिली आहे. याचे ठळक उदाहरण म्हणजे २००२ साली गुजरात राज्यात झालेल्या दंगलीचे आहे. या दंगली घडवून आणण्यात हिंदुत्ववादी राज्यसरकारचा पाठिंबा होता याचा ठोस पुरावा आता हातांत आला आहे. या दंगलींचा

अनुक्रमणिका

तात्पुरता परिणाम मुस्लिमांना घाबरवून टाकण्यात आणि त्यांना गप्प बसविण्यात झाला असला, तरीही भारतातील सर्वोच्च न्यायालयांत याबाबत फेरतपासणी (retrials) होत आहे. परिणामतः याचे पडसाद देशभरातील मतदारांमध्ये उमटत आहेत.

भारतीय जनता पक्षाचा पुढाकार असलेल्या मागील सरकारला नंतरच्या सार्वत्रिक निवडणुकीत पराभव पत्करावा लागला याचे प्रमुख कारण म्हणजे त्या पक्षाची धार्मिक प्रतिमा हे आहे. माजी पंतप्रधान अटलबिहारी वाजपायी यांनी कबुली दिली की आमचा पक्ष नामोहरम होण्यात आमच्या या प्रतिमेचा प्रभाव मोठ्या प्रमाणात कारणीभूत आहे. त्यांच्या पक्षाच्या इतर नेत्यांनी अर्थातच हे विधान फेटाळून लावले, परंतु तरीही हे विधान केले गेले हे लोकांच्या नजरेला आहे आहे.

आधुनिक भारतीय समाजात आणि अर्थकारणात जी विषमता आढळून येते तिच्याविषयी खोलात शिरून अभ्यास करून, आपल्या परंपरांनुसार सुसंवादी वादविवाद करून आपण आपले प्रश्न सोडविले पाहिजेत, हमरीतुमरीवर येता कामा नये हे सतत आपण नीट लक्षात ठेवले पाहिजे.

याबाबतीत एक चूक होऊ शकते, ती म्हणजे अभ्यासपूर्वक आणि शिस्तबद्ध भूमिकेतून प्रश्नांची मांडणी करणे हे समाजातील उच्चवर्णीय व उच्चवर्गीय लोकांना सहज शक्य होते कारण ते दीनदरिद्री लोकांपेक्षा अधिक प्रशिक्षित असतात. प्रत्यक्षात मात्र असे दिसून येते की भारतातील बौद्धिक परंपरा लक्षांत घेतल्या तर दीनदुबळ्यांच्या विषयी पुष्कळ सहानुभूतीने विचार केला आहे असे दिसून येते. आणि त्यापुढे हट्टी पंडितांना हार खावी लागते असा इतिहास आहे.

ही वादविवाद घालण्याची परंपरा आपल्या समाजाला उपकारक आहे. परंतु ती जर प्रत्यक्षात उतरावयाची असेल तर त्या परंपरेचे महत्त्व आपण ओळखले पाहिजे. आणि त्या पद्धतीने आपण आपल्या विचारांची मांडणी व त्याच भावनेने वादविवाद केले पाहिजेत. अन्यथा भारतीय विकासाचे आपले ध्येय आपल्याला साध्य करता येणार नाही.

(अमर्त्य सेन यांनी दिल्ली येथे १ ऑगस्ट २००५ रोजी दिलेल्या व्याख्यानातील काही अंश. हे भाषण त्यांनी त्यांच्या 'The Argumentative Indian' (विवादक भारतीय) (पेंग्विन प्रकाशन) या आपल्या पुस्तक प्रकाशनाच्या वेळी दिले होते. त्यातील काही अंशांचा हा अनुवाद आहे.)



## आवाहन :

'सुसंवाद हवा वितंडवाद नको' ही 'नवभारत'ची अखंड परंपरा आहे.

या दिशेने विचार व कार्य करणाऱ्या सर्वांना 'नवभारत' हे मुक्त व्यासपीठ आहे.

दर्जेदार लेखन त्यावर दर्जेदार टीका यांच्या (प्रतिष्ठितांच्या व नवोदितांच्याही) प्रकाशनात 'नवभारत'ला रस आहे. त्यासाठी चर्चासत्रांचेही आयोजन करता येईल. सम-जिज्ञासा असणाऱ्या लोकांचा परस्पर संपर्क अन्य पद्धतीने साधण्या-साठीही काही रचना करता येईल.

याविषयी अधिक काही 'नवभारत'च्या पुढील अंकात.

- देवदत्त दाभोलकर

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

सुधारित किंमत :
१ एप्रिल १९९७
पासून लागू

| | |
|---|---|
| ❑ वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु. |
| ❑ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु. |
| ❑ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | ६० रु. |
| ❑ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | ५ रु. |
| ❑ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ | ६० रु. |
| ❑ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ४० रु. |
| ❑ तरंगयामिक व पुंजयामिक । मा. ग. टोळे | १० रु. |
| ❑ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | ८० रु. |
| ❑ वागीश्वरी । डॉ. गो. के. भट | ४० रु. |
| ❑ प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले | २५ रु. |
| ❑ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | १० रु. |
| ❑ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | ८० रु. |
| ❑ दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद पाटील | १०० रु. |
| ❑ शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु. |
| ❑ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १०५ रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु. |
| ❑ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य | ३० रु. |
| ❑ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु. |
| ❑ पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी | ४० रु. |
| ❑ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | २० रु. |
| ❑ कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य । रा. भा. पाटणकर | ८० रु. |
| ❑ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि.के. बेडेकर | १५ रु. |
| ❑ आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार | १०० रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु. |
| ❑ इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे | ८० रु. |
| ❑ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु. |
| ❑ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | ८० रु. |
| ❑ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु. |
| ❑ नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द.ना. धनागरे | ४० रु. |
| ❑ प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु. |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)

हे मासिक घ.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.






अनुक्रमणिका